भास्कर रामचंद्र

# तांबे

यांची

# समग्र कविता

संपादक

वासुदेव गोविंद मायदेव, एम्. ए.

आवृत्ति तिसरी

७ डिसेंबर. १९४५

मूल्य ३॥ रुपये

# संपादकीय

कविवर्य तांबे यांच्या समग्र कवितेची ही तिसरी आवृत्ति मुंबईचे प्रकाशक रा. केशव भिकाजी ढवळे यांचेमार्फत निघत असून तांबे यांच्या कविता संपादन करण्याचें काम पंचवीस वर्षांनी पुन्हा माझेकडे आले आहे.

ह्या आवृत्तीत डॉ. माधवराव पटवर्धन यांनी भास्कररावांना विचारून ज्या कविता व जे पाठ निश्चित केले तेच ठेवले आहेत. दुसऱ्या आवृत्तीनंतरच्या नवीन कविता या आवृत्तीत संग्रहित केल्या आहेत. कवितांचा अनुक्रम अगदी शेवटच्या काही कवितांखेरीज बदललेला नाही. कवितांचें लेखन उच्चरित पद्धतीनें केलेलें नसून रूढ व सर्वमान्य पद्धतीने केलें आहे. विरामचिन्हे बहुतांशी पटवर्धनांचे आवृत्तीप्रमाणे ठेवली आहेत. कवितांचा अनुक्रम मथळे देऊन छापला आहे. कवितांचे नावाखाली पटवर्धनांनी मुक्रर केलेली वृत्तें, जाति अगर राग ठेवले आहेत. कवितांवर शेवटी थोड्या टीपा दिल्या आहेत. कवितांच्या प्रथम चरणाची सूचीही जोडली आहे. तांबे यांच्या कवितांत इतर कवींच्या उद्गारासारखी अनेक स्थळें सापडतात परंतु त्यांत उचलेगिरीचा पुसटही संशय नसल्याचा निर्वाळा खुद्द डॉ. पटवर्धनांनी दिला असल्यामुळें असलीं साम्य स्थळें देण्याचा खटाटोप टीपांतून केलेला नाही. परिचयात तांबे यांचें चरित्र, काव्यनिर्मिति व काव्यगुणविशेष सांगितले आहेत.

कवीचे छायाचित्र चित्रकार नी. म. केळकर यांनी तयार केलेल्या तैल-चित्रावरून घेतलें आहे. संपादनाचे कामात प्रो. रा. रु. लाग् यांनी उपयुक्त सूचना केल्या. माझे मित्र रा. ह. स. गोखले आरंभापासूनच मला या कार्यात मदत करीत आहेत. या सर्वांचा मी आभारी आहें.

वा. गो. मायदेव

माझ्या परमपूज्य मातामही

श्री. मथूताई डोंगरे

यांच्या

पुण्यस्मृतीस

समर्पण

—भा. रा तांबे

घर राहिले दूर!

(राग - भीमपलासी, त्रिताल)

— ०ं० —

उरला दिवस अस्त - घोडे थकुनि चूर,
पथ रानि-वळणीत - घर राहिले दूर ध्रु.

असशील घरी आज - तू गे बघत वाट,
प्राण स्वनयनात - पोटात काहूर १

मुद्रा तुझी म्लान - डोळ्यापुढे येई
नाही मला पंख - हृदयात हुरहूर २

या निर्जनी रानि - रे कोण मज साथ!
नाम आहि जगदीश! - होई न निष्ठुर! ३

लष्कर, ग्वाल्हेर,
ता २-१०-३५

भास्कर रामचंद्र तांबे

# परिचय

श्री भास्कर रामचंद्र तांबे यांचें मूळ गाव खेटकुई. हे गाव रत्नागिरी जिल्ह्यांत आहे. तांबे यांचे पूर्वज पेशवाईत गोविंदपंत बुंदेल्याबरोबर उत्तर हिंदुस्थानात गेले. त्यांच्या कामगिरीबद्दल बुंदेलखंडांतील कुढोण हा गाव त्यांना जहागीर म्हणून मिळाला झांशी खालसा झाली त्यावेळेस या गावावरही गदा आली; तथापि त्यांतला कांही भाग तांबेकुळांत अद्याप चालत आहे.

भास्कररावांचे आजे गंगाधरशास्त्री तांबे हे एक प्रसिद्ध शास्त्री व वैद्य होते. यांना चार मुलगे. पहिले रामचंद्रराव, दुसरे लखुभय्या, तिसरे मुकुंदराव व चौथे बाळकृष्णपंत. यांपैकी रामचंद्रराव यांचे द्वितीय चिरंजीव भास्करराव होत. भास्कररावास तीन भाऊ व दोघी बहिणी. भास्कररावांचे मातामह कै. बळवंत रामकृष्ण डोंगरे हे देवास येथें फडणिशीच्या कामावर होते. यांना विलक्षण विद्याभिरुचि होती. विद्याभिरुचि व निःस्पृहपणा हे गुण भास्कररावांत यांच्यामुळेंच उतरले. भास्कररावांची आजी मथुबाई डोंगरे यांचा मुख्य गुण प्रेमळपणा हाही तांब्यांच्या काव्यांत अत्यंत उत्कट रीतीनें उतरलेला दिसून येतो

भास्कररावांचा जन्म मुगावली मुक्कामीं इ. स. १८७४ त नोव्हेंबर महिन्यात सत्तावीस तारखेस झाला. भास्कररावांचें प्राथमिक शिक्षण झांशी व मुगावली येथें धूळपाटीवरूनच झालें. सन १८८५ मध्यें इंग्रज सरकारनें झांशी आपल्याकडे घेतली त्यामुळें झांशीची सुभायत भांडेर मुक्कामीं गेली व भास्कररावांच्या वडिलांस भांडेर येथें जावें लागलें. या वेळीं भास्करराव ११।१२ वर्षांचे असतील. परंतु या वेळेपर्यंत भास्कररावांनीं पांडवप्रताप, रामविजय वगैरे ग्रंथांचीं बरींच पारायणें केलीं होतीं. तुळशीदासकृत रामायण हिंदींत आहे, तेंही त्यांचें अनेक वेळा वाचून बरेंचसें पाठही झालें होतें. भांडेर मुक्कामीं दुय्यम शिक्षणाची सोय नसल्यामुळे १८८८ सालीं भास्करराव आपल्या आजोळीं देवास येथें गेले. पण भास्करराव देवास येथें जाऊन फार दिवस झाले नाहींत तोंच रामचंद्रपंत वारले हें पाहून डोंगरे यांनीं भास्कररावांकडून कांही फारशीचा व कांही कायद्याचा अभ्यास करून घ्यावयाचें ठरविलें व हायस्कूलमधून काढून उज्जैन येथें

पाठविलें परंतु थोडे महिने झाले नाहीत तो भास्करराव इंग्रजी शिकण्याचें मनांत ठरवून घरांत न सांगताच एके दिवशी उज्जैनहून निघाले व देवासला काशीनाथ भास्कर लेले मास्तर यांचेकडे दत्त म्हणून उभे राहिले व आपली इंग्रजी शिकण्याची तीव्र मनीषा त्यांनी त्यांचेजवळ बोलून दाखविली. लेलेमास्तरांनीही भास्कररावाच्या मनाची आच लक्षांत घेऊन बळवनराव डोंगरे यास भास्कररावास तत्र शिक्षण देण्यास सांगितलें व अशा रीतीनें त्यांच्या दुय्यम शिक्षणास देवास हायस्कूलमध्यें खरा आरंभ झाला.

भास्कररावाच्या जीवनक्रमांत अनुकूल विकास घडवून आणणारे कुणी असतील तर ते रा. काशीनाथपंत लेले हेच होत. भास्करराव लहानपणीं फार हूड होते, बुद्धिमान् होते. परंतु त्या हूडपणाला जरब लावून व बुद्धीला सारखा नवीन नवीन ज्ञानाचा पुरवठा करून लेलेमास्तरांनीं चांगलें वळण लाविलें. भास्कररावांना शाळेंत असल्यापासूनच इंग्रजी पुस्तकांतील कवितांचें भाषांतर करमणुकीखातर करण्याचा नाद असे असाच एक चोळामोळा केलेला कागद लेलेमास्तरांचे हातीं पडला व त्यावर

अहा मतिगती खुटे तव कृतीं परी नाकळे
बघूनि अशि ही स्थिती दुरभिमान देवा गळे

या दोन ओळी त्यांना दिसल्या. त्या भास्कररावांनीं आपणच लिहिल्याचें लेलेमास्तरास सांगितलें ते ऐकून त्यांना मोठें कौतुक वाटलें. या बालभास्कराचें हें काव्यतेज पाहून लेलेमास्तरांनी त्यास काहीतरी कारणानें काव्यविषयक व इतर चांगलीं पुस्तकें देण्याचा सपाटा चालविला व प्रत्यक्ष साहित्यशास्त्राचा अभ्यास करून घेण्यासाठीं बळवंतराव कमळाकर यांचा मराठी रसप्रबोध, आणि ध्वन्यालोक हे ग्रंथ भास्कररावांकडून वाचून घेतले.

१८९३ त भास्कररावांचे थोरले बंधु गोपाळराव हे कॉलेजमध्यें बी. ए च्या वर्गांत शिकत होते. त्या वर्षींच भास्करराव अलाहाबाद युनिव्हर्सिटीची मॅट्रिक परीक्षा पहिल्या श्रेणींत पास झाले.

१८९३ तच भास्कररावास काशीनाथपंत लेले यांनी पुण्यास, मुंबईस व इतर ठिकाणीं नेलें तेथील शाळा, किल्ले, लेणीं, व इतर सृष्टिसौंदर्याचे प्रदेश त्यांच्या नजरेस आणले

इंदूर येथें कॉलेजमध्ये भास्कररावांनी नांव घातलें. पण गोपाळराव व भास्करराव या दोघांचाही कॉलेजचा खर्च घरातून करणें जड जाणार असल्यामुळे भास्कररावांना आपलें उच्च शिक्षणाचें ध्येय बाजूस सारावें लागलें त्यामुळें ते कांहीं काळ उदास व खिन्न होते. परंतु त्यांचें आजीचें ध्यानांत हें आल्यावाचून राहिलें नाहीं मथूबाई डांगरे यांनी भास्कररावांना लगेच जवळ बोलावून शिक्षणाचे अभावीं त्यांना कांहीं कमी पडणार नाहीं असें सांगितलें व संसारांतील सुखदुःखें विद्येवर अवलंबून नसून दैवाधीन असतात अशी समजूत घालून भास्कररावांना त्यांनी उल्हसित केलें

भास्कररावास धाकटे बंधु दोन सर्वांत धाकटे इंदुरास रेव्हिन्यू खात्यांत नोकरीस लागले. दुसरे गणपतराव बलभीमबुवा नावाच्या सत्पुरुषाचे अनुयायी होऊन हरिगुणचिंतनांत राहून संसार चालवीत. भास्कररावांना परमार्थप्रवण करण्यांत या बलभीमबुवांचा सहवास थोडासा कारणीभूत झाला

भास्कररावांना नोकरी करावी लागणार हें पाहताच लेलेमास्तरांनी त्यास आपल्या हायस्कूलमध्यें शिक्षक म्हणून ठेवून घेतलें. १८९४ त भास्कररावांना देवासचे राजपुत्र खासेराव पवार यांचे शिक्षकाची जागा मिळाली शिक्षणास उपयोगी अशा ग्रंथांची माहिती लेलेमास्तरांकडून मिळताच त्या माहितीचा भास्कररावांनी भरपूर उपयोग केला. आपल्यावर टाकलेल्या जबाबदारीसाठीं त्यांनी वाचन केलें, व प्रत्यक्ष कांहीं लिहूनही पाहिलें. या प्रयोगांतच 'चिवचिव चिमणी छतांत' हें क्षुद्र शिशुगीत उदयास आलें आंग्लकवि Browning याच्या Pied Piper चें रूपांतर त्यांनी याच काळांत केलें या वेळीं त्यांना इतर वाचन करण्यासही पुष्कळ वेळ मिळत असे. या वेळच्या त्यांच्या विविध विषयांवरच्या वाचनांत ठराविक असा क्रम नव्हता, परंतु त्यांत विविधता बरीच होती. पुष्कळशा इंग्रजी ग्रंथकारांचा त्यांनी असा परिचय करून घेतला राम-भाऊ वैद्य नावाच्या मित्राबरोबर संस्कृत नाटकांचेंही पुनर्वाचन त्यांचेकडून या काळांतच झालें

भास्कररावांचा विवाह रतलाम येथील त्र्यंबकराव जावडेकर यांची कन्या वारूबाई हिचेबरोबर १८९६ सालीं झाला या विवाहामुळें भास्कररावांच्या जीवन-क्रमांत ओलावा उत्पन्न होऊन त्यांचें जीवित प्रेममय व सुखमय झालें. करारी,

निःस्पृह, व हूड स्वभावाच्या भास्कररावासारख्या वृक्षाला या प्रेमळ वल्लीचा विळखा नसता तर हा वृक्ष कदाचित् नीरस, शुष्क व जीर्ण झाला असता, यांत संदेह नाही या सुमारास भास्कररावानी बऱ्याच शृंगारिक कविता लिहिल्या होत्या. त्यानाच त्या उत्तान वाटल्यामुळें त्यांनी आपलें हें सर्व लिखाण भस्मसात् केलें. या अग्निदिव्यातून बचावलेलें असें 'डोळे हे जुलमी गडे' एवढेंच एक गीत आज उपलब्ध आहे. शितावरून भाताची परीक्षा करावयाची झाल्यास या सर्व कविता भास्कररावाना जितक्या उत्तान वाटल्या तितक्या त्या असतीलच असें वाटत नाही.

१८९७–१९०० पर्यंतची भास्कररावाची सांपत्तिक स्थिति बेताचीच होती, व त्या काळचें स्मृतिचिन्ह म्हणून "जिवलगे संगि मम सारा। दुःखाचा मात्र पसारा॥" हे एक करुण प्रेमगीत आज आपणास पहावयास सापडते.

१९०० साली खासेराव मॅट्रिक्युलेशनची परीक्षा पास झाले व त्याची उच्च शिक्षणासाठी इंदुरास रवानगी झाली. त्याचेबरोबर त्याचे पालक म्हणून भास्कररावानाही इंदुरास जावें लागलें धारसंस्थानच्या इंदूरच्या कोठीची व्यवस्था पहाण्याचेंही काम यावेळेस त्याना मिळालें. या सुमारासच त्याचा निरनिराळ्या साहित्यप्रेमी मंडळींशी मैत्रीचा योग आला व त्याचा त्याच्या काव्यवल्लीला बहर येण्यास फार उपयोग झाला.

या वेळी कांही कौटुंबिक प्रसंगानें भास्कररावांना उमरावतीस जावें लागलें व रा. ब विष्णु मोरेश्वर महाजनी या त्यावेळच्या मोठ्या साहित्यिकाशी त्यांची ओळख झाली इंदुरास नारायणराव दुबे, रा न शं रहाळकर वगैरे मित्रमंडळी त्याचेभोंवती नेहमी असत. त्याच्याशी भास्कररावांच्या साहित्यविषयक चर्चा चालत. कॉलेजमध्यें शिकत असलेल्या मंडळींना कित्येक आंग्लकवीचे ग्रंथ परीक्षेस नेमलेले असत. त्यासंबधी कांही वेळा त्याना वाचन करावें लागे वाङ्मयप्रेमामुळें भास्कररावांना त्याच काळात बायरन्, शेली, कीट्स, वर्डस्वर्थ, कोलरिज व विशेषतः टेनिसन व ब्राउनिंग चांगले वाचले. यावेळी इंग्रजी साहित्यमर्मज्ञ व तत्त्वज्ञानी याचेही ग्रंथ वाचण्याची त्यांना संधि मिळाली. वरील मैत्रीचा, चर्चेचा व वाचनाचा ताबे यास चांगला फायदा झाला आणि त्याचा त्यांनी नीट उपयोग करून घेतला असें म्हटले तर वावगें होणार नाही कारण याच

नयनिं तें निज जीवित अर्पुनी
प्रणयकूजनिं मग्न इथे वनीं, १७

कर करांत अशंकाचि घालुनी
बसति वंशनिकुंज सुखी मनीं.
पवन दे सुख शीतल वाहुनीं,
सुखवितो पिक मंजुळ गाउनी. १८

विरहिणी विरहानलतापिता
कृशतनू बसते तटिं दुःखिता,
म्हणतसे, “ सुख देशि जनां खरा,
मजशि दुःखद कां मग निर्झरा ? १९

तव तटीं रमती तरुशीं लता
कधि रमेन तशी पतिशी अतां ?
नव सुमें फुलती तव या तिरीं,
मदनसायक तीव्र उरीं तरी ! ” २०

उटज बांधुनिया तटिं तापसी
सुतप आचरिती सुखि मानसी,
सतत चिंतन ते करिती इथे,
किति सेविति ते सुखशांतितें ! २१

जळ मृगेंद्र तसे मृगही पिती,
द्विज तसे अतिशूद्र पिती किती !
लघु व थोर असा मुळि भाव तो
मम मनांत कधींहि न राहतो. २२

किति युगें असती तरि लोटली,
नृपकुले किति मी तरि पाहिली,
विकृति जाहलि या जगती किती !
पलटली मनुजा, तव ही स्थिती. २३

दिवस वा रजनी, सुखदुःखही,
जननमृत्यु घडो जगि कांहिही,
तरिहि वाहतसें स्फटिकासम,
खिद्‌ळणें जगि चालतसे मम २४

देवास, १८८९–१८९० (?)

## ३ डोळे हे जुलमि गडे !

[ जाति दासी ]

डोळे हे जुलमि गडे रोखुनि मज पाहुं नका !
जादुगिरी त्यांत पुरी येथ उभे राहुं नका.
घालुं कशी कशिदा मी ? होती किति सांगुं चुका !
बोचे सुइ फिरफिरुनी वेळ सख्या, जाय फुका.

खळबळ किति होय मनीं !
हसतिल मज सर्वजणी,

येतिल त्या संधि बघुनि आग उगा लावु नका !
डोळे हे जुलमि गडे रोखुनि मज पाहुं नका !

देवास, १८९१ (?)

पिप्लोदाच्या जहागिरीत दिवाण म्हणून काम करण्याचा प्रसंग आला. पुढें १९१५ साली ते प्रतापगढ येथें सुपरिटेंडेंट ऑफ पोलीस या हुद्द्यावर रुजू झाले. नंतर फर्स्टक्लास जज्ज म्हणून त्यांची तेथेंच नेमणूक झाली. पिप्लोद्यास असताना व नंतर दोन वर्षे समानधर्मीय मित्र न मिळाल्यामुळें म्हणा अगर अंगावर पडलेल्या नवीन कामामुळें म्हणा, १९१७ पर्यंत त्यांचे हातून काव्यरचना झाली नाही. मध्यंतरी त्यांच्या कवितांची वही कुणी रसिकाने त्यांचेकडून नेली व परत आणून दिली नाही. त्यामुळें आपल्या काव्याबद्दल ते उदास झाले की काय न कळे. कारण १९११ ते १९१७ पर्यंतची त्यांची एकही कविता उपलब्ध नाही.

यावेळी महाराष्ट्रात पुण्यास प्रो. कर्वे यांनी काढलेल्या महिलाविद्यापीठात मराठीतून उच्च शिक्षण देण्याच्या प्रयोगास प्रारंभ झाला होता. पाठशालेंतील प्रथम व द्वितीय वर्षास मराठीच्या अभ्यासासाठी अभिनव काव्यमालेची पुस्तके नेमली होती या निमित्तानें अर्वाचीन मराठी कवितेच्या अभ्यासाला उत्तेजन दिलें जात होतें. त्यावेळी भास्कररावांच्या कवितांचें परिशीलन करून त्यांच्या काही कवितांच्य स्पष्टीकरणार्थ त्यांचेबरोबर माझा पत्रव्यवहार सुरू झाला.

आपण महाराष्ट्रापासून इतके दूर असलों तरी आपल्याबद्दल, आपल्या कवितांबद्दल व त्यांच्या निर्मितीबद्दल इतरत्र औत्सुक्य आहे हें पाहून, मला वाटते, त्यांची प्रतिभा पुन्हा जागी होऊं लागली. पुढें त्यांच्या कवितांची एक वहीच मला इंदूरचे रा. माकोडे यांचेकडून मिळाली व त्यातील कवितांबद्दल आम्हा दोघात चर्चा सुरू झाली. याचा फायदा भास्कररावांना झाला तो हा की, त्यांच्या कवितांवर होत असलेली टीका त्यांचे कानावर जाऊं लागली. या सुमारास त्यांनी संगीताचा शास्त्रशुद्ध अभ्यास सुरू केला होता व त्यामुळें संगीतानुकूल रचना करण्याकडे त्यांचें लक्ष वेधलें. प्रदीर्घ नसलेली व रागदारीतील चालीची बांधेसूद भावगीतें ते या वेळपासून लिहूं लागले.

आजपर्यंत त्यांनी लिहिलेल्या त्यांच्या ७५ कविता माझ्याजवळ जमल्या होत्या. त्या नीट छापल्या तर मराठी कवितेच्या अभ्यासाची थोडी सोय होईल या हेतूनें मी मुद्दाम प्रतापगढ येथें त्यांचेकडे गेलों. कवितेंतील पाठ त्यांना दाखवून ते मुक्रर करून घेतले. चरित्र व टीपाही त्यांना दाखविल्यानंतर या ७५ कवितांचा संग्रह मी १९२० मध्यें छापला.

या सुमारास त्याची कवनें मी खासगी बैठकीतून, सभातून व समेलनातून म्हणून दाखवीत होतो १९२० सालीं भास्कररावानी प्रतापगढची नोकरी सोडली व ते पुण्यास आले. त्यावेळी त्याच्या कवितेनें लोकाचे मनात कशी आवड उत्पन्न केली आहे हें त्यानी पाहिलें. महाराष्ट्रातील कितीतरी विद्वान् रसिक त्यावेळेस त्याचेभंवती त्याचें काव्य ऐकण्यास आतुरतेनें रुजी घालून बसत

काव्यलेखन हें कवि केवळ ग्रंथाभ्यासानेच शिकतो असे वाटत नाही. ' आपरि-तोषात् विदुषा न साधुमन्ये प्रयोगविज्ञानम्' आपण लिहिलेले काव्य आपल्याला पटले म्हणजे झालें असे म्हणता येणार नाही. त्याचा प्रत्यय भास्कररावासही आला असल्यास नवल काय ? या त्याच्या पुण्याकडच्या फेरीत त्याना रसिकास आपल्या कोणत्या कविता आवडतात, त्या कशामुळें पटतात, त्या रागदारीनें कशा झुलवतात, त्या प्रदीर्घ असल्यास कशी रसहानि करितात, त्या संस्कृत-प्रचुर असल्यास कशा बिचकवतात वा गूढ असल्यास कशा गोंधळवतात याचा अनुभव भास्कररावाना आला. लहान-मोठे, स्त्री-पुरुष, अशिक्षित-शिक्षित, सर्व प्रकारचे श्रोते त्याना मोठ्या प्रमाणात मिळाले व त्याच्या चेहऱ्यावर स्पष्ट प्रतीत होणाऱ्या भावप्रतिबिंबावरून त्याना एक प्रकारची सुस्पष्ट शिकवण मिळाली असे म्हटलें तर वावगे होणार नाही.

पुण्याहून ते इंदुरास पोचले तोंच त्याना अजमेर मुक्कामी राजपुत्राचे पालक नेमल्याचा हुकूम त्याचे हाती पडला म्हणून ते अजमेर येथें गेले. तेथें आणखी प्रो. भवानीशंकर पंडित, श्री. यशवंतराव कुलकर्णी यांच्यासारख्या रसिक व प्रेमळ स्नेह्याचा त्यास लाभ झाला. तेथें गेल्यावर त्यानी उपनिषदाचे वाचन सुरू केलें होतें व आपल्या मित्रमंडळींत त्यावर ते प्रवचनेंही करीत असत रवींद्रनाथासारख्या समानधर्म्यांचे ग्रंथही त्याना याच वेळेस वाचावयास मिळाले. भावगीतांचें मर्म त्याचे गळी नीट उतरून भावगीते कशी लिहिली पाहिजेत, याचा त्याना नीट उलगडा झाला होता परंतु यावेळीच त्याना जिवावरच्या दुखण्यानें गाठले व त्यायोगें ते काही काळ गडबडलेही. पण जात्याच धीर वृत्तीचे असल्यामुळें याही प्रसंगाचा त्यांनी विचारवंताप्रमाणें उपयोग करून आपल्या धैर्यशाली मनाची बैठक निरनिराळ्या संगीतानुकूल भावगीतानी

व्यक्त केली. या विषयावरची त्याची ही भावगीतें अत्यंत हृदयस्पर्शी, गंभीर व उदात्त अशी आहेत.

भास्कररावांच्या प्रतिभेला खरा बहर १९२० पासून १९२३ सालापर्यंत आलेला दिसेल या काळांतच त्यानी सुंदर भावगीते, नाट्यगीतें, शिशुगीते व सुनीतेंही लिहिलेली सापडतील भावगीताची रचना रसरशीत भावनेनें कशी भारून टाकावी, कल्पनासौंदर्यानें कशी नटवावी, वेंचक शब्दांनी कशी अर्थपूर्ण करावी, व सोप्या संगीतमय चालीनी कशी श्रुतिमधुर करावी हे त्यानी या कालातील कवितांच्या लेखनानें दृढ केलें. भास्कररावानी लहानपणापासूनच खूप गाणे ऐकलें होते, परंतु संगीताचा १९१८ च्या सुमाराम शास्त्रशुद्ध अभ्यास केल्यानंतर लिहिलेल्या चालीपुढे भावनानुकूल संगीत रागही ते देऊं लागले.

अजमेर येथें दोन वर्षे काम केल्यानंतर तांबे याची बदली शिवपूर बडोदा येथें त्या माडलिक संस्थानचे सुपरिंटेडेट म्हणून झाली त्या कामातही भास्करराव यशस्वी ठरले. १९२६ साली त्याची ग्वाल्हेरचे शिक्षणखात्यात रजिस्ट्रार ऑफ एक्झॅमिनेशन्स म्हणून नेमणूक झाली. पहिला भाग छापल्यावर यावेळपावेतो भास्कररावानी लिहिलेल्या आणखी ७५ कविता माझेकडे आल्या. रा दिनकर गंगाधर केळकर हे संपादक लाभल्यामुळें या भागाचें प्रकाशनही १९२७ साली करता आलें मध्यभारतीय कविसंमेलनाचें अध्यक्षस्थानही त्याना या वेळी लाभले पुढे १९३२ साली कोल्हापूर येथें महाराष्ट्रसाहित्य-संमेलन भरले त्यात भरलेल्या कविसंमेलनाचें अध्यक्षपद त्याम देण्यात आले. ग्वाल्हेरच्या तांबे वाढदिवसमंडळानें "तांबे व्यक्ति आणि कला" हा ग्रथ १९३५ त प्रसिद्ध केला. १९३६ साली डॉ माधवराव पटवर्धन याचे सपादकत्वाखाली तांबे याची समग्र कविता पहिल्या प्रथम छापली गेली त्यावेळी सर्व महाराष्ट्रभर तांबे याचा गौरव करण्यात आला १९३७ साली ते सेवानिवृत्त झाले. सेवानिवृत्त होण्यापूर्वी ग्वाल्हेरभूपतीनी त्याना राजकवि ही पदवी व १०० रुपयाची मासिक नेमणूक करून दिली. सेवानिवृत्त झाल्यावर ते आपल्या वडील मुलाकडे ग्वाल्हेर येथे राहिले दम्याचा विकार त्याना प्रथम-पासूनच होता व त्यातच त्याचा ७ डिसेंबर १९४१ रोजी अत झाला.

आज त्याच्यामागें त्याच्या पत्नी, चार मुलगे व तीन मुली हयात आहेत.

तांबे यांच्या काव्यसंग्रहाकडे नजर टाकण्यापूर्वी तांबे यांचीच काव्यासंबंधी काय कल्पना होती हे पाहणें अनुचित होणार नाही. काव्य अल्पाक्षर व बह्वर्थप्रतिपादक असावें ही त्यांची कल्पना काव्यनिर्मितीत रस-निष्पत्ति झाली, की त्याना इतर गोष्टीची पर्वा नसे रसनिष्पत्ति उत्तम होत असताना शब्द व वृत्त आपोआप निर्दोष सुचतात असें त्यांचें मत बरें त्यातूनही दोष राहिले तर रसिकानें त्याचे स्तोम माजवू नये व आपली रसिकता हीन करूं नये असें त्याना वाटे. रस निर्माण करताना कवीने तो जितक्या कलात्मक रीतीने निर्माण करता येईल तितका करावा परंतु रसाचा प्राण भावना असल्यामुळे ती जितकी उत्कट करता येईल तितकी केली पाहिजे हाच त्यांचा दंडक आणि याकडेच लक्ष देऊन त्यांनी आपली बहुतेक कविता लिहिली आहे वृत्त, छंद, मात्रा, यमक वगैरे बाह्य गोष्टी काव्याला उपकारक हें त्यांस मान्य, परंतु त्याचा अवास्तव बडेजाव मानण्यास ते तयार नसत अशी त्याची काव्याकडे पाहण्याची दृष्टि असल्यामुळे काही मित्रमंडळींनी त्याना एखादा ऱ्हस्वदीर्घाचा च्युतिदोष दाखविला तर ते म्हणत "जाऊद्या हो "

कविता परिश्रमपूर्वक निर्दोष करावी याचे त्याना एकंदरीत वावडेच ! मात्र बनला तो बनला म्हणूनच साहित्यशास्त्राच्या दृष्टीने त्यांच्या कवितांत राहून गेलेले अनेक दोष दाखविता येतील. कुठें चुकीची यमकें आहेत, कुठे मात्रांचे न्यूनाधिक्य आहे, कुठें शब्दांचे रूपभंग आहेत तर कुठे निरर्थक पादपूरणार्थक पडली आहेत कुठें चरण पुरेसे नाहीत तर कुठे सारखी कडवी नाहीत. परंतु या संग्रहाचा साकल्यानें ज्या वेळेस आपण विचार करू लागतो त्यावेळेस या अल्प हिणकसाबरोबर आढळणारें सुवर्णाचें प्रमाण फार मोठे आहे हें तेव्हाच ध्यानात येते

उत्कट व रसरशीत भावना, आटपशीर व बांधेसूद रचना, आणि समुचित व समर्पक शब्दयोजना ही भावगीताची प्रमुख अंगें होत या तीनही अंगावर नजर ठेवून ज्या वेळेस आपण त्यांच्या भावगीताकडे पाहू लागतों त्या वेळेस त्यातील असामान्यता आपल्या लक्षात आल्याबाचून रहात नाही.

भावगीतात उत्कट रसरशीत भावना असावी हें खरें, पण ती ज्या विषयासंबंधी व्यक्त केली गेली आहे त्याची यादी जर लक्षात घेतली तर

रसिकांच्या ध्यानात ही गोष्ट तेव्हांच येईल, की भास्कररावाच्या नजरेंत सामान्य विषय भरतातच; परंतु आशीर्वाली, लोकमान्य, वाल्मीकि, स्फूर्ति, मेनकावतरण, भैरव, रुद्र, अनंत अशासारखे विषय त्याच्या प्रतिभेला जास्त मानवतात आधुनिक कवींच्या कवितांच्या विषयाकडे नजर टाकल्यास आपणास असे आढळून येईल की, ते विषय बहुधा लौकिक, व्यावहारिक व सामान्य असे असतात परंतु भास्कररावाचे मनात जे विषय पाहून, वेड लागून, मनात उत्कट गाणे जागें होई ते विषय बहुधा असामान्य असत प्रेमाचे मूल्य पटवून देण्यासाठी त्याची कितीतरी कविता खर्ची पडली आहे. त्या भावनेचा उदय, विकास व लय होते वेळी किती अद्भुत, मनोहर व रोमहर्षी स्वरूपे प्रत्ययास येतात याचा विस्तीर्ण व विविध पात्रान्वित असा चित्रपट भास्कररावाखेरीज कोणत्याही आधुनिक कवींच्या कवितेत नाही. त्याच्या काही कवितांत बाह्य सौंदर्य वर्णिलेलें आहे, नाही असें नाही परंतु शब्दातीत रमणीयत्व व्यक्त करण्यासाठी त्याचे शब्द झटत असतात त्याचे प्रेम अद्यावत् नाही असा आक्षेप आहे. परंतु कोणत्याही देशकालानें अवच्छिन्न न होणाऱ्या प्रेमाचें त्यांनी ( ८५, ८६, ८९, १२०, १२४, १२५, १४३, १४६, १५६ ) केलेलें वर्णन पहावें म्हणजे हाही आक्षेप फोल वाटेल

आणखी दोन महत्त्वाच्या विषयावरल्या कवितांमुळे भास्कररावाच्या कवितेला अनन्यसाधारण स्थान आहे भास्कररावाचा जगाकडे पाहण्याचा दृष्टिकोन फारच समंजसपणाचा आहे त्यांना आयुष्यात बेताचे शिक्षण मिळाले, परंतु प्राच्य आणि पाश्चात्य कवि यांच्या कृतीत मनमुराद अवगाहन करता आले पैसे फार मिळाले नाहीत, परंतु संसाराला काही कमी पडले नाही. संकटें आली, त्यातून लगेच पार पडता आलें लोकांचे संसारात काहींन् काही उणें दिसावें, परंतु यांना मात्र अपूर्व शक्तिसंयोग लाभून सर्व सुकर झालें. कीर्ति मिळाली. या सर्व गोष्टींमुळें त्यांचा परमेश्वरावर अढळ विश्वास बसला. त्याच्याच दयेनें हें सारें जुळून येत आहे असें त्यांना वाटत असे कृतज्ञतेनें त्यांचें हृदय नेहमी भरून येई. संकटांनी ते डगमगून जात नसत त्यांचा आशावाद पक्का, खंबीर व निर्भय असा होता. हा त्यांचा जगाकडे पहाण्याचा दृष्टिकोन आधुनिक मराठी काव्यात अपूर्व आहे. कमीजास्त प्रमाणात कविजनांत काय अगर अन्यजनांत काय, आपल्याला गुण, बुद्धि, बल, योग्यता यांच्या अनुरूप पैसा, अधिकार व मान

मिळत नाही अशी सगळ्यांची तक्रार । या उलट आपल्याला अपेक्षेबाहेर नीट वागविल्याबद्दल कृतज्ञ राहून जीवित सुफलित झाल्याबद्दल हा कवि आनंद मानतो हें पाहून कवीची अनन्यसाधारणता वाचकाच्या लक्षात येते.

जन्म आणि मरण ही दोन गूढे मानवी मनाला स्तिमित करून सोडणारी आहेत जन्मामुळें सुखाला आचवण्याजोगें काही घडल्याचा प्रत्यय येत नसल्यामुळे त्याबद्दल मानवाला एवढे गूढ अगर भीति वाटत नाही. मृत्यूबद्दल मात्र त्याला भीति वाटते. कारण आयुष्यात जो काही बरा वाईट अनुभव आहे, आनंद आहे, तो मृत्यूबरोबर कायमचा नाहीसा होणार असल्यामुळे त्याच्या कल्पनेबरोबर उरात धसका घेणारे लोक कितीतरी आढळतात. परंतु याही गंभीर विषयाबद्दल नुसती चर्चाच नव्हे तर मनाची तयारी करून प्रस्थानकालीन मनाच्या निरनिराळ्या अवस्थाची चित्रें, सावकाश, संथ व निर्भय रीतीनें भास्कररावानी काढली आहेत आधुनिक कवितेंत या शत्रूने उडवलेल्या दाणादाणीची करुण चित्रें बरीच रंगविली गेली आहेत. परंतु या शत्रूशी मुकाबला घेऊन, त्याच्याशी दोन हात करून, लढाईत वीराप्रमाणें विजय संपादून, सानंद व हर्षनिर्भर तऱ्हेने निरोप घेण्याची करामत भास्कररावानीच साधली आहे. हें पाहून वाचकास त्याचे विषयी आदर वाटू लागला तर त्यात आश्चर्य नाही.

या संग्रहात भास्कररावाच्या २२४ कविता छापल्या आहेत. त्यात भावगीताच्या सर्व कसोट्याना उतरणारी ५।५० तरी भावगीतें खास आहेत.

भास्कररावाच्या गूढगुंजनात्मक कविताबद्दल बऱ्याच भ्रामक समजुती रूढ आहेत. तत्त्वज्ञान आणि गूढ प्रांत याच्या मर्यादा अत्यंत निकट आहेत. किंबहुना एकाची मर्यादा कुठें संपते व दुसऱ्याची कुठें सुरू होते हें सागणें कठिण आहे. भास्कररावाची तत्त्वज्ञानाची बैठक श्रुतिस्मृतिपुराणांतील मतप्रणालीहून भिन्न अतएव स्वतंत्र आहे असें वाटत नाही. त्याचे कवितांचें सर्व वातावरणच हिंदु मनाचें आहे. परमेश्वर, अवतार, पूज्य ग्रंथ, धर्म, नीति, संचित, पाप व पुण्य या संबंधीच्या हिंदु कल्पनानी त्याची कविता नटली आहे. त्याचा परमेश्वरावर विश्वास होता. जीव-शिव, प्रकृति-पुरुष, माया–ज्ञान, सगुण–निर्गुण व द्वैत–अद्वैत या हिंदुस्थानांत सर्वत्र मान्य असलेल्या हिंदु तात्त्विक कल्पनाचेच ते अनुयायी होते. जगाची उत्पत्ति, विकास व लय या संबंधीच्याही त्याच्या कल्पना रूढ कल्पनाहून भिन्न

नव्हत्या. त्याच त्यानी आपल्या शब्दांत सुंदर रीतीनें प्रकट करून दाखविल्या आहेत. जीवानें शिव होण्याची आशा बाळगणें, सान्तानें अनन्ताची ओढ बाळगणें, वा प्रकृतीनें पुरुषाची आठवण ठेवून आळवण, आराधना, अनुनय करणें या आपल्याकडीलच कल्पना त्यानी माडल्या आहेत त्यात सुफीपंथाचा पुसटसुद्धा वास नाही सुफीपथांत भक्त कांही वेळा परमेश्वराला आपली प्रिया समजतो व तिचा अनुनय करतो. तशा तऱ्हेची एकही कविता भास्कररावाच्या कवितात आढळत नाही. तेव्हा त्याचे कवितात काही गूढगुजन आहे असें मला वाटत नाही.

पंचवीस वर्षापूर्वी ही कवनें प्रसिद्ध करताना या सुमनाचा गंध सर्वत्र दरवळेल अशी आशा मी व्यक्त केली होती. ती आशा खरी ठरली आहे; इतकेंच नव्हे तर भास्कररावाच्या या काव्यवल्लीची जोपासना महाराष्ट्रात घरोघर केली जात आहे हे पाहिले म्हणजे मनाला हर्ष झाल्यावाचून रहात नाही.

मुंबई, ता. १ डिसेंबर १९४५ **वा. गो. मायदेव**

# अनुक्रम

# तांबे

## यांची

# समग्र कविता

### १ कुस्करूं नका हीं सुमनें !

[ जाति भवानी ]

कुस्करूं नका हीं सुमनें ! ध्रु०

जरि वास नसे तिळ यांस तरी तुम्हांस अर्पिलीं सु-मनें.
मधु जरी नसे तिळभरी अंतरीं तरी करी हीं धरणें.
यां वर्ण नसे सौवर्ण; जो न हीं शीर्ण तोंवरी धरणें.
घ्या करीं, क्षणाभीतरी वाळतिल तरी तयांना जपणें.
हीं वन्य फुलें मधुशून्य, मानितिल धन्य तुम्हां करिं सजणें.
घरिं मुलें तशी हीं फुलें, हृद वत्सलें लोचनें बघणें.
अंगुली कठिण लागली तरी संपलीं ! हळुच यां शिवणें.
हृद्वनीं फुलें कोठुनी जशीं उपवनीं उमलतीं नयनें ?
मालती, बकुल, जुइ जाति हीं जरी हातिं, हींहि असुं देणें.
अंजली धरुनि अर्पिलीं, भक्तिनें दिलीं म्हणुनि तरि घेणें !

रतलाम - उज्जैन, आगगाडीत १९०० (?)

सजणें = शोभणें.

# २ झरा

[ वृत्त द्रुतविलंबित ]

घन पिता मम जो नटवी धरा,
मम असे जननी गिरि-कन्दरा;
जननिचे शरिरीं बहु नाचतों,
खद्खदा हसतों आणि खेळतों. १

जलनिधी मम थोर पितामह;
सतत त्या सरिता-भगिनींसह
त्वरित भेटुं म्हणोनिच धावतों,
तरि वनस्पतिला तटिं पोसतों. २

गगनचुंबित हे तरु लागती,
मम सुतावलि तीरिं मदीय ती;
पुजुनिया निज कोमल पल्लवें
मजवरी तरुराजि शिरें लवे. ३

हरित घालुनि वस्त्र तटी, स्वतां
प्रणयरूपवती युवती लता
हरितपल्लवशालुस लेउनी
नटुनिया दंवमौक्तिक-भूषणीं— ४

विविध वर्णि अलंकृत होउनी
तरुपतीस अती कवटाळुनी
सुतनु त्या हसती सुमनें किती !
मम तटीं रमती पतिशीं अती. ५

प्रणय त्यांवरिही मम निश्चित;
मम जलांतरि होउनि बिंबित
जरि विलोल तरी हृदयीं पहा
वसति त्या मम संततही अहा ! ६

कनकगोल रवी उदयाचलीं
सहज नाशित येइ तमावली;
तरुंतुनी कर घालुनि तो बळी
बहु सुवर्णसुमें उधळी जळीं. ७

पवन वंशनिकुंजिं शिरोनिया
श्रुतिमनोहर गान करोनिया
उठवितो द्विजवृक्षलतादिकां,
म्हणतसे, " प्रभुगान करा न कां ? " ८

खळखळाट तई मम ऐकुनी
जळहि निर्मल हें मम पाहुनी
पिक करी मधुर प्रभुगायन;
करि मयूरहि तन्मय नर्तन. ९

सरसरा तरती बदकें जिथे
अचळ हो जळ दर्पणतुल्य तें;
उसळती जळि चंचळ मासळ्या,
टपति त्या बक धीवर पंक्तिं या. १०

तरुंतुनी नृपतीसम वाहुनी
चमकतोंहि कुठें कुरणांतुनी,
कृषक लावित या तटिं शेत तो,
मधुनि मी विभवें स्थिर वाहतों. ११

जिथजिथे वसतों, मज पाहतां
प्रमुदिता दिसते वनदेवता;
सुमफलांसह सज्ज सदैव ती
सुखविण्यास समा सकलां सती. १२

थकुनि भागुनि पांथ कधी जरी
दुरुनि येइ तृषातुर या तिरीं
निवविं ताहन मी अपुल्या जळें,
निववितातहि भूक तरू फळें. १३

रविकरें गिरि-कानन तापती
परि भयें कर या जळिं कांपती !
रवि कसा मग तापद हो तया
पथिक जो कुणि ये मम आश्रया ? १४

मम तटीं पसरे घन सावली,
कधिं न वास करी कलि या स्थलीं;
झुळुझुळू स्वन मंजुळ गाउनी
निजवितों पथिकां मन मोहुनी. १५

मग कसा तरि होय न तुष्ट तो ?
स्वसदनीं सुत-पत्निंस सांगतो,
‘ किितिक रम्य असे तरि निर्झर !
अमित धन्य जगांत खरोखर ! ’ १६

कधिंकधीं रमणी रमणांसह
भ्रमिति या तटिं काल सुखावह

नयनिं तें निज जीवित अर्पुनी
प्रणयकूजनिं मग्न इथे वनीं, १७

कर करांत अशंकाचि घालुनी
बसति वंशनिकुंज सुखी मनीं.
पवन दे सुख शीतल वाहुनी,
सुखवितो पिक मंजुळ गाउनी. १८

विरहिणी विरहानलतापिता
कृशतनू बसते तटिं दुःखिता,
म्हणतसे, “ सुख देशि जनां खरा,
मजशि दुःखद कां मग निर्झरा ? १९

तव तटीं रमती तरुशीं लता
कधिं रमेन तशी पतिशीं अतां ?
नव सुमें फुलती तव या तिरीं,
मदनसायक तीव्र उरीं तरी ! ” २०

उटज बांधुनिया तटिं तापसी
सुतप आचरिती सुखि मानसीं,
सतत चिंतन ते करिती इथे,
कितिक सेविति ते सुखशांतितें ! २१

जळ मृगेंद्र तसे मृगही पिती,
द्विज तसे अतिशूद्र पिती किती !
लघु व थोर असा मुळिं भाव तो
मम मनांत कधींहि न राहतो. २२

किति युगें असती तरि लोटली,
नृपकुलें किति मीं तरि पाहिली,
विकृति जाहलि या जगती किती !
पलटली मनुजा, तव ही स्थिती. २३

दिवस वा रजनी, सुखदुःखही,
जननमृत्यु घडो जगिं कांहिंही;
तरिहि वाहतसें स्फटिकासम,
खिदळणें जगिं चालतसे मम. २४

देवास, १८८९–१८९० (!)

## ३ डोळे हे जुलमि गडे !

[ जाति दासी ]

डोळे हे जुलमि गडे रोखुनि मज पाहुं नका !
जादुगिरी त्यांत पुरी येथ उभे राहुं नका.
घालुं कशी कशिदा मी ? होती किति सांगुं चुका !
बोचे सुइ फिरफिरुनी वेळ सख्या, जाय फुका.

खळबळ किति होय मनीं !
हसतिल मज सर्वजणी;

येतिल त्या संधि बघुनि आग उगा लावुं नका !
डोळे हे जुलमि गडे रोखुनि मज पाहुं नका !

देवास, १८९१ (!)

# ४ जगाहून भिन्न

[ जाति मदनमंजरी ]

ज्योत्स्नेनें नभ व्यापिलें, विश्व माखिलें पयें जणुं चोख
हृदयांत भरे काळोख.

नभिं नक्षत्रें चमकती, रत्नमणि किती विखुरले दिसती,
कोळसे तरंगति चित्तीं.

वर्षतो सुधा शीतला, निववि भूतला चंद्र या समयीं,
काळकूट भडके हृदयीं.

शीत हा पवन संचरे, सुवासें भरे व्योम हें सारें,
निःश्वास ऊन मी वितरें.

सलिलांत फुले कमलिनी मृदुल जी जनीं, मनी परि भरती
ते तरंगकंटक रुतती.

प्रियसखी-वियोगामुळें हृदय हो खुळें जगाहुनि भिन्न
तें चूर सुखीं, हें खिन्न !

देवास, १८९१ (?)

## ५ तुजवीण

[ जाति भूपति ]

वेणूंत नादसम नित्य सखे, हृदयांत
प्राणशी विहरशी, उगम सुखाचा आंत.
आधीं तो जाय फुटोनी जेधवा
लोपतो नाद तेथोनी तेधवा
शवसमान त्यावांचोनी तेधवा
दे त्रास बांस नेत्रांस, काय मग त्यांत?
तुजवीण मी तसा भग्न बांस जगतांत. १

रस जसा भरे जीवसा मधुर कवनांत
त्यापरी विहरशी सखे, सदा हृदयांत!
रस जातां कवनांतून सुंदरी,
जाल शब्द त्यावांचून सुंदरी,
सुख काय तया वाचून सुंदरी?
जाउ दे जाल तें लया--शवच अनिलांत!
तुजवीण मी तसा व्यर्थ जाल जगतांत. २

ज्यापरी मधुप सुंदरी, मधुर कमलांत
त्यापरी गुंतलें हृदय तुझ्या प्रणयांत.
मधुलोलुप होई लीन त्या स्थळीं
उन्मत्ताचि छलबलहीन त्या स्थळीं
स्थळ काळ तया राही न त्या स्थळी.
जगताचा स्वामी पूर्ण तया कमलांत,
धुंद मी प्रणयिं तव, काय बाह्य जगतांत? ३

देवास, १८९१ (?)

छलबलहीन=निष्कपट आणि निर्बल. बांस–वंश, वेळू.

# ६ विधवेचें स्वप्न

[ उपजाति ]

“ सखे अगे, ऊठ ! रवी उदेला
झोपेंत तूं हासशि गे कशाला ?
गे ऊठ, गे ऊठ ! बहूत होई
गंगेस जाण्यास उशीर बाई. ” १

“ गेली कुठे ती सरिता, कुठे ती
उद्यानशोभा, नवचंद्रकांती ?
गेले कुठे प्राणाचि सौख्यदाते
नेल्याविना हाय अगाइ ! मातें ? २

कीं काय तें स्वप्नचि सर्व होतें ?
हो स्वप्नची; मी निजतें पुन्हा तें
पडो, मला तें सुख देइ फार,
वाटे मला जागृति ही असार ! ३

स्वप्नीं तरी हो सहवास कांता,
सदा घडो हीच विनंति आतां;
कोठोनिया हो सुख जागृतीं तें
लाभेल दुर्भाग्यवतीस मातें ? ४

भेटा मला, मी निजतें पुन्हा या
कां गे सखे, जागवितेस वाया ?
ही नीजतें मी न पुन्हा उठेन
स्वप्नींच त्या सौख्यभरें असेन. ” ५

" गडे, भ्रमिष्टासम आज कां गे
तूं बोलशी यापरि नीट सांगें,
झोपेंत कां गे वद हासलीस,
झालें असें काय तुझ्या मनास ? " ६

" स्वप्नांत उद्यान, नदी विशाला,
ज्योत्स्ना सुरम्या, बघतां प्रियाला
तेथें तृषार्तीं नयनीं पिऊनी
आनंद होतां हसलें. तयांनीं— " ७

" रडूं नको सांग सखे पुढें तें "
" बोलाविलें खूण करोनि हातें !
ही नीजतें मी न पुन्हा उठेन,
स्वप्नींच त्या सौख्यभरें असेन. " ८

देवास १८९३ ( ? )

## ७ मार्गप्रतीक्षा

[ जाति कामदा ]

कृष्ण वस्त्र हें भयद घेउनी
अखिल विश्वही त्यांत झाकुनी,
रमणिसंगमा हृदयिं उत्सुक
जाइ अष्टमीकुमुदनायक. १

रजनि पाततां सदनिं धावती,
मजविना तई पळ न राहती,
तरिहि यावया आज यांजला
उशिर कां बरें फार लागला ? २

कपट साधुनी राजशासनीं
फसविलें कुणीं वैर साधुनी ?
यांवरी धरी शस्त्र का अरी ?
काय जाउं मी पाहण्या तरी ? ३

भुरळ घालुनी यांजला कुणी
छळि समंध का नेउनी वनीं ?
मंत्र घालुनी घोर यांवरी
पशु पतत्रि का यां कुणी करी ? ४

काळसर्प यां—परि नको नको !
अगइ ! कल्पना भयद या नको !
मम विदीर्ण हें होइ काळिज,
हुडहुडी भरे भीतिनें मज. ५

कडिवरी कडी चढविली किती,
बुडविला जळामाजि गणपती;
राहुनी उभी द्वारि पाहतें
वाट मी जरी भीति वाटते. ६

पाळण्यामधें बाळ सोनुलें
एकटें असे आंत झोपलें;
त्यास पाहुं का आंत जाउनी ?
वाट पाहुं का येथ राहुनी ? ७

दूर ऐकुनी कांहिं चाहुल
वाजतें गमे काय पाउल ?
म्हणुनि पाहिलें नीट मीं जरी
दिसति ना, करूं काय मी तरी ? ८

बाह्य वस्तु या शांत भासती,
चित्त अंतरीं क्षोभलें किती ?
अखिल विश्व हें झोप घे जरी
चैन या नसे अंतरीं तरी. ९

धनिक सुंदरी रम्य मंदिरी
मंचकावरी मुदित अंतरीं,
कृषकयोषिता काम सारुनी,
निजति तान्हुलें जवळ घेउनी. १०

तरुशिरावरी अखिल पक्षिणी
स्वस्थ घोरती फार भागुनी;
धन्य धन्य या पुण्यवंत कीं !
तळमळेंच मी एक पातकी. ११

विझवुनी दिवाही नभोंगणीं
सुप्ति सेविली सर्व सुरगणीं;
तरि दिसेल तो मार्ग केवि यां
गहन या तमीं सदनिं यावया ? १२

फिरफिरूनिया भयद कल्पना
टाळितें तरी जाळिती मना;
काव काव कां करुनि कावळे
भिवविती मला आज ना कळे. १३

समयिं रात्रिच्या शकुनिशब्द ते
अशुभ मानिती म्हणनि मी भितें.
आइ अंबिके, असति ते जिथे
पाळ त्यां तिथे हेंच विनवितें. १४

तुजवरी अतां भार टाकितें,
तुजविना अम्हां कोण राखितें ?
तूंच धावशी विनतपालना,
तुजविना रिघूं शरण मी कुणा ? १५

आण त्यां घरीं तूं सुरक्षित,
पाळ आइ, तूं आपुलें व्रत;
त्यांस आणण्या तुज असें बळ,
वाहिं मी तुला चोळिनारळ. १६

देवास, १८९३ (?)

## ८ चिंवाचिंव चिमणी

चिंवचिंव चिमणी छतांऽत छतांऽत.
अरसा लोंबे भिंतीला भिंतीला.
चिमणी पाहे सवतीला सवतीला.
भरभर आली रागांत रागांत.

पहिलीः– "चिउताइ चिउताइ, काय् बघतां ? काय् बघतां ?"
दुसरीः– "टच् टच् चिउताइ, काय् करितां काय् करितां ?"

| | | |
|---|---|---|
| तिसरीः– | " ती तर तुमची पडछाया | पडछाया— " |
| चवथीः– | " उगीच शिणतां कां वाया | कां वाया ? " |
| पहिलीः– | " फुटेल काच्. " | |
| दुसरीः– | " दुखेल चोच्. " | |
| तिसरीः– | " पडेल खोऽच चोचीला | चोचीला. " |
| चवथीः– | " काऽय होइल सवतीला | सवतीला ? " |
| सर्वजणीः– | " टाळया वाजवुं या चट्चट् | या चट्चट्. |
| | पावूलें फिरवूं या पट्पट् | या पट्पट्. |
| | भुर्रऽ चिमणी उडाऽली | उडाऽली. |
| | छतांत जाउनि दडाऽली | दडाऽली. " |

देवास, १८९३ ]

## ९ पुंगीवाला

( १ )

[ वृत्त द्रुतविलंबित ]

नगर सुंदर एक महेश्वर,
जवळ उत्तर बाजुस डोंगर,
नदि अफाट भयंकर नर्मदा
खळखळाट तिथे करि सर्वदा. १

स्थळ सुरम्य नसे दुसरें असें
नगर भारतभूषण तें असे;
कथिन गोष्ट तुम्हांप्रति तेथली
घडुनि जीं शतकें नउ जाहली. २

( २ )

[ वृत्त उपजाति ]

सुखी असोनी जन तेथ एकदा
आली तयांच्या नशिबास आपदा,
तया पुरी उंदिर फार माजले
त्यांच्या अनर्थे जन सर्व पीडले. ३

भिती मनीं श्वान बघोनि त्यांना,
लीलेंच ते मारिति मांजरांना,
फराफरा ओढिति तान्हुल्यांना,
धावोनिया चावति बालकांना ! ४

मोठ्यांसही खाउं न घास देती,
ओढोनि हातांतुनि अन्न नेती;
कडाकडा फोडिति जाड माठ,
दुधादह्याची मग काय वाट ? ५

केले बिछाने पगड्यांमधून,
शाली नव्या टाकिति कुर्तडून;
चिंध्या बनोनी किति कापडांच्या
राशी पडाव्या किति रोज त्यांच्या ! ६

आल्या जरी चार घरास बाया
न सोय ती शब्द मुखें वदाया;
साधोनिया मंडळ भोवताली
दाटी करोनी मग एक काळीं ७

करोनि चीं चीं अति तीव्र घोर
गोंगाट देती उडवोनि थोर,
किति करावा दुसरा हमामा !
वर्णावया शक्ति न खास आम्हां. ८

( ३ )

[ वृत्त भुजंगप्रयात ]

बहू जाहले त्रस्त ते लोक सारे
मिळोनी तदा सर्व एक्या विचारें
निघे घोळका चावडीलागि त्यांचा,
गराडा पडे भोवताली जनांचा. ९

म्हणे एक कीं, मठ्ठ हे कोतवाल
करा रे कुणी यांस ऐसा सवाल:
"कशाला तुम्हांला जरीदार फेटे,
नटायाथटायास शेलेदुपेटे ? १०

पशांनीं तुम्हां ओतितों कीं पगार
न कांहीच याचा तुम्हांला विचार ?
अहो चालला आमचा येथ जीव,
न याची तुम्हां बूज, कीं ये न कीव ? ११

हवें लांबवोनी बसायास पाय,
सुचावा कसा उंदरांचा उपाय ?
मिजाशी पुरे ही; स्वकर्मास जागा,
चला उंदरांच्या उपायास लागा ! १२

हमामा = धिंगाणा. बूज = जाणीव.

पडूं द्या जरा त्रास त्या मस्तकास
वळूं नातरी आपली मोट खास ! ”
असे शब्द येतांच कानीं जलाल
भयें जाहले पांढरे कोतवाल ! १३

( ४ )

[ जाति लवंगलता ]

बघा जरासे मुखाकडे त्या अतां कोतवालांच्या,
कसें दिसे भयचकित वासलें ! बसली त्यांची वाचा ! १४

आधिंच मुख तें जसें ठेविलें माठावरि टरबूज,
वर्तुळ झालें शरीर, चढली जणों चहुंकडे सूज. १५

काय नयन निस्तेज, शिंपली जुनी मलिन ती जेवी.
बघुनि मात्र रसभरित ताट ज्या झळक नवी उजळावी. १६

भयें फाडिले तेच बघावे आतां त्यांचे डोळे,
कसे दिसति बटबटित बटाटे की मेदाचे गोळे. १७

बराच जातां वेळ हळुहळू वाचा फुटे तयांस
म्हणति, “ नको ते शेले तुमचे, पुरवे मज वनवास ! १८

काय करावें ? उपाय न सुचे, करितों किती विचार,
भणाणलें हो शिर हें माझें ताणुनिया निःसार. १९

काय वेंचतें ‘ उपाय काढा ’ ऐसें मुखें वदाया ?
सुलभ बोलणें परी न सोपें स्वकरें कृती कराया ! २०

मेद=चरबी

पिंज्रा तरि "—वदणार पुढें तों पट्पट् वाजे दारीं—
बघा दचकले कोतवालजी, घाबरली ही स्वारी ! २१

काय वाजलें पाउल ? कीं हे आले उंदिरमामा ?
उंच करोनी मान पाहती सारुनि साऱ्या कामा ! २२

( ५ )

[ जाति दिंडी ]

बघति टकमक हे सकल नयन काय ?
मूक व्हाया काय या मुखां होय ?
कुठुनि येई ही मूर्ति अति विचित्र ?
कोण रेखाटूं शके इचें चित्र ? २३

रंगिबेरंगी झगा पायघोळ
लाल पिवळा अति सैल, पडे झोळ;
अंगकाठी किति रोड, उंच काळी,
उरीं केसांची दाट झुले जाळी. २४

तीक्ष्ण लोचन अंगार पेटतात,
मिशा दाढी उभयतां भेटतात;
अधिंच त्याचें भाल तें भव्य मोठें,
वरी भस्माचे ओढले फराटे. २५

शेंदुराचा वरि तिलक रसरशीत,
नयनिं तिसऱ्या जणुं अग्नि धगधगीत,
दोन्हि कानीं रुद्राक्ष डोलतात,
रुळे स्फटिकाची माळ ही गळयांत. २६

खणन् खणके लोखंडि कंकणाची
जोड डाव्या हातांत सैल साची,
मुखीं उजळे मृदु हास्य, मावळेही;
मूर्ति कोठिल कोणा न आकळे ही. २७

तया पुरुषा, वेषास चित्र त्याच्या
बघुनि बोले कुणि पौर अशी वाचा;—
काय कोणी हे पितर अवतरोनी
इथे स्वर्गाहुनि येति का वरोनी? २८

( ६ )

[ वृत्त उपजाति ]

किंचित् पुढें तो सरसावुनीया
बोले जनांला नर हासुनीया,
" प्रभाव माझा न तुम्हांस ठावा,
माझ्या मुखें मींच कसा कथावा? २९

जे जे जगीं जन्मति जीव-जात,
त्यांचें असे जीवन ह्या करांत;
जे रांगती, चालति, धावती जे,
जे पोहती कीं उडती नभीं जे, ३०

आकर्षुनी त्यांस मनाप्रमाणें
मी नाचवीं जादुचिया बलानें
त्यांच्यावरी जादु करीं परंतु
जे त्रास देती जगतांत जंतू— ३१

जे व्याघ्रसिंहादिक जीव हिंस्र
कीं गोमसर्पादि दुजे सहस्र.
ठावा जरी मी न असें तुम्हांला,
प्रख्यात मी गारुडि पुंगिवाला!" ३२

काखेंतुनी काढुनि पुंगि हाती
पुढें करोनी फिरवी जरा ती;
पुंगी अशी दृष्टिसमोर आली,
झग्यामधें आजुनि जी दडाली. ३३

बोटें तयाची स्फुरतात भासे
तीं वाजवायास जणों विलासें!
परी दिसे मूकाचि शांत पुंगी,
आली निजेची जणुं तीस गुंगी. ३४

बोले पुन्हा तो मग त्या जनांला,
"गरीब हा मी जरि पुंगिवाला,
तार्तार-देशीं जधिं टोळ आले,
मेघावरी मेघ जसे निघाले, ३५

या पुंगिनें नाशुनिया तयांला
सुल्तान मीं तेथिल सोडवीला;
इराण-देशीं घुबडें निघालीं,
तान्ह्या मुलांची स्थिति घोर झाली! ३६

आला शहा काकुळतीस भारी,
पुंगीच ही संकट तें निवारी.
ज्यांचा तुम्हांला न सुचे उपाय,
त्या उंदरांची मग गोष्ट काय? ३७

नाशीन ते, मात्र करा विचार,
मोजून घे मी रुपये हजार "—
" हजार का ? मी परि लाख देतों "
तैं कोतवाल प्रभुजी वदे तो. ३८

( ७ )

[ वृत्त हेमकला ]

हासत गारुडि शीघ्र निघे जणुं जाणतसे निजमंत्रबळातें,
ते स्फुरती बहु ओठ, तसे कर फुंकुनि पुंगिस वाजविण्यातें,
चंचळ लोचन लाल निळे झळकूं मग लागति ते लवलाही
ज्योत जशी झळके बहु तीवर झोकियलें जर मीठ मुलांहीं. ३९

( ८ )

[ कटाव, जाति पादाकुलक ]

फुंकितां गीत पुगींत
किति चमत्कार मग झाला !
बहु विचित्र पुंगीवाला ! ध्रु०

चहुंबाजू पटपट ध्वनि उठे,
अफाट जणुं का सैन्य पुटपुटे,
क्रमें उंच हो घर्घर दाटे,
जणों सैन्य तें धावे वाटे.

ध्वनि दणाणला क्रमें भयंकर,
जणों धावती रथादि भरभर,
घरांमधोनी उंदिर नंतर
उड्या टाकिती किति वरचेवर !

येथुनि उंदिर, तेथुनि उंदिर,
दारांतुनि लुडबुडती उंदिर,
उंदिर खिडक्यांतुनी फडकती,
झरोक्यांतुनी टप्‌टप् पडती,

एकचि धांदल उडे मग किती !
एकावरुनी एक धावती
उंदिर काळे, उंदिर पिवळे,
उंदिर पिंगट, उंदिर ढवळे,

उंदिर करडे आणि सावळे,
उंदिर डोळस आणि आंधळे,
लठ, मठ्ठ, कोडगे, रोडके,
चंचल धावति वृद्ध-बालकें,

शिष्ट ऐटिनें डोलत चालति,
गुंड बंड ते नाचत निघती
किती शेपटें मजेंत फिरविति,
किती मिशांवर ताव चढविती,

आयाबापहि, सुना, सासवा,
चुलत्या, चुलते, नणन्दा, जावा,
मामा, मामे, भाऊ, बहिणी,
धनी आणखी गडी, कुणबिणी,

यापरि निघती कुळेंची कुळें
घेउनिया पाहुणे राउळे,
ज्यापरि सागरिं लाट जळावरि
वाट भरे नगरांत त्यापरी;

तरंग ज्यापरि हेलकावती,
वळवळ खळबळ उंदिर करिती,
अफाट ही उंदरांची सेना,
कोणिकडेही भुई दिसेना.

पुढें चालला पुंगीवाला
फुकित पुंगिंत मृदु गीताला;
मागुनि हा घोळका निघाला
नाचत, साच न उपमा त्याला—

जो तयांवरी ये घाला
स्वप्नही न त्याचें त्यांला ! ४०

( ९ )

[ वृत्त विबुधप्रिया ]

यापरी नगरांतले मग सर्व उंदिर घेउनी
ठाकतां क्षणिं गारुडी नदिच्या तिरावर येउनी,
घेति शीघ्र उड्या पटापट त्या नदीमधिं उंदिर,
लोपला निमिषांत संचय तो जळांत भयंकर. ४१

एक उंदिर त्यांतला अति धष्टपुष्टचि भीमसा
जाय पोहुनि नर्मदाजल पैलपार जसातसा;
गांठुनि अपुली विलायत बंधुंना निज भेटला,
सांगतां अपुली कथा बहु अश्रु-सागर लोटला. ४२

( १० )

[ जाति दिंडी ]

कथा सांगे यापरी निज सख्यांला,
“ नाद पुंगीचा गोड जधीं झाला.
फुटति नारळ हो ध्वनी गमे त्याचा,
मुरंब्याच्या बरण्याच उघडण्याचा ! ४३

जणों कोणी श्रीखंड फेणतात,
काय भांड्यांतुनि राब ओततात,
दुधा-लोण्याचीं उघडती कपाटें,
मधुर अन्नें भरतात कुणी ताटें ! ४४

फळें ताजीं परिपक्क अति रसाळ
रचुनि राशी करितात जणुं विशाळ,
जणों आमंत्रण करी अम्हां कोणी
मधुर मोहक काढोनि अशी वाणी— ४५

( ११ )

आमन्त्रण-मन्त्र

[ जाति अचलगति ]

या उंदरांनो ! या रे या !
सहपरिवाराचि सारे या !
मजा करा रे ! मजा मजा !
आज दिवस तुमचा समजा.

दूध, दही,
तूप, मही,
मधुर फळें
घ्या सगळे !

या ! बाजार भर दुनिया,
घ्याच हवें तें चाखुनिया.
या उंदरांनो, या रे या !
सहपरिवारचि सारे या ! ४६

मालटाल या रे उडुं द्या,
घडि न आजची परत उद्यां,
भले बहाद्दर ! खूप भिडा !
हवे तसे या, तुटुनि पडा !
आहारीं,
व्यवहारीं,
भीड नको.
भीति नको.

तर मग चंगळ उडवुनि द्या,
टंगळमंगळ सोडुनि द्या !
या उंदरांनो, या रे या !
सहपरिवारचि सारे या ४७

मही—लोणी.

मालटाल—पक्वान्नांची चंगळ.

( १२ )

[ जाति दिंडी ]

दिसे फाराचें विस्तीर्ण एक भांडें
तुडुंबोनी ज्यांतूनि पाक सांडे
कसें झळके, जणुं सूर्य! अम्हां बाहे,
घेउं जातों तों नदी उरीं वाहे." ४८

( १३ )

[ जाति लवगलता ]

आनंदी आनंद उडाला महेश्वरीं मग भारी,
जिकडे तिकडे ध्वजा फडकती, झडति चौघडे दारीं! ४९

जरा बघा तर कोतवालजीकडे, फुले मुख केवी!
हुकुमावर किति हुकूम सुटती, संचरली जणुं देवी! ५०

" सुतार आणा, गवंडि आणा, बुजवा छिद्रें सारी;
खूण न राहूं द्या उंदरांची, गुढ्या उभारा दारीं. ५१

करा सडा-सम्मार्जन, घाला रांगोळया रंगीत;
सणासारखा दिवस समजुनी गा मंगल संगीत. ५२

मिष्टान्नांचा थाट उडूं द्या घरोघरीं नगरांत,
पूर्वपुण्य ये उदया भाग्यें, सुख पडलें पदरांत!" ५३

प्रगटे अवचित ऐन रंगीं या मुख गारुडिबोवाचें!
म्हणे, " प्रथम ते हजार रुपये टाका मोजुनि साचे!" ५४

(१४)

[ वृत्त पृथ्वी ]

" हजार रुपये ! " असा ध्वनिच मात्र कानीं पडे,
जरा वळुनिया बघा त्वरित कोतवालाकडे,
कसें वदन जाहलें सकळही निळें जांभळें !
हजार रुपये ? कशी रकम गारुड्याशीं मिळे ? ५५

तिजोरि नगरोत्सवीं अधिंच ती रिकामी पडे,
हजार रुपये ? कशी रकम द्यावया सांपडे ?
कशास तरि गारुड्याप्रति भिकारड्या संप्रती
भरा रकम ? कां अधीं भरुं नये तिजोरीच ती ? ५६

कुशाग्र बहु बुद्धिचे खचित आमुचे अग्रणी,
उगीच डगतील का कधिंहि ते जिभेच्या रणीं ?
हळूच मिचकावुनी नयन हासुनी बोलती,
" स्वकार्य तर साधलें नदिमधें, न आतां भिती ! ५७

गिळोनि अमुची बसे सकल उंदिरां नर्मदा,
जगांत मृत जाहले, परत काय येती कदा ?
तथापि तुजला गड्या, कधिं न पाठवूं विन्मुख;
उदार पुर आमुचें सकलही जगा ठाउक. ५८

निमंत्रण तुला दिलें समज, आज ये भोजना,
तमाखु वर घे, तयावरिहि आणखी दक्षिणा;
अधींच नगरोत्सवीं सकल हो खजीना रिता,
उदारपण आणखी अधिक ये कसें दावितां ? ५९

धनाविषयिं बोललों, सकलही विनोदांत तें !
तुलाहि कळतां वृथा विचकतोस कां दांत ते ?
हजार रुपये तुला ? फुकट वाणिचें तांडव !
हजार ? चल जाउं दे, गणुनि घे पुरे पांडव " ६०

( १५ )

[ वृत्त शालिनी ]

झाला तेव्हां लाल तो पुंगिवाला,
आवेशानें बोलला कोतवाला,
" सोडा थट्टा, शीघ्र मोजा धनास,
नाही मातें वेळही थांबण्यास. ६१

जाणें आहे भोजना कंदहारीं,
पाहे माझी वाट तेथे अचारी,
झाले विंचू पाकशाळेंत भारी,
प्रार्थी मातें तो बिचारा अचारी. ६२

केला तेथे विंचवांचा विनाश,
पाचारी तो प्रार्थुनी भोजनास,
व्यापाराची गोष्ट नाहीं तयाशीं,
सोडीना मी एक पैसा तुम्हांशीं. ६३

आहे जाणा गांठ या गारुड्याशी,
चाले ज्याशीं ना कुणाची मिजासी;
गेली नाहीं वेळ पाहा अजून,
मोजा वाजे जों न पुंगी फिरून. " ६४

( १६ )

[ वृत्त शार्दूलविक्रीडित ]

बोले तो मग कोतवाल नटसा तत्काल संतापुनी,
“ रे नीचा, वद तूं उणें गणिशि का आम्हां अचाऱ्याहुनी ?
टेंभा गाजविशी भिकार डगला घालोनिया पुंगिचा,
केसा आठवला भिकार तुज हा चाळा तुझ्या हानिचा ? ६५

सोसूं कां वद बोल फोल तुजशा रे भामट्याचे कदा,
दारोदार फिरोनिया उदर तें ज्यानें भरावें सदा ?
धीटा, दाखविशी अम्हांस धमकी त्या पुंगिची बेसुर ?
जा जा फुंकचि फुंक ! फुंकचि फुटे जों तें तुझें रे उर ! ” ६६

( १७ )

[ जाति लवंगलता ]

फिरुनि अवतरे मार्गावर तो भरभर पुंगीवाला,
श्रवण–मनोरम फुंकित पुंगिंत मधुर मधुर गीताला. ६७

ध्वनी तीन नच गुणगुणले तों काय चमत्कृति थाटे,
सळसळ हो रव, जणों उसळली लाल नदी वर वाटे ! ६८

झटपट पटपट पाय आपटत, पुटपुट करित मुखानें,
खटपट वटवट टाकुनि चटचट टाळ्या पिटित करानें, ६९

नाचत भरभर मुलें चिमुकलीं निघती आनंदानें,
गरगर फिरती मधुर पांखरें जशीं उधळतां दाणे. ७०

रुळती कुरळे केस, झळकती मधुर गुलाबी गाल,
दांत झळकती, हिरे तळपती चंचल नयन विशाल ! ७१

मधुर मनोहर गीत वाजवित चाले पुंगीवाला,
मुलांमुलींचा एक घोळका मागुनि शीघ्र निघाला. ७२

( १८ )

[ जाति भूपति ]

जन सकल जादुनें विकल ठिकाणीं खिळले,
वद्वे न, न हलवे, जणुं चित्रें ते बनले. ७३

टकमका पाहती फुका चालली बाळें
ज्या बाजुस फुंकित पुंगी गारुडि चाले. ७४

यापरी जाहल्यावरी स्थिती मग हाय !
करणार बापुडे कोतवाल तरि काय ? ७५

धडधडे उरीं, यापुढें काय होणार ?
का सकल सोनुलीं टाकुनि हीं जाणार ? ७६

नदिकडे जधीं सवगडे सकळही वळले
तधिं सकल मुखांचें पळांत पाणी पळलें. ७७

परि जधीं टाकिली नदी वाम अंगास
तधिं जिवांत आला जीव, फुटे मनिं आस ! ७८

गारुडी घेववी उडी कसा नदिमाजी ?
का सकल बालगोपाल वधिल हा आजी ? ७९

भरभरा करोनी त्वरा गारुडी चाले,
डोंगराजवळ समुदाय मुलांचे आले. ८०

नच खास उंच शिखरास लंघितिल बाळें,
यापरी मूक जन मनांत म्हणते झाले. ८१

थांबतां पुंगि ही अतां भेटतिल बाळें,
हें मनांत येतां आनंदाश्रू आले. ८२

परि हाय ! होय हें काय ? केवढें दार
डोंगरांत उघडे ! कोण आंत अंधार ! ८३

फुंकीत गीत पुंगींत शिरे हा आंत
गारुडी; सकळ हो मुलें हरपली त्यांत ! ८४

मग पळें दार लागलें, चहुंकडे शांत
जाहलें, उडाला पुरिं एकच आकांत ! ८५

परि बाळ एक पांगूळ त्यांतलें उरलें,
नच पोचूं शकलें, खिन्न मागुतें फिरलें ! ८६

" कां मुला, खिन्न तूं ? तुला काय तरि झालें ? "
हें तयास पुसतां, दीनवदन तो बोले, ८७

" टाकुनी मला येथुनी सवगडी गेले,
त्या दिवशी मुकलों सकल सुखाला अपुले ! ८८

स्मरणीय सकल रमणीय वस्तु ते बघती,
त्या कोठुनि आतां या दुर्भाग्या दिसती ? ८९

आजुनी स्मरे तो ध्वनी पुंगिवाल्याचा,
दे वचन असें तो कैवारी बालांचा. ९०

( १९ )

## आमन्त्रणमन्त्र

[ जाति अचलगति ]

या बालांनो, या रे या !
लवकर भरभर सारे या !
मजा करा रे ! मजा मजा !
आज दिवस तुमचा समजा.
स्वस्थ बसे
तोचि फसे;
नवभूमी
दाविन मी,
या नगराला लागुनिया
सुंदर ती दुसरी दुनिया.
या बालांनो ! या रे या !
लवकर भरभर सारे या ! ९१

खळखळ मंजुळ गाति झरे,
गीत मधुर चहुंबाजु भरे;
जिकडे तिकडे फुलें फळें,
सुवास पसरे, रसहि गळे.
पर ज्यांचे
सोन्याचे
ते रावे
हेरावे.

तर मग कामें टाकुनिया
नवी बघा या ही दुनिया !
या बालांनो ! या रे या !
लवकर भरभर सारे या ! ९२

पंख पाचुचे मोरांना,
टिपति पांखरें मोत्यांना,
पंख फडकती घोड्यांना,
मौज दिसे ही थोड्यांना.

चपलगती
हरिण किती !
देखावे
देखावे.

तर मग लवकर धावुनिया
नवी बघा या ही दुनिया !
या बालांनो, या रे या
लवकर भरभर सारे या ! ९३

( २० )

[ जाति भूपति ]

"वाटलें व्यंग आपुलें जाय पायाचें
तों पुंगि थांबली, तोंड मिटे शिखराचें. ९४

कुणिकडे सकल सांपडे सौख्य तें आतां ?
भंगले मनोरथ; कांहिं न आलें हातां !" ९५

( २१ )

[ जाति कोकिला ]

महेश्वरीं आकांत उडाला
तेंहि सांगणें येइ कपाळा,
हळहळतो जन जिकडे तिकडे दुःखचि सकळांला ! ९६

एक म्हणे की मुलगा गेला,
दुजी म्हणे नेलें नातेला,
एक म्हणे कीं लेक हरपली काय करूं याला ? ९७

चहू दिशांना हेर निघाले,
कोतवाल तो त्यांना बोले,
" शोधुनि आणा पुंगीवाला आणिक ती बाळें ! ९८

सांगा तोंडीं बहु विनवोनी,
' मन माने तों धन घे गणुनी
हिरे, माणकें, मोत्यें, सोनें, परि बाळां आणीं ! " ९९

विफल सकल परि यत्न जाहला,
पुंगीवाला नच सांपडला,
तेव्हां रडती हात हाणुनी अपुल्या भालाला. १००

सदा सुखी ह्या कोण जगांत ?
साधूक्ती ही येइ मनांत
धिक् धिक् जीणें धनवंताचें बालाविण त्यांत ! १०१

शके नऊशें एकुणतीशीं
आश्विन शुक्ल पंचमी दिवशीं
आली समजा गोष्ट घडोनी खेदजनक ऐशी. १०२

तेव्हां नवशक सुरू जाहला,
अजुनी बघतां दिसे तुम्हांला
त्या काळांतिल लेखांवरती अंतीं लिहिलेला. १०३

ज्या मार्गानें मुलें निघाली
नांव दिलें त्या ‘ गारुडिआळी ’
ख्यात असे तें नगरामध्यें अजुनी या कालीं. १०४

तेथे वीणा, वेणू, सनई
वाजविण्याची सक्त मनाई
फिरवुनि देई कोतवाल तो ह्यापरिची द्वाही. १०५

कैशीं बाळें लुप्त जाहलीं
स्तंभावर ही कथा कोरिली,
उभा असे तो साक्ष द्यावया स्तंभहि या कालीं. १०६

चावडीवरी चहुबाजूंला
शिलालेख हा ठळक कोरिला
विलायतेमधिं अजायब-घरीं अजुनि ठेविलेला. १०७

( २२ )

[ वृत्त भुजगप्रयात ]

असे चीन देशामधें एक जात
निराळी तिची त्या स्थळीं रीतभात,
निराळें तिचें रूप तैसाच वेष,
बघोनी जनीं बोलवा ही विशेष. १०८

कुणी एकदा भूमिच्या गूढ पोटीं
मुलें कोंडिलीं भारतीं सान मोठी;
तयांची असे संतती येथ आली;
न ठावी परी त्या कशी कोण कालीं! १०९

... ... ... ..

( २३ )

[ वृत्त शार्दूलविक्रीडित ]

राहूं चोख 'मथे', म्हणूनि जगती तूं मीहि साऱ्यांसह,
मुख्यत्वें परि गारुड्यांसह मुली, ह्या पुंगिवाल्यांसह;
पुंगी वाजवुनी हिरोत मग ते उंदीर कीं मांजर,
पाळूं आपण आपलें वचन गे आधीं दिलें त्यां जर. ११०

प्रथमलेखन देवास, १८९४
पुनर्लेखन इंदूर, १९०१ ]

## १० यापरी असे जीवन

[ जाति घनराजी ]

यापरी असे जीवनऽ सखे गे, चंचल अमुचे क्षण. ध्रु०

ते संध्यामेघावरी
चमकती किरण पळभरी,
परि जाति कुणिकडे सांग अम्हांला चटका ते लावुन ?
यापरी असे जीवनऽ सखे, अम्हि मोह घालतों पण. १

घनराइमधें कवडसा
तरु हलतां डुलतो कसा !
परि जाइ कुणिकडे सांग सखे, रवि कलतां स्थानांतुन ?
यापरी असे जीवनऽ सखे, अम्हि हलतों डुलतों पण. २

दलदलीमधें ज्योति ती
बहुवर्णी ठुमकते किती !
ती निजते उठते, सांग कुणिकडे जाइ गुप्त होउन ?
यापरी असे जीवनऽ सखे, अम्हि नटतों थटतों पण. ३

घनपटल क्षण भेदुन
ये ज्ञानकिरण तेथुन;
तो दिसेचि, न दिसे पुन्हा, नभाला तम टाकी व्यापुन.
यापरी असे जीवनऽ सखे, त्यावरी भरवसा पण. ४

तेजाच्या ज्या सागरीं
लीन तेज कथिलें वरी
जायचें अम्हां त्या घरीं तरि न बघुं असुनि अम्हां लोचन
यापरी असे जीवनऽ परि सदा ठेव म्हणुन लोचन. ५

देवास, १८९४-९५ (?)

## ११ ठावा न सुखाचा वारा

[ जाति भवानी ]

जिवलगे, संगिं मम सारा
दुःखाचा मात्र पसारा !
जुंपलिस सदा संसारा,
ठावा न सुखाचा वारा. ध्रु०

सांखळी, सरी, पाटली आणुं कोठली तुझ्या शृंगारा ? १
कोठला जिवलगे, शालु तुला मी घालुं ? विसर मणिहारा. २
पातळें जरी पैठणी तुला कोठुनी ? नसे यां थारा. ३
दिनरात्र मात्र काळजी, सदा व्याळि जी ओति विष-धारा. ४
हृदयाहुनि दुसरें काय द्यावया ? हाय ! तेंहि अंगारा ! ५

देवास, मार्च १९०० ]

## १२ गुराख्याचें गाणें

[ जाति समुदितमदना ]

कुरणावरती वडाखालती गाइ वळत बैसतों
स्फटिकापरि निर्मळ हा खळखळ झरा जवळ वाहतो. ध्रु०

पावा फुंकुनि मंजुळ नादें रान भरुनि टाकितों,
आनंदानें डोळे भरतां प्रभुजीला प्रार्थितों.
गाईमागें रानोमाळीं शीळ भरत हिंडतों,
दऱ्यादऱ्यांतुनि रान-ओहळावरी मौज मारितों.

उन्हाची भीती कवणाला ?
पाउस काय करिल मजला ?
भितों मी कोठें थंडीला ?
श्रीमंतापरि गरिबा कोठे वारा तो दुखवितो ?
देवाजीवरि सदा हवाला टाकुनि मी राहतों. १

तृषा लागतां नीर झऱ्याचें ओंजाळिनें मी पितों,
क्षुधा लागतां कांदाभाकर यथेच्छ मी जेवितों.
फिरतां फिरतां करवंदें हीं तोडुनि मी भक्षितों,
काठीनें मी कांटे दाबुनि बोरेंही तोडितों.
धनिका ताट रुप्याचें जरी,
पांचहि पक्वान्नें त्यावरी,
नाहीं गोडि मुखाला परी.
गाईसंगें हिंडुनि रानी थकुनि सुखें जेवितों,
जाडें भरडें खाउनि धनिकाहूनि अधिक तोषतों. २

पुच्छ उभारुनि थवा गाइंचा ज्या वेळीं नाचतो,
मोरमुगुटबन्सीवाल्यापरि उभा मौज पाहतों.
ओहळावरी थवा तयांचा पाणी जेव्हां पितो,
उभा राहुनी प्रेमें त्यांना शीळ अहा घालितों !
कशाला मंदिल मज भरजरी ?
घोंगडी अवडे काळी शिरी,
दंड करिं गाइ राखण्या, परी
कुवासना घालिति धिंगा तो महाल मी टाकितों
गाईसंगें हवेंत ताज्या नित्याचि मी राहतों. ३

क्रोध, काम, मद, मत्सर यांहीं गांव सदा गर्जतो
दूर टाकुनी त्यांस शांतिनें सुखें दिवस लोटितों.
समाधान हा परिस अहा ! मज रानांतचि लाभतो,
दुःखाच्या लोहास लावितां सुखसोनें बनवितो.

चढल्या पडावयाची भिती;
गरिबा अहंकृती काय ती ?
काय करि त्याचें खोटी स्तुती ?

परवशतेच्या बिड्या रुप्याच्या पायांत न बांधितों,
निज हृदयाचा धनी धरणिचें धनित्व अवमानितों. ४

पचमढी, मे १९०२ (?)

## १३ कांतेस

[ वृत्त शार्दूलविक्रीडित ]

कांते, या जगतीं जरी मिरविती लावण्यगर्वाप्रती
कोट्यादी युवती तरी न तव ती लाभे तयांना मिती,
नेत्रां या दिसती न त्या तुजपरी, लाजे जरी त्यां रती,
प्रेमांधत्व म्हणोत या जन, रुचे अंधत्व ऐसें अती. १

लोकीं मोहविती शशी, कमलिनी, रत्नें असें सांगती,
ओवाळीन तुझ्यावरोनि सकलां नाहीं तयांची क्षिती;
त्वत्प्रेमें कमलास ये कमलता, इंदूस इंदुत्व ये,
रत्ना रत्नपणा, तुझेविण असे निस्सत्त्व सारें प्रिये ! २

जादूनें जन वेड लाविति नरां ऐसें कुणी बोलती,
सारे ते चुकती जरी न नयनीं जादू भरे या अती;
कांते, तूं असशी खरी कमलजा, अन्या न मी ओळखीं,
सारा सद्गुणसंघ बिंबित तुझ्या आदर्शरूपी मुखीं. ३

द्यावें आयु मला तुझ्यास्तव करीं ऐसा प्रभूचा स्तव,
त्वद्भिन्ना वसुधा न योग्य बसण्या कीं उग्र हा विस्तव !
कांते, तूं अधिदेवताचि गमशी रम्याकृतींची मला,
दृष्टिक्षेपिं यदीय काव्यरस हा प्रत्येकिं ओथंबला. ४

दिव्ये, काव्यमयी प्रिये, सुहृदये, मज्जीवितैकेश्वरी,
मच्चिताश्रमखेदनाशिनि, सखे, मत्सौख्यतेजस्सरी,
ती सप्रेम विलोकितां, वदत हें, कांता उरीं लाविली,
त्याचें तत्त्व कळे तुलाच सखया, ज्या सत्प्रिया लाभली. ५

इदूर, ता १३ मे १९०२ ]

## १४ ती रम्या रजनी

[ वृत्त शार्दूलविक्रीडित ]

चंद्रानें गगना पयोधवलशा वाटे रसें व्यापिलें,
कांतेनें पहिल्या रसोंचि हृदया या टाकिलें व्यापुनी;
नक्षत्रें गगनीं वरी तळपती रत्नें, जुईचीं फुलें–
तेजःपुंज विचार शीतल मृदू या द्योतती मन्मनीं. १

ऐशा रम्यमयी प्रमोदसमयी सौधावरी मंचकीं
बाहू घालुनि बाहुमाजि बसलों दोघें अम्ही एकदा,
नेत्रीं प्रेममयीं विलोकुनि बहू आलिंगुनी तैं सखी
बोलें मी, "प्रिय वल्लभे, हृदय तूं, तूं जीव, तूं संपदा!" २

माळा घालुनि बाहुंची मम गळां बोले तदा अंगना,
"नाथा, प्रीति सदा अशीच असुं द्या दासीवरी नम्र या,
आहे ही इतुकी विनंति, दुसरी कांहीं नसे याचना,
शालू प्रीति च, शाल ती, कनक ती, रत्नें हिरे ती प्रिया! ३

स्त्रीजातीस पतीच दैवत खरें, सर्वस्व तें आमुचें;
नाथा, जाइल काळ हा निघुनिया, जाईल हें यौवन.
घाली मोह तुम्हांस सांप्रत असें कांहीं न राहील जें,
चंद्राला क्षय लागणार समजा आतां उद्यांपासुन. ४

कांता, वृत्ति नसो म्हणोनि तुमची सौख्यक्षणप्रेरित,
जावो ती विलया न, जाइल जसा वेगें सख्या, हा क्षण!"
नेत्री प्रेमळ अश्रु पाहुनि सखी एकाकि मी चुंबित
लावीं घट्ट उरीं, वदें न, मुख हें मद्भाव सांगे पण ५

नक्षत्रें गगनीं जई तळपती, ये दिव्य तारापती,
तेव्हां मत्स्मृतिदेवता प्रकटवी आजूनिही तो क्षण
ती रम्या रजनी, पयोधवल तें आकाश, तो सौध, ती–
प्रीतिज्योति सखी, विलोल नयनीं तें वारि, तें चुंबन! ६

इंदूर, ता १५ मे १९०२ ]

## १५ संध्यातारक

[ दिंडी ]

रवी जातां जातांच मंदिरातें
कोण डोकावुनि नभांतुनि पहातें ?
नभःसलिलीं का नील, करीं केली
रती येई ? एकटी कशी आली ? १

काय फुलली नलिनीच वरि सरी हे ?
काय मधुपाची वाट पाहताहे ?
देवललनामणिहार गळोनीया
मणी पडला एकला अंगणीं या ? २

रत्नकंदुक कीं काय हा स्मरानें
दिला झोकुनि गगनांत विहारानें ?
रोविली ही भरजरी का पताका ?
अमल रजनीराणिचा सुचविते का ? ३

अहा ! संध्यातारका, द्युलोकीं तूं
वसशि परि तूं भूतलीं सौख्यहेतू,
एकवटला अनुराग तुझ्या ठायीं,
अहा प्रीतिज्योतीच पाजळे ही ! ४

प्रणयतारक तूं, तुला गगनलोकीं
नयन वळवुनि सोत्कंठ जन विलोकी;
विरहपीडित युवतीस निजपतीशीं
जुळुनि आशीर्वच नित्य लाभतोशी ५

आणिशी तूं मधुपास कमलिनीतें,
तसा हंसा आणिशी हंसिकेतें;
धेनु हंबरडे देत घरा येती,
बघुनि वत्सांतें मुदित मनीं होती. ६

कृषक उत्सुक तो वाट तुझी पाही,
बघुनि तुजला गगनीं न हर्ष राही;
ठेवनीया आउतें तो प्रियेला
श्रांत लंघित पथ येइ भेटण्याला. ७

विलोकोनी सप्रेम का वरोनी
बोलशी तूं सकलांस मधुर वाणी ?
'चला थकलां बहु झटुनि दिवस सारा,
सखीसह घ्या विश्रांति सौख्यसारा. ८

हल, तराजू, लेखणी अतां ठेवा,
ढोल, मुरली आणखी बीन सेवा;
त्यजुनि वटवट, गा मधुर मधुर गाणें,
रमुनि रमणीसह झोप सुखें घेणें.' ९

हाय जाऊं मी कुठें परी सांग,
असे माझा कोणता सांग मार्ग;
असे सुंदरि येथोनि दूर हाय !
मला सदनीं जाउनी लाभ काय ? १०

इंदूर, ता. २० मे १९०२ ]

## १६ घटोत्कच-माया

[ जाति युवतिभूषण ]

घटोत्कच-माया    पसरली हिंददेशीं या    ध्रु०

“जुनें जुनें तें सर्वहि द्या द्या,
नवें नवें तें पाहुनि घ्या घ्या,
आलें दुरुनी चालुनि बुद्ध्या
तुम्हां सुखवाया    निरभिलाष झिजवी काया    १

जुनें जुनें तें सर्वहि द्या द्या,
द्या द्या कुजक्या गिर्‍या, गाद्या,
काढा कचरा, सार्‍या चिंध्या;
कागद घ्या, या    तुळतुळित साफ पाहुनिया.    २

हाडे आणिक कातडिं द्या द्या,
चाकू, बटन, फण्या हीं घ्या घ्या !
जिनें, पाकिटें, बूटहि, वाद्या,
किती सुंदर या    झकझकीत वस्तू सार्‍या !    ३

कापुस, लोकर यांचे भारे
काढा देशांतुनिया सारे,
द्या द्या आणा हें पोतेरें,
तनू सजवाया    शेले आणि शालू घ्या या    ४

वस्त्रें देशी जाडीं भरडी
जैशी बुरडाघरची परडी,
रुतती कांस्यांपरि अति हाडीं.
शिणवितां वाया    कां सुंदर कोमल काया ?    ५

काठीला बांधोनी सोनें
काशिहुनि रामेश्वरिं जाणें,
शस्त्रें भार! शिरीं कां घेणें?
कां हो वाया धडपडतां तनु झिजवाया?" ६

मंत्रें या साखर पेरोनी
नजरबंदिची करुनी करणी
गारुडिणी ही वेड लावुनी
नागवी साऱ्यां, राहुं दे न अन्नहि खाया. ७

घाली ऐसें मोहिनि-अस्त्र,
घोरूं दिवसां अम्हि सर्वत्र,
जाणुनि उमजुनि निजतों; चित्र
काय याहुनिया? ये कोण जागृती द्याया? ८

आलस्यीं अम्हि झालों चूर,
चढला डोळ्यांवरती धूर,
माजे देशभरी काहूर,
नेत्र फिरवुनिया कोणास सवड पाहाया? ९

ऐशी वेतालिनिची स्वारी
माजविते थयथयाट भारी;
सह अक्काबाईची फेरी;
विकट करि हास्या निज अस्त्र विजयि पाहुनिया. १०

लाभ कोणता येथे रडुनी?
कोण ऐकतो कान देउनी?
वाग्देवी गे, बसलिस रुसुनी
कोणत्या ठायां? धावुनि ये स्वगृहीं समया! ११

इंदूर, ता. २४ मे १९०२ ]

## १७ आशा, शब्द आणि दर्शन

[ वृत्त स्रग्धरा ]

पातालांतूनि येतां वरवर गगनीं सिंधुमाजी जहाज
पाहीं कांता वियुक्ता धवलतर अती शीड, आशा मनाची
जागे कीं कांत आतां खचित मजशि दे गाढ आश्लेष आज;
आशा, येतां निशा, ही मम मनिं चमके तेवि त्वत्संगमाची ! १

साहारीं चंडतप्तीं अविरतचि सदा हिंडतां खिन्न गात्रीं
श्रांता पांथा तृषार्ता झुळझुळ रव तो मोहवी निर्झराचा,
तैसा त्वन्नूपुराचा श्रुतिमधुर अती शब्दही मध्यरात्रीं
ओढी मच्चित्त सारें, श्रवणगत करी इंद्रियें पंच साचा. २

प्राची येतां उषःश्री पळ पळ उमले पद्मिनीतुल्य रम्या,
रागें व्यापोनि टाकी कनकसम नभा, श्रीस नाहीं तुला तीं;
कांते, त्वन्मूर्ति येतां अनुपम शयनागार लागे खुलाया,
जों अंतर्बाह्य सारें कनकमधुर हो फाकुनी दिव्य कांती. ३

इंदूर, ता २६ मे १९०२ ]

# १८ सत्प्रीतिमार्ग

[ जाति समुदितमदना ]

कडकड कडकड तडित् कडाडे, जळतें नभ का तरी ?
तद्घातें कडकडोनि पडती तरु मोडुनि भूवरी.
प्रचंड हा घनघोर दुमदुमे ध्वनि व्योमाभीतरी,
प्रळयकाळ ओढवला वाटे भयाण ही शर्वरी.
कोण असे अंधेरी झुकली घन ही गगनांतरीं !
कोसळतें नभ काय ! पडति जलधारा मुसळापरी
हें जिकडे तिकडे जळमय झालें दिसे,
भूसरिता यांचा भेद न उरला असे,
थरथरा कांपती भ्याले तरुगण जसे !
त्वेषानें अति फों फों शब्दें फोंफावति निर्झरी,
फूत्कारति का कुटिल नागिणी जग गिळण्या स्वोदरीं ! १

जेव्हां दडती सिंहव्याघ्रहि भिउनी गिरिगव्हरी,
घूकससाणे पक्षी दडती पुराणतरुकोटरीं;
घोर भयंकर मध्यरात्रिच्या ऐशा या अवसरीं
कोण झपाझप पाउल टाकित चाले विपिनांतरीं ?
रेखाग्र न या प्रळयभीतिची छाया वदनावरी,
खांचा, कांटे, सर्प गणीना, कोण असावें तरी ?
का वनदेवी ही निर्भय वनिं संचरे ?
का चपलामूर्तिच भूवरि या अवतरे ?
का वृष्टिदेवता निजकृति पाहत फिरे ?
झमकन् चपला चमके, परि वरि घन भूवरचे गिरी
दैत्य कसे झुंजति दावी, नच मार्ग दावि ते परी. २

जीस उपवनीं फिरतां कुसुमें रुतती कांट्यांपरी,
श्वान भुंकतां दूर भयें जी होय घरीं घाबरी,
केवळ नाजुक भीरु अबल ती गृहभूषण सुंदरी
निजवल्लभशोधार्थ चालली भयाण या अवसरीं.
कां चपले, व्यर्थचि शिणविशि तूं आपणा ?
कां घना, विफल तूं करिशी रे गर्जना ?
कां भिववुं पाहतां ऐसे प्रणयी जना ?
रोधुं नका सत्प्रीतिमार्ग, व्हा दूर तुम्ही झडकरी !
काय कळेना तुम्हां जगीं या काय प्रीति न करी ? ३

इंदूर, ता १० जुलै १९०२ ]

## १९ वदन मदनरंगसदन

[ जाति मदनरंग ]

वदन मदनरंगसदन हें त्वदीय सुंदरी,
नयन रंगभूमि तिथे नटत तो नटापरी. ध्रु०

पापण्याचि पट नटवर नर्तनपटु करुनि दुरी,
नवरस तो नर्ति तिथे थक्क तो मला करी ! १

विविध तो करी विलास भूषवोनि त्या करीं;
कधिं चपलेसम चमके; स्थिर कधीं ध्रुवापरी. २

कधिं रुसेहि; कधिं हासे, स्तब्धता कधीं धरी,
मृदुल किरण सोडी कधिं बाण कधिं अम्हांवरी. ३

कधिं गुलाल तो झोकी, विनोद या परी करी,
अमृतधार कधिं वर्षी, अश्रुधार कधिं धरी. ४

होतां विधि–नभ घनयुत, तिमिर वर्षतां परी
वितरि विमल तेज; कळे योग्यता तदा खरी ! ५

इंदूर, ता. १६ जुलै १९०२ ]

## २० कां रे जाशी मज त्यजुनी ?

[ जाति हरिभगिनी, राग विहाग ]

कां रे जाशी मज त्यजुनी ? ध्रु०

तुजसाठीं मीं जनका त्यजिलें, त्यजिली माझी प्रिय जननी.
तुजसाठीं मी स्वसुखा भुललें, जपलें तुजला दिनरजनीं. १

विश्वासानें हृदय दिलें हें; कैशी करिशी ही करणी ?
वैभवकालीं जमलिं पांखरें; स्थिर मी, गेलीं तीं उडुनी. २

तव सुखदु:खीं स्थिर जी अबला त्या मज टाकिशि कां म्हणुनी ?
धरिली तूझी कांस सख्या, मीं; तनमन अर्पियलें चरणीं. ३

अपराधहि तरि काय असा मम ? लोटिशि मजला तमिं गहनीं !
प्रथम पेरिली साखर कैशी ! हा हा ! फसलें तव वचनीं ! ४

कठिण कसें हें हृदय तुझें रे ? नाहीं माया काय मनीं ?
निश्चल गिरिसम केवि उभा तूं ? जाती माझे असु निघुनी ! ५

प्राणसख्या, कां फिरविशि डोळे ? ओढिति असु ते कुडिमधुनी.
फोडुनि पाहीं हृदय अर्धी हें भरलें प्रेमें किति अजुनी ! ६

ओत, पाज विष ! भीशि कशाला ? याहुनि वधणें काय जनीं ?
तुजवांचुनि मी केवि जगुं जगीं ? बुडविन दुःखा मी मरणीं. ७

इंदूर, ता. १७ जुलै १९०२ ]

## २१ तीनी सांजा सखे, मिळाल्या

[ जाति पतितपावन ]

तीनी सांजा सखे, मिळाल्या, देई वचन तुला
आजपासुनी जिवें अधिक तूं माझ्या हृदयाला. ध्रु०

कनकगोल हा मरीचिमाली जोडी जो सुयशा,
चक्रवाल हें पवित्र, ये जी शांत गभीर निशा,
त्रिलोकगामी मारुत, तैशा निर्मल दाहि दिशा—
साक्षी ऐसे अमर करुनि हे तव कर करिं धरिला. १

स्वकरें तरुवर फुलें उधळिती, प्रीति-अक्षता या;
मंत्रपाठ हा झुळझुळु गातो निर्झर या कार्या;
मंगलाष्टकें गाति पांखरें मंजुळ या समया;
सहस्रकर दिनकर हा स्वकरें उधळि गुलालाला. २

नाद जसा वेणूंत, रस जसा सुंदर कवनांत,
गंध जसा सुमनांत, रस जसा बघ या द्राक्षांत,
पाणि जसें मोत्यांत, मनोहर वर्ण सुवर्णात,
हृदयीं मी सांठवीं तुज तसा जीवित जों मजला. ३

इंदूर, ता. १८ जुलै १९०२ ]

## २२ बुल्बुलास

[ जाति मंजुला, राग पिलू ]

उगिच काय बुल्बुलाऽ, शिणविशी गळा ? ध्रु०

भरुनि तान कोमला
रिझवितोस कां मला ?
दगड रिझव जा, तुला
साधतां कला. १

उगिच कंठ फोडिशी,
हृदय मात्र फाडिशी,
रमणि-वाणि आणिशी
स्मरणिं मंजुळा ! २

उकलिते इथे कळी
नच गुलाबपाकळी
जी धरील हृत्स्थळीं
गीति कोमला. ३

मधुर येथली कळी
कधिंच जाण वाळली,
चुकलि दृष्टि का खुळी ?
बघशि कां मला ? ४

बघशि कंटका मला ?
रुतुनि मात्र कोमला
तनु करीं न विव्हला—
पळ ! न हो खुळा. ५

प्रीतिचा सुके झरा
हृदयिं, देइं उत्तरा
कवण ? जा करीं त्वरा
उडुनि सुस्थळा, ६

उपवनीं जिथे किती
नव गुलाब हासती,
दे झराहि हुंकृती
झुळुझुळू तुला. ७

सदन हें श्मशान गा !
काष्ठ मी, रहा उगा.
भुलुं नको, न येथ गा;
परत आपुला ! ८

तुझि कट्यार चोच ती,
हृदयिं तीव्र खोच ती !
पोचवीं जिथे सती
झणिं सख्या, मला. ९

इंदूर, ता. २० जुलै १९०२ ]

## २३ हृदय सांग चोरिलें कशास सुंदरी ?

[ जाति कुसुमबाण, राग भैरवी ]

हृदय सांग चोरिलें कशास सुंदरी ?
देऽ! दे न देशि तरी दे तुझें तरी ! ध्रु०

नयनिं धूळ घातली
गुंतवोनि कुंतलीं,
दडविलें तिथूनिही हळूच कां उरीं ? १

मदननृपापासुनी
दाद घेइं लावुनी
बसुनि लोचनांत तुझ्या न्याय जो करी. २

मदनमंत्रि चंद्रमा
न्यायबळें कांतिमान्,
अनलधार ओतवीन मी तया करीं. ३

वसंत कोतवाल हा
सज्ज गे उभा पहा !
कुसुमबाण सोडवीन मी तुझ्या उरीं. ४

इंदूर, ता. २६ जुलै १९०२ ]

## २४ तूं जिवलगे विद्यावती जाणती !

[ सुनीत, वृत्त शार्दूलविक्रीडित ]

नाहीं ज्या सुमनीं मधू, न घिरट्या घे भृंग गुंगोनिया,
सौंदर्यातिशयें खुलो, परिमळें व्यापूनि टाको वन,
नाहीं प्रीति अशा सुरम्य नयनीं गुंते न माझें मन,
सौंदर्यातिशयें खुलो, जन झुलो त्यालागि पाहोनिया.

जीं नेत्रें प्रणयाश्रुपूरित तिथें मच्चित्त पावे लया,
नेत्रांची अनुरक्तता झकमके अश्रूंतुनी लाडके,
प्रातःस्नान दंवें मनोहर अशा पुष्पामधें कौतुकें
गुंतोनी रसिकाग्रणी मधु पितो तो भृंग गुंगोनिया.

नानावर्णी विचित्र पुष्प नटलें गर्वे अफूचें जरी
'मोहीं घालिन भृंग' हें चघळतें मांडे मनाचे किती;
जाणे तो भरलें जलाल गरलें की पुष्प हें अंतरीं,
पाही ढुंकुनिया कधीं तरि तया कीं काय तो सन्मती ?
'कां मी आवडतें ?' म्हणोनि पुसशी कां गे मला सुंदरी ?
सांगावें तुज काय ? तूं जिवलगे, विद्यावती, जाणती !

इंदूर, ता. ३१ जुलै १९०२ ]

## २५ तारुण्यांतील एक प्रसंग

[ जाति पतितपावन ]

मधुमासामधिं बहार येतो मधुमालतिला गे
पुष्पवती ती प्रथम तूं तशी अधिक खुलों लागे.

स्तनाकार या पीत मुखाशीं लाल फळें लवती
आम्र जशी तूं निधानगर्भा लज्जावति युवती.

नूतनपल्लवरम्या लतिका बहुवर्णी फुलती,
नूतनवसना मणिमंडित तूं, तेवि अधिक खुलती.

ताम्र अपांगीं सलिलीं कमळें, तुषार ज्यांवरती,
प्रणयाश्रूंनीं नयनें तव, तशिं अधिक मना हरिती.

गुलाबतरुंचीं प्रणयवर्ण हीं लाल फुलें तेवी
अधिकचि खुलती लाल गाल तव रागानें जेवी.

मदिरामधुरामोदें मोदें गुंजत कुंजांत
श्वशुरगृहीं जामातसम रमे भ्रमर मरंदांत.

कोकिल, बुल्बुल, मैना हळुहळु मधु गाना वळती
तरुण जनांचे तरंग तैसे स्मरविषया कलती.

स्वैरगती संचरतो मारुत जेवि अंतराळीं
हेतुशून्यही गुंगत बुल्बुल विहरे या काळीं.

अशा प्रसंगीं प्रणयतरंगीं रंगत गुंगत मी
खुळ्यासम तसा एके दिवशीं फिरतां आरामीं,

सरस्तटीं मी टाकीं हिरव्याचार तृणीं अंग,
मनोभिरामीं आरामीं जैं अनंग सबळांग.

भरलें होतें नयनीं हृदयीं रूप कुणाचेंसें,
वेड लागलें होतें त्याचें स्वांताला जैसें !

कोकिळ गाती, वाटे हृदयीं तीच मूर्ति गाते,
शीतल उपवनपवन सुटुनि ती स्पर्शे अंगातें !

कुसुमविकासीं तिचेंच भासे विलासहास्यच कीं !
प्रफुल्लकमलीं विलोल लोचन तिचेच अवलोकीं.

असो; यापरी तन्मय दिसलें उपवन तें मजला
सहज विलोकित बसलों असतां दर्पणसम सलिला.

सलील सलिलीं कमळें उमलति, मुकुलित किति दिसती,
झुलती, डुलती, खुलति; पंचमीयात्रेंतिल युवती !

असतां यापरि धुंद कशी तैं चमत्कृती घडली,
अनुपम सुंदर अवचित पडलें बिंब सरःसलिलीं.

चकित जाहलों, वरी पाहिलें, निशा नसुनि आली
दिवसा कैशी मूर्ति शशीची बिंबित जलिं झाली ?

मागें वळतां दिव्य मूर्ति मज अनुपम बहु दिसली,
तुच्छ वाटलें मृदुल उमललें कमल रुचिर सलिलीं.

त्या कमलाहुनि मृदुल गवसतां कमल मला तेथें
भान हरपलें दृढालिंगनीं, काय वदों ये तें ?

चित्र कोण तें रेखिल, सुंदर कोण लिहिल गानें ?
कां गे पण तूं लाल जहालिस ऐशी रागानें ?

प्रस्फुरिताधर पल्लव; लोचन लोल तरल कमलें;
क्षुब्ध मारुतें वीचितरल जल तैसें हृदय हले.

स्मरतें पाहुनि हें किति सुंदर तेंच जलाशय गे !
भृकुटि कुटिल या, कुठिल यापुढे मदनधनू सांगें.

खुळे खुळे ! परि विफल तुझी ही मत्सरमति सारी,
मूर्ति तूंच जी हृदयीं भरुनी बिंबे कासारीं.

पुरे पुरे, शांत हो, स्मरण कर, काय न आठवतो
'कमलाकर'–बाळाचा तुजला वाढदिवस वद तो ?

अशिच पहावी तुजला म्हणुनी वदलों संदिग्ध,
नेत्रबाण पण सहन न होती आतां विषदिग्ध,

किती जहाली खोल जखम हें कैसें सांगावें
सदय विलोकन, आलिंगन हें मलम लाव, धावें.

कडकडुनी आलिंगुनि चुंबनि सजल कपोलाला
धन्य असा हा को–! पण कोठें लेखनि लिहिण्याला ?

इंदूर, ता. २० सप्टेंबर १९०२ ]

## २६ चिरंजीव कोण?

[ उपजाति ]

तेची चिरंजीव जगीं जहाले,
हाले जयांचे मरणें धरा ही;
राही जयांचें यश शुभ्र येथे,
येतें जयांचे स्मरणें दृगंबू. १

झंझानिला वा अशनिप्रपाता,
पातालभेदीहि नदीपुरांना,
रानांतल्या चंड दवानला जे
लाजेप्रती लाविति हिंस्र जीवां, २

ऐशा महाक्रूर नराधमांना
मानार्थि, केव्हां न जुमानुनीया,
मानूनिया केवळ देशमाता,
माथां तिला वंदुनि मात्र लोकीं, ३

वेल्हाळ कांता गृहिं सोडुनीया
तोडोनिया जे धन मोहजाला,
ज्याला रुची अन्न असें त्यजोनी
यजोनि तेजा निजदेशकार्यी ४

उग्रारिशीं झुंजुनि झुंजुनी जे
नीजेस ठेले समरांगणांत
गणाग्रणीं रोवुनिया ध्वजातें;
ज्यांतें अरीही स्तविती मनांत ५

ये वास त्यांच्या जरि त्या शवांशीं,
शिवा शिवो क्षुद्रहि भक्षणार्थ,
क्षणार्ध भीत्यार्त अरी तयांना
यानांस बांधोनि निघो स्वदेशा; ६

हालाहलप्राय अरी शिरांना
रानांत फेको, स्वपुरा हरो वा
रोवावयालागि शिरें स्वदुर्गा,
दुर्गावली त्यांस करो खुशाल. ७

अरीस होवो बघुनी प्रमोद,
आमोद त्यांचा तरि सर्वदाही
दाही दिशा व्यापुनिया उरेल,
भरेल चित्तीं निजदेशजांच्या. ८

विभूति त्यांच्या धरणीप्रदीप,
प्रदीपतील स्वसुतीं स्वतेजां,
ते ज्या करीं होति विदेहधारी
धारीं असीच्या चिरण्या अरी ते. ९

न मानवां केवळ ते सजीव,
निर्जीव वारी, गिरि, पादपाशीं
पाशीं उभे ते गमती सदैव,
सुदैव त्यांच्या जननीपित्यांचें ! १०

ज्यां पूत केलें निजवारिपानें
पानें दुरी सारुनिया करांनी
रानीं झरे ते अतिदीनवाणी
वाणी करोनी रडती तयांना ! ११

तत्पादधूली शिरिं पुष्पमाना
मानावली ज्यां गिरिराज ते ज्यां
स्वजातवारिप्रबलीं रवांनीं
वानीत गातील सदैव त्यांना. १२

छायेंत ज्यांच्या बसुनी कदा ते
दाते सुखाचे गमले जयांस
जयांस त्यांच्या दंव-आसवांनीं
वानीत गातील तरु प्रभातीं. १३

आश्चर्य तें काय जरी प्रबंधीं
बंदीजनें गाउनिया यशाला
शाला स्वभू केलि गुणां शिकाया
काया विनाशी झिजवावयाच्या. १४

रणार्क राणा मृत का ' प्रताप '
प्रताप तापप्रद यद्रिपूतें ?
पूतें रिपूनें प्रबलें जयाच्या
यांचा करोनी बहुमान केला ! १५

तेजोबलौदार्यगुणानुपेत
न पेटते ज्योति अजून कां ती ?
कांती तयांची तनुजांतरंगीं
तरंगिलेली न दिसे कुणाला ? १६

अशांस ये मृत्युहि मृत्युहीन,
हीनां अम्हां मृत्युच जीवनांत.
वनांत थोडें तृण होय तें का,
तें काय हाले न डुले न किंवा ? १७

इंदूर, सप्टेंबर १९०२ ]

## २७ बिजली जशि चमके स्वारी !

[ जाति उद्धव ]

दुंदुभी दुमदुमे भारी, बिजली जशि चमके स्वारी ! ध्रु०

दुंदुभी दुमदुमे भारी,
नभमंडल भरिती भेरी,
किति धुंद दिशा या चारी !
रणकंदन माजे भारी ! १

गडगडाट या तोफांचा,
खणखणाटही टापांचा,
ऐकुं ये मधें स्वारीचा
ध्वनि वीरां देत हुशारी. २

लखलखाट तल्वारीचा
चिल्खतें आणि भाल्यांचा,
तिकडील तुऱ्या-तोड्यांचा,
काशि बाइ मूर्ति कंसारी ! ३

झुंजती वीर वीरांशीं,
मधिं तळपे स्वारी खाशी,
पाडीत अरींच्या राशी
खणखणा झडति तल्वारी. ४

जळ झुले जसें वाऱ्यानें
तिकडील तशा शब्दानें
काशिं बाइ झुलति हीं सैन्यें !
देईल विजय मल्हारी. ५

हां ! दिली पाठ सेनांनीं !
परि कशी स्वारि मागोनी
गंभीर धीर शब्दांनी
अरिवरी फिरवि माघारी ! ६

हो अरिची दाणादाण,
लोटलें सैन्य मागून,
चहुशिरी वारुवर कोण ?
तिकडीलच बाइ भरारी ! ७

सोन्याच्या तबकामाजी
रत्नदीप उजळुनि आजी
ओवाळिन स्वारी माझी
विजयासह येतां दारीं. ८

देवास, ता. ५ फेब्रुवारी १९०३ ]

## २८ प्रेममाहात्म्य

[ सुनीत, वृत्त शार्दूलविक्रीडित ]

“ झाले जे कवि, वंद्य त्यां जन गणो, ते मूढ कीं वाटती,
मूढां सत्य न, यां असत्य रमवी, आराध्य यां कल्पना !
नाहीं यां शिर, काय तें हृदयची सर्वस्व ऐशा जनां,
प्रेमाचा महिमा फुका फुगवुनी भारूड हे सांगती.

प्रेमा कल्पुनि भूप, सेवक दुज्या वृत्ती असें जल्पती,
प्रीतिप्रेरित सागरीं नर उडी टाकी, भया लेखि ना,
मारी ऐंद्र पदास लाथ, विष पी, सेवी महाकानना,
ऐसें हे कवि जल्पती, अमर हे होती ! कशी ही कृती ! ”

तत्त्वज्ञानमर्दें असें बरळती त्यांना असो ही नती !
नाहीं त्यां शिवला उदार नृप तो, ये कींव त्यांची खरी.
कोठें सागर, शैल, कानन, सखे, जे तूझियासंगतीं
देती ना सुख या जना ? विष सुधा तूझेविना सुंदरी !

ज्या तूझे नयनांत तो नृप उभा हृच्चित्र घेई करीं
त्यांना पाहुनि काय हो हृदयिं या सांगूं कसें तें तरी ?

देवास, ता. ६ फेब्रुवारी १९०३ ]

# २९ हिमाच्छन्न सरिता

[ सुनीत, वृत्त शार्दूलविक्रीडित ]

जेव्हां हो अति तीव्र शीत, सरिता होते हिमाच्छन्न ती,
भासे घोर शिळाच का पसरुनी गेली तळापासुन
वाहे निर्मळ त्या हिमांतरिं परी गंभीर तें जीवन;
यंत्रें तो थर भेदितां वर निघे वेगें फवारा अती.

मद्दोषें घन मौन सेविशि सखे, जैं माझियेसंगती,
होशी निश्चळ त्या हिमापरि परी ठावें तुझें तें मन;
जाणें मी प्रणयें अगाध भरलें कांते, असे आंतुन;
त्यायोगें विनवीं परोपरि तुला मानी जरी मी अती.

लावीं दोष सखे, स्वतासचि तुला पाहूनि मी निश्चळ,
पीतां मी अपुलेंचि रक्त मुख हें होई अती पांडुर
तेव्हां तें मुख तो कठोर थर गे तैं भेदितां आंतिल
प्रेमाब्धी बहु कालवे, नयनिं ये वेगें फवारा वर.
कांते, लोचन हे तुझे रमविती नाना रिती निर्मल,
तेव्हां अश्रुंतुनी सखे, झळकतां सर्वांत चेतोहर !

देवास, ता. ७ फेब्रुवारी १९०३ ]

## ३० मुशाफिर आम्ही

[ जाति अभिमन्यु ]

" मुशाफिर आम्ही,
आम्ही वनवासी, कशास्तव भुललिस आम्हांसी ? "

उभि महालीं ती,
ती रजपुत बाला तेथुनी बोले पांथाला:

" तुमचि हो भरली,
भरली मूर्ति मनीं, असा का परदेशी कोणी !

हृदय हें दिधलें
दिधलें तुम्हांला, इतर जन बंधुबाप मजला ! "

" मुली, कुलशीला,
कुलशीला बघुनी करावा पति तो युवतीनीं. "

" महाकुल दिसतां,
दिसतां रजपूत, जाहलें भाग्य जरी अस्त. "

" वनफळें खातों
आम्ही वनवासी, राहतों किंवा उपवासी.

वनीं पक्कान्नें,
पक्कान्नें कुठुनी जशी तूं भोगिशि या भुवनीं ? "

" तुम्हांविण अन्न
अन्न जरी अमृत विषाहुनि कडू इथे खचित. "

" वनीं कोठोनी
कुठुनि कुसुमशय्या ? टाकितों दगडावर काया. "

“ तुम्हांविण शय्या,
शय्या कुसुमांची  रुते मज कांट्यांहुनि साची.”
“ भटकणें अमुच्या
अमुच्या या भाळीं  वणवण करूं रानोमाळीं ”
“ तुम्हांविण भुवन,
भुवन मनोहर हें  वनाहुनि भयंकरचि आहे.”
“ कोठली आई,
आई, दादा ते  राहतों वनपशुंसह तेथे ”
“ तुम्हांविण आई,
आइबाप असुनी  वाटतें शून्य मला सदनी. ”
“ जिवाला धोका,
धोका रानांत  नीट हें आणी ध्यानांत. ”
“ तुम्हांविण जगणें,
जगणें मृत्युच कीं  तयाहुनि दुस्सह या लोकीं ! ”
“ कशाचें आम्हां,
आम्हां घरदार ?  कशाचा अमुचा संसार ? ”
चालला वारू,
वारू तेथोनी;  धावली अबला मागोनी !

देवास, फेब्रुवारी १९०३ ]

# ३१ सान्त्वन

[ वृत्त द्रुतविलंबित ]

[ १ ]

विमल या कलिका लतिकांवरी
उकलती नच भूवरि तोंवरी
गळुनिया मळती, मिळती धुळीं
जुळवितां तुज येतिल का मुळीं ? १

जुळवितां कधिं जें तुज येइना,
तळमळूं न तयास्तव दे मना;
अनय काय कधीं हरिही करी ?
धरुनि भाव असा मन आवरीं. २

तव करीं हरिनें जरि ठेंविली
परत ठेवचि ही बघ घेतली;
तुज दयाघन देइल तो पुन्हा
धरुनि भाव असा धरिं रे मना. ३

[ २ ]

सहज हें मज येथुनि सांगणें,
कठिण दुःख परी तुज सोसणें,
कळ तयासच ती कळते खरी
भिनत ज्या अति तीव्र सुरी उरीं. ४

धरि = सांवर

कठिण रे कुसुमासहि टाकणें,
धुळिमधें रुळतां मग पाहणें,
कठिण रे किति बालक टाकणें
जड धुळींत करीं निज लोटणें ! ५

दगड बांधुनिया हृदयावरी
गिळुनिया निज दुःख कसें तरी,
कठिण मोह पळांतरि सोडणें
कठिण, फार कठीणचि सोसणें ! ६

कठिण तो बघणें मग पाळणा
अति भयाण उदास अती सुना,
मधुर मंजुळ जो घुमला रवें
मग मुकाच मुकाच न पाहवे. ७

मधुर मंजुळ खासचि तो ध्वनी !
मधुर काय धरेवर त्याहुनी ?
मधुर वेणुनिनाद ? न त्यापुढें !
मधुर कोकिलकूजन ? छे, रडें ! ८

वसन तें बघणें मग दुःख दे,
छबुकलें खुललें बहु ज्यामधें;
स्मरण देतिल वस्तु अशा किती !
विसर होइल तो कवण्या रिती ! ९

नयन हे मिटतां शयनांतरीं
नयन ते खुलती कमलापरी;
चिमुकलेंच गुलाबमृदू मुख
उकलतां किति हो हृदया सुख ! १०

पसरतां कर आवळण्या तया,
उचलितां मुख चुंबन घ्यावया,
उघडतां इतक्यांतचि लोचन
तिमिर दाटचि दाटचि पाहुन. ११

उगिच चाचपतांच चहूंकडे
अगइ हा ! हृदयास कसें घडे ?
हळुच काय डसे हृदयास या ?
धगधगे उर तें मग कासया ? १२

भ्रम भरे हृदयांत जसें पिसें,
तनयदुःख न जों कळतें डसे,
मग झराझर वाहति लोचन,
नयनिं नीज शिरे मग कोठुन ? १३

चहुंकडे भरलें बघुनी तम
मन म्हणे, 'न शिरे उरिं कां मम ?
स्मृति तमीं तरि पावुच मज्जन'
तरिहि जागति आंतर लोचन. १४

तमिंहि तेंच दिसे फिरुनी मुख;
तरि न दे हृदया फिरुनी सुख;
श्रवणिं तें हसणें रडणें पडे,
परि मना, तुजलागि कसें घडे ? १५

चपल तें कर हालविणें दिसे,
समयिं एकचि ये रडणें–हसें,
हळुहळू विसरे रडणें–हसें,
फिरुनिया हृदयांत भरे पिसें ! १६

तनयसौख्यचि तें मग भोगतां
दिननिशा विसरे मन हें स्वता;
विसरतां निज भान मुलासवें
कटुक कुक्कुट तो मग आरवे. १७

तडफडोनि उठे मग हें मन,
हलवितें शरिरा जड भेदुन;
हृदयिं भार धरोनि भयंकर
दिनकृतीत फिरे मग हा नर. १८

जरि हसे स्वजनांत फिरोनिया
हळुच कांहिंतरी डसतें तया,
सकल हें अति दुस्सह दुस्तर,
कठिण, फार कठीण खरोखर ! १९

[ ३ ]

मृदुल फार सख्या, तव हें मन,
दिसति ते भरले तव लोचन;
बघुनिया तव रे मुख हें फिकें
हृदयिं कांहि गमे ममही चुके. २०

न कळतां गळुनी नयनांतुनी
हळु उरीं वितळे जळ येउनी,
न कळतां हृदयांतुनि हें पहा
श्वसित ये, मिसळे पवनांत हा ! २१

अगइ ! काय तरी उरि बोचलें ?
ममहि आठवती मजला मुलें !
खचित दुस्सह दुस्तर हें सख्या,
विसर केवि म्हणूं तुज तान्हुल्या ? २२

विसर बाळ कधीं न म्हणेन मी,
बुडव दुःखचि विस्मृतिचे तमीं;
प्रणयरत्न मळे चिखलीं तया
धुउनि निर्मळ दिव्य करीं सख्या. २३

खचित दुस्सह दुःख कळे मज,
चिरड दुःख तरी; प्रणयध्वज
फडकुं दे; सुविचार करीं जरा,
बघ अफाट विशाळ सख्या, धरा. २४

उगवला रवि का कधिं मावळे
नयनभूतजळें नच जो मळे ?
तनयहीन किती जनकां करी,
रडवितो किति भूवरि सुंदरी ! २५

हरिस जें रुचतें सखया, खरें
खचित नीटहि, योग्यहि तेंच रे;
विसर यास्तव शोक सख्या, परी
तनय तो स्मर तूं वरचेवरी. २६

[ ४ ]

भगिनि, मीं तुजला नच पाहिलें,
तरि तुला स्मरतां मन हें उले;

तुजशि शांतवुं सांग कसा तरी ?
हरि करोच दया तुझियेवरी. २७

[ ५ ]

दिवस जातिल हेहिं निघोनि गे
–जगतिं काय असें नच जें निघे ?
हृदय होइल शांत तुझें जईं
निज मना म्हणशील असें तईं:– २८

" अगइ ! आठवतें मज तान्हुलें,
हरिस तें रुचलें मम सोनुलें,
उचलिलें, पदरीं निज घेतलें
अतिदयानिधिनें हरिनें भलें. २९

कुटिल पातकपूर्ण धरा दिसे,
वदन निर्मळ का असतें तसें ?
उचलिलें हरिनें म्हणुनी तुला
मुख मळो नं, अशा धरि हेतुला. ३०

सदन हें मम दुःखतमोन्वित,
सदन तें सुखशांतिविराजित,
हरि निजांकिं तुला रमवी वरी,
अति दयाघन तो नय आचरी. " ३१

[ ६ ]

धगधगे उर–कुंडचि हें तुझें
अति पवित्रहि निर्मळ पुण्य जें,
कुसुम हें मम अर्पि तयावरी
जरि जळे तरि तेथ जळो तरी. ३२

देवास, ता. १२ फेब्रुवारी १९०३ ]

## ३२ ये पहाटचा वर तारा

[ जाति उद्धव ]

जागशी जरी सुकुमारी   हे कुमरि, उघड या दारा.
शेवटला देत पहारा   ये पहाटचा वर तारा.   ध्रु०

तोडोनि मोहमायेतें
करि घाइ वनीं जायातें,
राहुं दे शालुशालींतें,
राहुं दे तुझ्या मणिहारा.   १

पळ खरा कठिण मज कळतें,
सोडुनिया नातेंगोतें
जायचें घोर रानातें—
कळ सोस करूनि विचारा.   २

विकतिल तुज दादा आई,
गृह शून्य, गृहिं न या राहीं,
येथे सुख पळभर नाही—
सोड ही मनोहर कारा.   ३

नरमांसा टपती रानीं
पशु, बरे राक्षसाहूनी
विकती जे जरठा तरुणी—
निजमांस नेति बाजारा.   ४

तुजसाठीं सोडुनि माया
जाहलों सिद्ध टाकाया
गणगोत, मित्र सर्वा या—
सुंदरी, तशा घरदारा.   ५

तूं जिथे, सदा सुख तेथे
तूं जिथे, नगर वनही तें;
तूं जिथे दरी घर मज तें,
चल वनीं थाटुं संसारा.   ६

नभ निर्मल जीवित्वाचें
जरि भाळीं नाहीं अमुचे;
हरिचाप होउं मेघाचें;
चल एकमेक कांतारा.   ७

देवास, ता २० फेब्रुवारी १९०३ ]

## ३३ प्रीतीचा त्रास

[ जाति अरुण, राग भूप ]

प्रीति ना वसे कधीहि उंच त्या गडावरी,
   उतर उतर ये—प्रीति हवि तरी !
रुचति खालच्याचि तिला मोकळ्या निळ्या दरी. ध्रु०

चंद्र एकलाच वरी
चांदण्या अनंत तरी
झुरति कोपऱ्यांत दुरी !
प्रीति काय ही खरी ? १

पक्ष पक्ष भेट दे न,
येतो तें रागवून,
पडति फिक्या वक्त्र बघुन;
भीति त्यां भरे उरीं. २

घन राया, विमल झरे,
प्रीतिचीं इथेच घरें;
सचरे अदृश्य येथ
तृप्त देवि, अंतरीं. ३

नीरस ते वर महाल,
सरस या दऱ्या विशाल;
रक्कें ते लाल लाल,
विमल या दऱ्या परी. ४

कारंजें कृत्रिम वरि,
वारिपात येथ परी
झोकितो हिरे तुषारि,
प्रीतिवसति ही खरी. ५

वेश्यांचें गान वरी,
पक्षि गाति गोड सुरीं,
त्या नादें घुमति दरी,
उत्तर उतर सुंदरी. ६

हार जडचि तेथ तुला,
बाहु सजिव मी अपुला
अर्पिन सप्रेम गळां;
अधिक काय गे सरी ? ७

देवास, ता. २२ फेब्रुवारी १९०३ ]

## ३४ सखये, या स्थानीं—

[ जाति पतितपावन ]

सखये, या स्थानीं ऽ वसावें वाटे दिनरजनीं,
पर्णकुटी बांधूनि तरुतळीं गिरिवरि हरिभजनीं
वसावें वाटे दिनरजनीं. ध्रु०

वनदेवींची रम्य भूमि ही, सकळ इथे जमुनी
समंत्र गायन करिति, घालिती फेर चपल चरणीं. १

वनसुमनांची माळा घालिन तुजला स्वकरांनीं,
स्नात मुक्तकच पाहुनि तुज त्या गाणितिल निज राणी. २

कविहृदयांतुनि मंजुळ कवनें, तत्सम गिरिमधुनी
खळखळुनी आवेशें निघती निर्मळ निर्झरिणी. ३

देतिल निर्मळ जळ त्या प्याया मधुर सुधेहूनी,
स्मरणिं आणितिल ते प्रतिघोटीं प्रभुजीची करणी. ४

दाट लागले पहा मनोहर तरु खोऱ्यांमधुनी,
कंद, मुळें आणि फळें अर्पितिल अशना स्वकरांनीं. ५

पापशून्य तीं मधुर भक्षुनी वसतां या विपिनीं
निर्मळ, निश्चळ, तृप्त मनानें लागूं हरिचरणीं ६

सूर्योदयिं गातील तरुवरी पक्षि एकवटुनी,
उदात्त रस ते भरितिल हृदयीं, येइल जल नयनीं. ७

मधुर रवें आळवितां हरिला गिरिशिखरी बसुनी
दिसशिल तूं भैरवी रागिणी रमणी, रविकिरणीं. ८

वीणा घेउनि करीं रवें तव टाकुं दऱ्या भरुनी;
अदृश्य रूपें वनदेवी मग डुलतिल परिसोनी. ९

कविकुलगुरु उभयता प्राच्य आणि पाश्चात्यहि मिळुनी,
वर्षाचें पळ करितिल मंत्रें गुजगोष्टी कथुनी. १०

सखे, अशांची संगति मिळतां काय उणें विपिनीं ?
नको नको ते मधुमुख विषहृद नगरमित्र फिरुनी ! ११

पहा पहा गंभीर धीर हे गिरिवर चहुंकडुनी
मूक कसे वक्तृत्व ओपिती श्राव्य दिव्य कर्णीं ! १२

प्रभुजींचे उपदेष्टे देती ज्ञान इथे बसुनी,
काय भटें त्यापरी श्रुतींचें दुकान घालोनी ? १३

शांत रम्य या पुण्यभूमिचें दर्शन लाभोनी
महापातकी पवित्र होउनि रत हो हरिभजनीं. १४

नको नको प्रासाद नृपांचे दूषित रक्तांनीं !
कुवासनांचें अकांडतांडव सदा नगरसदनीं ! १५

देवास, फेब्रुवारी १९०७ ]

## ३५ दुष्काळानंतरचा सुकाळ

[ जाति पतितपावन ]

घुमव घुमव एकदा फिरुनि तो गोड तुझा पांवा,
सोनें झालें शेत पिकुनि हें, करितें मी धावा. ध्रु०

लख्ख पसरलें शेतावर या निर्मळ बघ ऊन,
पसर तसा तूं जादु तुझाही पांवा फुंकून.
त्या जादूनें वनदेवीची भूमि बने शेत,
कीं स्वर्गचि तो ओढुनि आणी क्षणामधें येथ !

मोत्यांचे दाणे हे भरले कणसांत या  रे सख्या,
लवलीं हीं खाली कितितरि भारें तया  रे सख्या,
आनंदें डुलतिल पांवा परिसोनिया  रे सख्या,
होति विलक्षण वृत्ति मनाच्या, भुलति दुष्टभावा,
फुंकाऱ्यासह जाति उडोनी क्रोध, लोभ, हेवा.  १

डुलुनी धुंदित बैल डुकाऱ्या करिती कुरणांत,
बागडती या गाइ सख्या रे, हंबरडे देत.
शिंगें ताडुनि शिंगांवरती देती ताल म्हशी,
सळसळती ही कणसं पवनीं खळखळते नदि जशी.
पंचमांत गाते झाडावरि कोकिळा  रे सख्या,
नाचोनि मोर हा उंच ओतितो गळा  रे सख्या,
हा ओढा गाउनि खळखळ भरतो मळा  रे सख्या,
लोट लोट रे ओघ जादुचा पांव्यांतुनि तेव्हां,
सकळ मिळोनी एक सुरानें गाउं देवरावा.  २

कनवाळू तो या गरिबांचा कळवळला देव,
दूर पळाला काळ, घातला खोल जरी घाव.
धरणीमाता प्रसन्न झाली, कणसें ही पिकलीं;
हाय ! कशी मीं तुकड्याकारण ‘ बइ ’ माझी विकली ?
हीं बाळें आतां दूर नको व्हायला  रे सख्या,
जाशील न टाकुनि तूंही आतां मला  रे सख्या,
तें अभक्ष्य नलगे पोटा जाळायला  रे सख्या,
स्मरण नको तें ! पुन्हा स्फुरण हो आठवतां घावा,
भुलवाया तें दुःख जिवाला पांवा हा ठावा.  ३

देवास, फेब्रुवारी १९०३ ]

ठावा = आधार

## ३६ चौघडा झडतो

[ जाति अभिमन्यु ]

चौघडा झडतो,
झडतो दुमदुमुनी, धडधडे उर हें कां म्हणुनी ?

सनइ ही घुमते,
घुमते मंजुळ ती, मला कां गमे निधनगीती ?

मधुर या गाती,
गाति वारयुवती; पिशाची क्रीडारत दिसती.

झुलति गज दारीं,
दारीं जरि डौलें गमाति कां अवसेचे पुतळे ?

चमकती युवती,
युवति जशा चपला; पिळति कां माझ्या हृद्‌याला ?

उसळली दाटी,
दाटी चौकांत; मला कां भासे एकांत ?

वधुवरां बघुनी,
बघुनि तोष सकलां; बाळ वर माझें, सुख न मला·

गाति पंक्तींत,
पंक्तिंत 'वरमाय', हा ! कुठें परि ती वर-माय ?

देवास, फेब्रुवारी १९०३ ]

# ३७ हा आणि तो

[ वृत्त इंद्रवज्रा ]

हा श्रीविलासांत सदैव लोळे,
तो नित्य दारिद्र्यदशाच्च सोशी;
हा या जगीं मात्र खरा दरिद्री,
तो ? तो खरा श्रीसुख भोगणारा  १

हा मानपानांत निमग्न लोकीं,
तो मात्र निर्माल्य जसा जगांत;
हा मान पावे न कधी खराच,
तो मान्य, तो पूज्य जगांत होई.  २

हा नाचतो स्वर्णमय प्रकाशीं;
तो ? तो पडे निर्जन अंधकारीं;
हा राहतो घोर घनांधकारीं,
तो ? तो सदा दिव्य अशा प्रकाशीं.  ३

हा केंद्र जेथे मिळतात सौख्यें,
तो केंद्र तीं जेथुनि फांकतात;
हा केंद्रबिंदूकृतसौख्य, दुःखी,
तो ओपुनी तीं सुख नित्य भोगी.  ४

हा वांचतो शंभर पूर्ण वर्षें,
तो वांचतो मात्र दहाच सारीं;
हा वांचतो शंभरही पळें न,
तो वांचतो कोटि दहाहि वर्षें.  ५

हा पुत्रदारापरिवारयुक्त,
तो एकला, कोण जगीं तयास ?
हा एकला या घर कोठलें तें ?
तो मग्न गेही वसुधाकुटुंबी. ६

हा पाहतो दूर सभोवताली,
तो ? तो स्वतालाच सदैव पाही,
हा पाहतां सन्निधही बघे ना,
तो पार पाही क्षितिजाचियाही. ७

हा जिंकितो दुर्बलशां सहस्रां
तो जिंकितोही प्रबलास एका,
हा सर्व जिंकोनिहि जिंकलेला,
तो जिंकुनी एक सदा यशस्वी ! ८

हा कोण, तो कोण तुला कळे का ?
जाणावयाची तरि काय इच्छा ?
याला महालांत पहा नृपांच्या,
जा शोध त्यालाहि कुठे दऱ्यांत. ९

देवास, फेब्रुवारी १९०३ ]

## ३८ कुपित अंगनेप्रत

[ जाति भूपति ]

हे मुरड नेत्र रागांत किं अनुरागांत;
घे, पीळ, पाळ हें हृदय तुझ्या हातांत.

पिळतील तरी ते नवनीताचे गोळे,
पाळतिल तरिहि तेजाळ विशाळचि डोळे !
मउ फूल झोकिलें काय वाहिलें काय,
सुख सारखेंच; ये अधिक काय वा जाय ?

प्रेमांत तुझ्या गे अधिक उणें तें काय ?
संपूर्ण, त्यामधें नाहीं तरतमभाव.
सळ येणें, खुलणें नेत्रीं वर वर भिन्न,
तरि रंग खरोखर एक लाल आंतून.

मन आंतलेंच तें आंत नीट बघणार,
वर दाव राग-अनुराग, काय होणार ?
जरि पिळणें रुचतें पीळ पीळ मुरडोन;
जरि करीन हूं चूं हराम तरि मज जाण.

पाळण्यास डोळे फिरव गरगरा प्रेमीं,
सुख तुला ज्यामधें सुखी तयांतच गे मी.
हे मुरड नेत्र रागांत किं अनुरागांत,
घे, पीळ, पाळ हें हृदय तुझ्या हातांत.

इंदूर, ता. १० मार्च १९०३ ]

## ३९ संदिग्ध ताना

[ सुनीत, वृत्त शार्दूलविक्रीडित ]

त्वेषानें घनघोर घर्घररवें गर्जे महासागर,
संदिग्ध ध्वनि दुमदुमे, नगर हें टाकी दणाणोनिया,
जाई दूर दिगंतरा पवनिं हा आरूढ होवोनिया,
वेंची सागर सर्वही बळ कसा फेसाळला हा वर !

याचा हा वरचाच गे ध्वनि, परी, हाले जरी अंतर
दावूं केवि शके अगाध हृदयी जें चाललें याचिया ?
ताना या भरल्या कशा तरि सखे, वेड्या तशा वांकड्या
गेहीं या घुमती सदा जरि सखे, संदिग्ध या बेसुर.

जाया दूर दिगंतरा बळ न यां, हा भेद आहे परी,
वेंचीं मी बळ सर्वही, हृदय हें न्हाई द्रवानें किती !
हा सारा वरचाच गे ध्वनि, परी हाले जरी अंतरीं
दावूं प्रेम कसें तुझ्याविषयिं जें संदिग्ध या दाविती ?
ताना या जरि पावल्या जनन गे प्रेमीं तुझ्याची तरी
घे घे अर्पितसें तुलाच म्हणुनी वारू, प्रिये पार्वती !

इदूर, मार्च १९०३ ]

## ४० कळ्याकळ्यांत विहार

[ जाति वनहरिणी ]

कळ्याकळ्यांत विहार करिशि तूं कळ्याकळयांत विहार   ध्रु०
दिसशी तूं बन्सीधर गिरिधर, तुझ्या छबीस न पार   सख्या रे ! १
जादु बन्सिचा घुमतां तूझ्या येइ कळ्यांस बहार,   फुगति या. २
काय लभ्य उद्दाम भूप मज, करिति फुलांवर प्यार   मात्र ते ! ३
नको नको अभिमानि तेहि मज घालिति मुळीं कुठार   निर्दयी. ४
मुग्ध कळया या मुली तान्हुल्या, पुरविशि कोड अपार   बापसा. ५
खेळविशी त्या झेलुनि हातीं, लोभ तुझा अनिवार   यांवरी. ६
माळि भिकारी हा पण तूझा लोभाचि यावर फार   निर्मळ. ७
प्रीतिसूत्रिं गुंफोनि अर्पितों गळां कळ्यांचा हार   घे सख्या. ८

इंदूर, मार्च १९०३ ]

## ४१ क्रुद्ध सुंदरीस

[ जाति भूपति ]

सजलीस जरी हें हृदय सखे, फाडाया
तरि पहा सांगतों, जपुनि करीं, या कार्या.

हें स्वल्प वाटतें काम मानिनी, का गे ?
पण वेडे, पडशी भ्रमीं सरोखर सांगें.
किति अहा फिरविशी डोळे गरगर रागें !
कां घुसळुं पाहशी हृदय सांग यायोगें ?

सोन्यांत खचविले हिरे तुझे ते डोळे
अति मोहक; करितिल काम कसे ते भोळे ?
किति लाल करोनी ओतिशि का अंगार ?
हा वेडे ! घेतें प्रेम उडी बाहेर.

किति पुन्हा पुन्हा वांकड्या भोवया करिशी ?
त्या उलट पोसती हृदय, सांग गति कैशी !
हे लाल करोनी गाल फुगविशी रागें
शेवंतिंत खुलतो गुलाब अधिकच ना गे ?

किति आव घालिशी असा हृदय फाडाया,
पण नीट पहा गे आंत आपल्या हृदया.
बघ आंत नीट निरखोनि काय तें झालें,
हें हृदय कसें मिसळोनि त्यामधें गेलें.

तीं दोन्ही झालीं एक कशीं मिसळोनी,
कां करितां येतिल भिन्न तुला परतोनी ?
जरि भिन्न न करितां करिशिल घाई ऐशी ?
होईल काय परिणाम कळे का तुजशी ?

जल दुधांत मिळतां काय अर्धी फाटावें
हें तुम्हां स्त्रियांना काय अम्हीं शिकवावें ?
बघ नीट म्हणोनी हृदय अर्धी अपुलें तें
घाईंत न फाटो हीच भीति मज कांते !

इंदूर, ता. १३ मे १९०३ ]

## ४२ शैशवदिन जरि गेले निघुनी

[ जाति अजनी ]

शैशवदिन जरि गेले निघुनी
निर्मळ किति तरि ती शिशुहूनी !
छबि जरि खुलली नसांनसांतुनि
हृदय विशुद्ध अती. १

मास दिवस सुखिं मितचि लोटतां
होइल विकसित रति मनिं आतां;
गुलाब उकली हृन्मधु, स्वता
वसंतमृदुकिरणीं २

ऐसें वाटे आम्हांला जरि
तरी हरीची रचना दुसरी;
दिव्य नभोज्योति ती सुंदरी
केवि धरेस पचे ? ३

बाल्यदशाचि न जोंवरि सरली
तोंचि अहा अंतर्हित झाली !
हाय हाय ! ती गेली गेली !
काय अतां उरलें ? ४

घनपल्लवयुत तरुराजींतुनि,
पक्षिगानही जातें लोपुनि,
मधुर हास्यही वदनावरुनी
याचपरी वितळे. ५

इंदूर, ता. २१ मे १९०३ ]

## ४३ अजुनि लागलेंचि दार—

[ भूपाळी, जाति शुभवदना ]

अजुनि लागलेंचि दार, उजळे ही प्राची,
स्वेच्छ थंड गार झुळुक वाहतसे ताजी. ध्रु०

जागवि जी रम्य वेळ
कमलादिक सुमन सकल,
कां न तुला जागवि परि, कमलनयन साची? १

देवि कांति, गीति, प्रीति,
सकल मनीं उत्सुक अति,
द्वारिं उभ्या वाट बघति या तवागमनाची. २

अरुणराग गगनिं कांति,
पक्षिगणीं मधुर गीति,
या हृदयीं तशी प्रीति, पुरव हौस यांची. ३

जीवित तुजवीण विफल,
कां मग हा विधिचा छळ?
स्वांचित तुझी मत्प्रीती छबि तव ही माझी ४

ऊठ हे मनोभिराम,
तिष्ठतसें मी सकाम;
रुदन करीं, कोठ परी मूर्ति ती जिवाची? ५

इंदूर, ता. २२ मे १९०३ ]

## ४४ पाडवा

[ जाति भूपति ]

पाडवा उगवला नवा पुन्हा सौख्याचा,
हा काळ कल्पिला कालोदधिभरतीचा.

हे कालसागरा कालरात्रिच्या उदरीं
जी जनन पावली लाट निघे बाहेरी.

नव लाट बघाया थाट भूमि ही करुनी
कशि उभी सजुनिया नव पल्लवीं नव सुमनीं !

आव्हान कराया गान मुदित ही वाटे
शतपक्षिमुखांनीं स्वागत करि तुज लाटे !

किति मंद शीत सौगंध श्वास ही वितरी !
जणुं उरावरुनि कुणि ओझें हीच्या उतरी.

दुष्काळ, प्लेग विक्राळ नक्र घेवोनी
किति आल्या लाटेवरि लाटा आदळुनी !

नच दया स्पर्शली तयां, आजवरि बाळें
किति अनाथ गिळलीं ! हृदय यामुळें पोळे

गांजली, किती भाजली, साश्रु नयनांहीं
आशाळुपणानें दीनवाणि तुज पाही.

गतलाटजननिंही थाट यापरी केला,
परि नायनाट आशेचा शेवटिं झाला.

आंतला, कढाडुनि शिला, उकाळा फुटुनी
ये दावानलिं कधिं आस तशी तव जननीं.

ही आस कीं स्वतनयांस सुखद तूं खास
होशील म्हणुनि हा हृदयिं पुन्हा उल्हास.

परि उरीं काय तूं तरी घेउनी येशी
हें सांग सांग या शीघ्र दीन भूमीशीं.

ग्रह नऊ काय गे खाउ धाडिती आम्हां
हें सांग शीघ्र आईस; गाउं तव नामा !

अति कष्टि तृषाकुल सृष्टि, वृष्टि देवोनी
धनधान्य धाडिलें काय सांग गे त्यांनीं ?

ग्रह शनी कुपित आजुनी अम्हांवरि काय ?
हें ऊर फाटतें, धाय मोकली माय !

सस्नेह बंधु तो होय अतां तरि काय ?
धाडिले गदार्ता काय अम्हां आरोग्य ?

गृहकलह टाळुनी स्नेह आणिला का गे ?
ही त्रस्त कारस्थांमुळें भूमि, तिज सांगें.

का दया बंधुहृदयिं या दीन भगिनींना
आणिली काय गे सांग भूमिला दीना.

कवि नवे अम्हांला हवे, आणिले काय ?
टेनिसन् आणिला ? अमर करिल तव नांव.

धार, ता. ११ जून १९०३ ]

# ४५ वियोगिनी

[ जाति भूपाति ]

—“ निर्जनीं घोर या वनीं कोण तूं सांगें,
गंधर्वसुता, वनदेवि, मनुज वा का गे ?

हा गिरी वासुनी दरी पसरला येथें,
कांतार भयंकर कसें तुला रुचलें तें ?

वरगड्या लांब वांकड्या पसरल्या असती;
रक्तापरि लाली काय न दे ती भीती ?

बघ भुजंगसम उत्तुंग शिरावरुनीया
हे भस्मीं ओहळ, मद्चि फुटे गजसा या.

तृण कसें राठ हें असें पीत तांबूस !
जणुं थरारले हे त्या दैत्याचे केस.

पलिकडे वारि धडधडे धवल फेसाळ—
नरदुःखिं खद्खद्‌ा अट्टहास विक्राळ.

दे श्वास कोण श्वासास, अश्रु अश्रूला ?
नच सहानुभूती इथे मनुजयोनीला.

सहवास, वसे जो त्यास व्याघ्र-सिंहाचा—
नवपल्लवकोमलकुमरियोग्य का साचा ?

तारुण्य असुनि आरण्य वास कां रुचला ?
कां अपक्क आली पक्क दशा ही तुजला ?

गांजिली काय टाकिली वृद्ध तातांनीं ?
तुज विक्रयभीती काय पिटाळी रानीं ?

संसारसुखाचे गार हरित दिन असुनी
कां वसंत दवडिशि आयुष्याचा विपिनीं ?

घन घनीं जसा लोपुनी दडावा तारा
त्यापरी दडशि कां इथे त्यजुनि संसारा ?

ज्यापरी गिरीच्या उदरिं हिरा लपलेला
पारख्यापासुनी तशी इथे तूं बाला.

ज्यापरी वनाभीतरीं कुसुम वाळावें
त्यापरी काय संकल्प तुझा सांगावें ?

वद वृक्षिं एकटे पक्षि कधीं का वसती ?
सहवासाविण जीवित्व भयंकर जगतीं.

अनिवार जिवाचा भार कसा एकानें
सोसावा स्त्रीविण नरें, तयाविण तीनें ?

चल पुरी म्हणुनि सुंदरी, वाट तव पाही
सत्प्रीति हृदयिं या, तुला आदरें बाही.

अतिभव्य मनोहर दिव्य भुवन बागेंत
नगरांत पाहतें वाट तुझी चल तेथ.

पाहणें प्रणयलोचनें, हासणें, रुसणें
रानांत असें सुख सांग कुठे गे सजणे ?

स्वर्गस्थ ज्योति अस्वस्थ धरेवर याया,
अति आतुर तुजला ‘ आई ’ ! संबोधाया.

लडिवाळपणानें बाळ अंकिं लोळावें,
पतिपत्नि, सुता-सुत एक ताटिं जेवावे !

हें पुरीं, तें वनीं परी; नीट बघ दोन्ही,
स्वीकरीं हृदय हें, देइं मुदित होवोनी.

आरक्त मदन आसक्त मधुर हा अधरीं
तो टाळुं पळशि वनिं तिथे पडे परि पदरीं.

छळुं तया नको गे ! दया करी यावरती,
परतेल कसा या हृदयिं भरे जरि भरती ?

कां बरें नीर या भरे नील तव नयनीं ?
का कांहिं टोचतें तुला सांग या वचनीं ?"

... ... ...

"हा झरा कसा झरझरा वाहतो पुढती !
का उलट तरुं शके कुणी प्रवाहावरती ?

झरझरा प्रीतिचा झरा लागला वाहूं;
त्या उलट झगडलें, दुःख किति अतां साहूं ?

तरु पहा उभा येथ हा, गार किति छाया !
तोडोनि डहाळ्या हाय शोधणें वाया !

साउली मला लाभली प्रीतिची असुनी
करिं फांद्या छेदुनि वणवण भणभण विपिनीं.

विनविलें किती प्रार्थिलें मला तैं त्यांहीं,
परि नाहिं पाहिलें तयां सदय नयनांहीं.

टाकुनी बोललें, 'वनीं चला येथोनी !'
कशि बाइ अवदसा सुचली मज कोठोनी ?

मत्प्राण तेच दिनिं जाण वनाला गेले;
हें शरीर मागुनि शोधित वनिं त्यां आलें,

ते जरी लाभले तरी लग्न होवोनी
यें, न तरि बरें वन पुरश्मशानाहूनी !

त्यावीण व्यर्थ कीं शीण पुरी, जें म्हणतां
तें सर्व फळा ये छाया ती सांपडतां.

सत्प्रीति जरी भूवरति एक त्या हृदयीं,
ज्या स्थलीं दडुनि मत्प्राण निघे त्या समयीं.

तुम्हि चला कां बरें मला भुरळवूं बघतां ?
गिरिपरी तनू जड, काय खुळें तरि वदतां ?

कुणिकडे पाहुं तरि गडे, तुम्हांला नाथा ?
या पदर पसरतें, क्षमा करा मज आतां !"

धार, ता. १३ जून १९०३ ]

## ४६ सृष्टिशिक्षण

[ वृत्त पृथ्वी ]

" किती हृदय ओढिती हरिण !" तो प्रमोदें वदे,
" नरासम न हे कधीं फुगति जातिच्या दुर्मदें;
निषादभयही तयां न वनिं या कधीं कांपवी,
तयांसम निवास या वनिं कसा न तो सौख्य वी ? १

सख्यासह अपाप या वनिं निवास होवो सदा,
स्वयेंचि वनिं जोडितों सकलशास्त्रसत्संपदा,
अहा सुखद शांत हें गहन काननीं जीवन !
श्रमांतिं सुख जें जगीं अधिक काय तें याहुन ? २

न दुःख नयना जिथे पडति ते तिथे सोसण्या,
वनीं व परिहासही विफल सोसण्या सोडण्या,
जडाजड पदार्थ हे गुरु मदीय सारे वनीं,
शिकेन पशु-पांखरें-गिरि-तरू-झऱ्यांपासुनी. ” ३

इंदूर, ता. २६ जून १९०३ ]

## ४७ प्रणयवंचिताचे उद्गार

[ जाति प्रीतिखेल ]

तुज खेळ वाटली प्रीति मना रे वेड्या,
हो अतां तरी खातरी ? जाशि वाटे त्या ? ध्रु०

हो झुंजुमुंजु ती कोठे जैं उषा
ताऱ्यांस दावि मी बोटें दश दिशा;
मिळतील, न वाटे खोटें— किति नशा !
कुणिकडे दडाले पुढें हिऱ्यांचे खडे नभांतुनि साऱ्या ?
हो उषा प्रखर मध्यान्ह, कुठुनि समजाया ? १

मृदु वसंत जैं आयूचा झळकला,
गुल्जारचि सर्व बगीचा भासला,
मग बहारचि गुलाबाचा देखिला.
रे, जरी भरारी पुरी मारिलिस तरी हाय तें वाया !
रखरखित उन्हाळा होय, उरति कांटे त्या. २

झळझळित हिरे ते डोळे पाहुनी
दोल्यांत सुखाच्या डोले मन मनीं,
उरिं धरिन म्हणे मन भोळें फणिमणी—
भ्रम भरे अरेरे ! हिरे हलाहल खरें ! कुठुनि समजाया ?
पळ सुटे विकारा उग्र पाहतां सत्या. ३

चंचले विजे गे पोरी निर्दये,
केलीस मनाची चोरी निर्भये,
सरि दिसे मळां पारे दोरी कळुनि ये.
हा ! परी कडाडुनि वरी प्रगटलिस खरी, ठार केलें या !
हा ! काय फायदा अतां कळुनि तुझि माया ? ४

इंदूर, ता. २५ जुलै १९०३ (?) ]

## ४८ आठवती ते दिन अजुनी

[ जाति हरिभागिनी ]

आठवती ते दिन अजुनी. ध्रु०

खळखळ गळतें जळ नयनांतुनि येतें माझें उर भरुनी. १
अलसाकुंचित तें मदिरेक्षण, लज्जास्मित तें मधुवदनीं, २
मृदुमधु बोलुनि नेली यामिनि जागत कामिनि, ये स्मरणीं. ३
करिं कर घालुनि अधिकचि अवळुनि तृप्त न झालों जैं स्वमनीं. ४
कोमल अधरीं दाबुनि अधरा जेव्हां रमलों सुखसदनीं ५
लीलावति ती सुदती युवती स्मृति ती करिते स्थित नयनीं. ६

हाय काय परि आतां त्याचें? मृगजळसम त्या दिनरजनी! ७
स्वर्लोकाचे स्वप्नसुखांचें तैसें उरलें तें वचनीं. ८
अस्ताचलगत रविकर सुखकर ज्यापरि पांखरुं खिन्न गणी, ९
निर्मल दंवकण जैसे गेले धरितां धरितां ते उडुनी, १०
मधुतर जैसें रमणीकूजन चोरुनि रमणाच्या श्रवणीं, ११
प्रियकरचुंबन जेवि बळें कृत फिरवित असतां मुख तरुणी, १२
जैशी अद्भुत धुंद्पणाचे प्रथमालिंगनिं ज्योति मनीं, १३
हा! आक्रंदन गगनहि भेदुन गेलें तरि तें विफल जनीं! १४
हा धिग् जीवन! मृत्युच हे दिन आले भाळीं मम कुठुनी? १५

इंदूर, जुलै १९०७ (?)]

## ४९ कालाच्या चढुनी श्रमें–

[ सुनीत, वृत्त शार्दूलविक्रीडित ]

कालाच्या चढुनी श्रमें वरिवरी चौऱ्यायशी पायऱ्या
अत्युच्चीं नर पायरीवरुनि जो ढुके न मागें पुन्हा,
कोट्यादी तपुनी तपें करुनिया वातांबुपर्णाशना
जो स्वर्गीं चढला, बघे तिथुनिया खालील काळ्या दऱ्या,

सेवी जो अमरांगनासवसुखा गंधर्व कीं किन्नर!
तेजाचा पुतळा अहा! प्रभुसभासद्रत्न जो मोहक!
आकाशीं शशिच्या प्रकाशिं शयनीं स्वप्नांत तो तारक
हुंगे मात्र मनें अनीतिमद्रिरादुर्गंध ये जो वर—

उन्मादें शिर तें फिरे गरगरा, काळोख नेत्रां मग,
कोठे कोण न त्या सुचे, डगमगे, हाले, झुले, घेर ये,
येई लोळ झळाळुनी तनुंतुनी, पुण्या पिटाळी अघ,
हा हा हा ! पडला कडाडुनि कुठे ? पाडी जगाही स्वयें.

" झाले लोचन लाल, काल जळलें कोठे कुणाचें घर ? "
ठावा मी असुनी प्रिये, पुसशि हें ? कां कोप ? हा मत्सर !

देवास, ता. १ ऑगस्ट १९०३ ]

## ५० ललने चल चल लवलाही !

[ जाति अजनी, राग यमनकल्याण ]

ललितलताकुंजी स्मरमंजरि, चल चलुं लवलाही,
ललने, चल चलुं लवलाही !
रुचिराधर–धृत–मधुर–नवामृत–लोलुप बहु होई ध्रु०

मनोभिरामीं या आरामीं
रमणि, रमूं ये विलासकामी,
उत्सुक झालों बहु जाया मी,
सुखकर ज्योत्स्ना ही. १

ऐकुनि तव रव मंजुल कोमल
वियुक्तकूजितलज्जित कोकिल
वाटे अधिकाचि नीडीं लपतिल,
संशय मुळिं नाहीं. २

तनुस्पर्श तव शीतल होतां
सुधाकरस्रुत सुधा तप्तता
पावेलचि हे वाटे चित्ता,
कर करुणा कांहीं. ३

निशिगंधाचा सुगंध सुंदरि,
मुखगंधें तव मंद खरोखरि
होइल, आनंदहि हृन्मंदिरिं
उरेल भरुनीही. ४

सुमनाचा गे विकास सुंदर,
विलासहासें तव बहु सत्वर
संकोचेलचि पावुनि मत्सर
गमतें मज हृदयीं. ५

कुंदकळ्या तव दंतपंक्तिला
पाहुनि पडतिल भूमितळाला;
पाहूं चल ये या मौजेला,
माझी विनवणि ही. ६

अर्धोन्मीलित कुवलयकलिका
अलसाकुंचित लोचनतिलका
पाहुनि मुकुलित नच होतिल का ?
तरि उपवनिं येईं. ७

भ्रुकुटिविलासीं तुझ्या विलासिनि,
कुसुमचाप तो सचाप येउनि,
दास तुझा मज टाकिल करुनी
मंत्रशक्ति तव ही ! ८

देवास, २ आगस्ट १९०३ (?)]

# ५१ गेली ज्योति विझोनिया

[ सुनीत, वृत्त शार्दूलविक्रीडित ]

गेली ज्योति विझोनिया मग फुका फुंका तयाला किती,
ओता आंत घृता, रचोनि समिधा प्रार्था फुलें वाहुनी—
झालें स्थंडिल थंडगार मृत तें, ज्योती न ये आंतुनी,
चालूं द्या मग वेदघोष तुमचा, ती वेदिशाला रिती.

गेली ती शुचिता, पवित्र झळके कोठोनि कांती तिथे ?
लावा दीपशतां मशाल उजळा, कर्पूर जाळा उठा,
घंटा घूर्ण पिटा, फुका मग फुका शंखा, नगारा पिटा—
थट्टा ती मग वस्तुची ! सकळही कीं फोल छायाचि ते.

प्रीतिज्योति विलासिनीच हृदया टाकूनि गेल्यावरी
सारी भूप्रमदावली मग झटो, पेटेल कां ती तिथे ?
गेला जादु, पिशाच विश्व मग हें निस्सत्त्व छायेपरी;
इंदू इंदु न तो; पिशाच विधुचें! तारे, रवी हीं भुतें !

" जातां मी रविचंद्र येतिल जसे तैसेच "—कां गे अशी
कांते, निष्ठुर बोलुनी हृदय हें फाडूनिया टाकिशी ?

देवास, ता. ३ आगस्ट १९०३ ]

## ५२ शुक्राची चांदणी

[ सुनीत, वृत्त शार्दूलविक्रीडित ]

शुक्राची मधु चांदणी लखलखे रम्या कुमारी वरी,
प्रीतिस्निग्ध सलज्ज हा नयन का आरक्त, नील क्षणीं ?
झाली चंचल वृत्ति, संचर गमे झाला अशा लक्षणीं
वाटे ही रमणी वरोत्सुक असे झाली बहू अंतरीं ?
कोणाकारण ज्योत ही उजळली ठायीं हिच्या अंबरीं ?
कायावाङ्मनसा कुणा हृदय ही अर्पी अतां कामिनी ?
शोभे निर्मल नील मंडप किती भास्वान् वऱ्हाडी जनीं !
कोणाकारण पूजनीं रत असे गौरीहराच्या तरी ?

प्रीती ही फुलली, अहा उसळला तद्वर्ण सारा नभीं !
झालें ' मंगल सावधान ' रविशीं अंतःपटा सारितां,
दावा ती निरखोनिया मज सख्या, कोठे अतां ती उभी ?
झाली लीन पतींत, सागरिं मुरे जैशी नदी भेटतां.
आहाहा ! सुखसागरांत मुरलें या मंगलीं त्या दिनीं,
तेव्हांपासुनि पाहिलें मज सख्या, सांगा पृथक् का कुणीं ?

इंदूर, ता. १० एप्रिल १९०४ ]

## ५३ राजकन्या आणि तिची दासी

[ जाति पतितपावन ]

" प्रेम तयावर होतं तर मग तुमचं ना भारी ? "
" छे छे ! कसलं ? लेक नृपाची मी, तो व्यापारी ! "
" कुंवरजीस दावितां जवाहिर तो, तुम्हि त्यावरती
दृष्टि रोखिली स्नेहें वरचेवर हळु कां तर ती ? "

" छे छे ! भलतं ! खुळे, तयावर का रत्नावर ग ? "
" खुळीच मी, मज कशी कळावीं मनांतलीं बिंगं ?
बोलुं लागतां कान दिला जरि चपापलां स्वांतीं !
डोळयावरुनी गालीं कितिदा क्षणिं झळके कांती ! "
" कळेच ना मज, तुझ्याच मनिंचे हे सारे चाळे ! "
" खुळीस का मज शक्य नृपाच्या लेकिस जें जाळे ?
तुम्हांस दावावया जवाहिर येतां कां त्याला
जा जा ! वदलां मुखें, न नयनें ? लालि खुले गालां ?
कां ओशाळया झालां ? लज्जित जणुं कवणा झालां ?
का पाण्याला रत्नाच्या का डोळयांच्या बोला. "
" कधिं ग लाजलें ? कधीं पाहिलं मीं तेव्हां खालीं ?
नको जवाहिर म्हणुनि म्हणालें. जा ! कसली लाली ? "
" काय अतांशा झालं तर मग तुमच्या जीवाला ?
कोमेजूं कां गाल लागले ?—तो येथुनि गेला !
उगिच बसोनी कां वाऱ्याला कान कधीं देतां ?
उगिच कुणाचा भास होउनी किति फुगतां फुलतां ?
हात ठेवुनी दारावर किति वेळ उभ्या असतां ?
जणुं उघडिल कुणि दार ! गवाक्षीं कां ढुंकित बसतां ? "
" कधिं ग दिला कुणिं कान ? कुणाला कधिं ग भास झाला ? "
" कळेल कैसं देउनि चुकतां हृदयचि दुसऱ्याला ? "
" घे घे सटवे, आळ घेशि तर भलता मजवरती !
जा म्हण, बसलं मन त्यांवर, चल, निघ येथुनि परती ! "

" कंवराणीजी, कां रागवतां ? ही लोचट दासी—
क्षीण अवयवीं किति तरि खुलते छबि ही आतांशी !
संचरलं तें वारं, स्मर कीं काय म्हणति ज्याला,
बहार उसळे किती चहुंकडे शरीरवेलीला !
खैरपूरच्या गुणवयरूपें योग्य कुमाराला
राणाजी ते देतां म्हणतां ' ना ' कां मग त्याला ? "
" खैरपूर किति धनाढ्य ! त्यांना योग्य अम्ही का ग ? "
" कंवराणीजी, किती लपवितां मन ? किति हीं सोंगं ?
किति भोळया तुम्हि ! खैरपुरेशचि ते, न व्यापारी,
वेष पालटुनि आले इकडिल बघण्या ही स्वारी. "
" काय पुन्हा ते खैर–तेच–व्या–का–कूवरजी ते ? "
" मी खोटी, मी सटवी लुब्री ? उर कां धडधडतें ? "

इंदूर, ता. २३ जुलै १९०४ ]

## ५४ आनंदी आनंद !

आनंदी आनंद मुलांनो, आनंदी आनंद !
चहूंकडे दशदिशीं दाटला आनंदी आनंद ! ध्रु०

आकाशीं आनंद वरी
भरे धरेवरि त्याचपरी,
गिरिशिखरीं, तरुशिखरिं, घरीं
आनंदाचा सागर भरला घ्याच बुड्या स्वच्छंद. १

फुलावरुनिया फुलावरि सुखें फुलपांखरुं ज्यापरी झुले,
तसें झुलाया तुम्हां उधळिलीं प्रभुजीनें चहुंबाजु फुलें.
म्हणुनी उडतां बागडतां,
गरगरगर मंडळ धरितां,
सलील हासत गुणगुणतां.
वस्तुमात्र आनंद दे, तुम्हां काय जगाचे फंद ? २

झुळझुळ मंजुळ गातो निर्मळ झरा, युद्ध जुंपो तीरीं,
पर्वा त्याची काय झऱ्याला ? जीवन तुमचें त्याचपरी.
घडामोड चाले जगतीं,
किति हसती, किति आरडती,
काय तुम्हां त्याची गणती ?
तुम्हि तुमचा आनंद अहाहा ! आनंदांताचि धुंद ! ३

किति धडपडतों अम्ही कीं मिळो आनंदाचा लेश तरी,
तऱ्हा तऱ्हा किति करितों परि तो फसवि अम्हां मृगजळापरी.
अग्निरथीं त्याला बघतों,
शोधित तारांमधिं फिरतों,
व्याप हाच त्या दडपीतो,
दिशाभूल हो अमुची, न मिळे आनंदाचा गंध. ४

पापशून्य, अति निर्मळ हृदयीं आनंदाला वास रुचे,
मंदिर सुंदर आनंदाचें हृदय म्हणोनिच तें तुमचें.
खोटी लज्जा, राग तसें
खोटें रडणें आणि हसें—
काय तुम्हां हें सर्व पिसें ?
आनंदति किति डोळे अमुचे बघतां तुमचे वृंद ! ५

गोड चिमुकल्या छबिल्यांनो, या अखंड आनंदांत वसा,
खरें गमावुनि उगिच बेगडी मुलाम्यास नच कधीं फसा,
आनंदाचें दास्य करा,
बळकट त्याची कास धरा,
मग न तयाला वाण जरा,
सकल मनोरथ पुरवो तुमचे आनंदाचा कंद ! ६

इंदूर, ऑगस्ट १९०६ ]

## ५५ क्षिप्रा-चमळासंगम

[ सुनीत, वृत्त शार्दूलविक्रीडित ]

या क्षिप्रा-चमळा परस्पर कशा आलिंगिती धावुनी !
आला हा गिरि आडवा, बघ कशा याला त्रिधा भेदिती !
याचे हे तुकडे तटांवर, तसा मध्यें त्रिकोणाकृती
होवोनी तट भव्य उंच दिसती; शोभा प्रिये, हो दुणी.

आतां मूक उभे पुकार करिती साऱ्या जगालागुनी
"प्रेमाचें भरतें अनावर ! बघा ही आमुची दुर्गती !"
आहाहा किति रम्य संगम ! गमे श्री-शारदा भेटती,
किंवा या भगिनीच गीति-कविता आसक्त आलिंगनीं—

सांगूं याहुनि काय ? भिन्न कुलिं गे पावोनिया संभवा
तूं मी ज्यापरि भेटलों मिसळलों, गे एक झालों सखे.
येथें रम्य गभीर भीषण अशा या सृष्टिच्या वैभवा
वाटे शांति भुलोनिया पसरली, ती ही निजे का सुखें ?
आरोळ्या पिटतों मर्दे शिशुपरी नाचोनि मी या स्थळीं,
संवादीच, गभीर, खोल घुमते आरण्य शब्दावली.

इंदूर, ता १३ मे १९०७]

## ५६ हें कोण गे आई ?

[ छंद जीवनलहरी ]

नदीच्या शेजारीं
गडाच्या खिंडारीं
झाडांच्या ओळींत
वेळूंच्या जाळींत
दिवसां दुपारीं
जांभळी अंधारी–
मोडकें देऊळ
त्यावरी पिंपळ,
कोण गे त्या ठायीं
रहातें गे आई ? १
चिंचांच्या शेंड्यांना
वडांच्या दाढ्यांना
ओढोनी हालवी
कोण गे पालवी ?

कोण गे जोरानें
मोठ्यानें मोठ्यानें
शीळ गे वाजवी
पांखरां लाजवी ?
सारखी किति वेळ
ऐकूं ये ती शीळ ? २
वाळलीं सोनेरी
पानें गे चौफेरी
मंडळ धरोनी
नाचती ऐकोनी
किती मीं पाहिलें
इत्केंची देखिलें,

| | | | |
|---|---|---|---|
| झाडांच्या साउल्या | | उरांत धडूधडे, | |
| नदींत कांपल्या. | | धावतां मी पडे, | |
| हांका मीं मारिल्या, | | पळालों तेथून– | |
| वांकोल्या ऐकिल्या. | ३ | कोण ये मागून ? | ४ |

इंदूर, मे १९०७ ]

## ५७ रासमंडळ गोपीचंदन—

[ जाति पतितपावन ]

राऽसमंडळ गोपीचंदन तुलसिकि माला जय् ! ध्रु०

अफाट पसरे वाळवंट बहु यमुनातीरीं जें
तिथे गाउनी नाचे कान्हा गोपाळांसंगें,
यमुना देई सूर तयां, वन कांठावर रंगे;
तें गाणें गावोनि नाचुं या देवहि गाती जें. १

हिरवें हिरवें गार शेत हें सुंदर साळीचें
झोंके घेतें कसें ! चहुंकडे हिरवे गालीचे
लांब पसरले या ओढ्याच्या कांठाकांठानें.
खळखळ सळसळ मिसळे, मिळवूं या अपुलें गाणें.
त्या ओढ्याला त्या शेताला लाटा किति येती,
ओळी त्यांच्या एकामागुनि एक लांब जाती;
त्यांसह लाटा आनंदाच्या करिती मनिं थय् थय् ! २

पिवळें तांबुस ऊन कोवळें पसरे चहुफेर,
ओढा नेई सोनें वाटे वाहुनिया दूर.
झाडांनीं किति मुगुट घातले डोकिस सोनेरी,
अहाहा ! पहा तर सोन्याचा गोळा तो क्षितिजीं ! ३

सोनेरी मखमली रुपेरी पंख कितीकांचे,
रंग किती वर तऱ्हेतऱ्हेचे इंद्रधनुष्याचे !
अशीं अचल फुलपांखरें फुलें साळिस जणुं फुलती,
साळीवर झोपलीं जणूं का पाळण्यांत झुलती.
झुळकन् सुळकन् इकडुनि तिकडे किति दुसरीं उडती,
हिरेमाणिकेंपाचू फुटुनी पंखचि गरगरती.
उडूं, बागडूं, नाचूं, गरगर फिरूं चला मौजें ! ४

उद्यां सकाळी मुलेंमुली त्या खेड्याहुनि येतां
येथे मंडल गोल उमटलें कुरणावर बघतां
टकमक बघतिल परस्परांना, कौतुक हें केवी !
म्हणतिल येथें नाच नाचल्या रात्रीं वनदेवी.
पहा पांखरें चरोनि होती झाडांवर गोळा,
कुठे बुडाला पलीकडिल तो सोन्याचा गोळा ?
वाऱ्यापरि या चलूं घराला नाचतचीं थय्थय् ! ५

इंदूर, ता १६ जून १९०७ ]

# ५८ आईकडे न्या !

[ जाति भूपति ]

कोवळी फुलें वाळलीं कोवळया गालीं;
' मज आइकडे न्या ' म्हणे, आसवें आलीं.

उरि धरा, कांहिंही करा, न हासे-खेळे;
' मज आइकडे न्या ' असें सोनुलें बोले.

चहुंकडे घेउनी कडे फिरविलें त्यास,
' मज आइकडे न्या '! खळचि नसे तोंडास.

' सोनुल्या, छान बाहुल्या आणि घे घोडे '
' मज आइकडे न्या ' गोष्ट न अपुली सोडे.

' खाउ घे, रहा पण उगें ! किती समजावूं ? '
' मज आइकडे न्या ' म्हणे—काय त्या खाऊ ?

माउची, चिऊ-काउची कहाणी सांगे
' मज आइकडे न्या ' एक, पाठिला लागे.

काउची, गाउ-बाउचीं गाइलीं गाणीं;
' मज आइकडे न्या ' मनीं न दुसरें आणी.

' किति लांब मुला, तें गांव जिथे गेली ती ! '
' मज आइकडे न्या ' गोष्ट एक पहिली ती.

' वांकड्या मधें टेकड्या, नद्या, किति रानें ! '
घे ऐकुनि, ' आईकडे न्याच ' परि गाणें.

किति किती योजिल्या रिती तया रिझवाया !
'मज आइकडे न्या !' दुसरें सारें वाया.

भगवान ! वांचती प्राण कसे तरि त्यांचे
जग सोडुनि जाती आइबाप हे ज्यांचे ?

इंदूर, ता. १८ जून १९०७ ]

## ५९ तर मग गट्टी कोणाशीं ?

[ जाति मौक्तिकमाला ]

" तुझ्या गळां
माझ्या गळां
गुंफूं मोत्यांच्या माळा—"
" ताई, आणखि कोणाला ? "
"चल रे दादा चहाटळा ! १
तुज कंठी
मज अंगठी !"
" आणखि गोऽफ कोणाला ? "
" वेड लागलें दादाला ! "
"मला कुणाचे ? ताईला !" २

" तुज पगडी
मज चिरडी !"
"आणखि शेला कोणाला? "
"दादा, सांगू बाबांला ? "
"सांग तिकडल्या स्वारीला ! ३
खुसूं खुसूं
गालिं हसूं—
वरवर अपुले रुसूं रुसूं !"
"चल निघ, येथें नको बसूं"
"घर तर माझें तसू तसू. ४

कशी कशी
आज अशी
गम्मत ताईची खाशी !"
" अतां गडी फू दादाशीं "
" तर मग गट्टी कोणाशीं ? " ५

इंदूर, ता. २० जून १९०७ ]

## ६० शिशुवंचन

[ जाति भूपति ]

“ जाउनी तिला येथुनी दिवस किति झाले !
बोलवा आइला दादा ! ” म्हणती बाळें.

किति सरळ बोल हे विमल मधुर वदनाचे !
कां विकल होय मग बाप ? काय त्या बोचे ?

ठेवुनी झणीं लेखणी कां मुलां पाही ?
हा अवचित दचकुनि जणूं डसे या कांहीं !

परि फिरुनि तेच आजुनी घोकती बोल,
“ बोलवा आइला ” सुटे तयाचा तोल.

झडकरी उठोनी धरी उरीं बाळांला,
वरिवरी चुंबितो, पिसें लागलें याला.

वरिवरी घट्ट उरिं धरी, करें कुरवाळी
ते कुरळ केस—कां मोह असा या काळीं ?

परि काय तयाचें हाय मुग्ध बालांस ?
पुनरपी तेंच हो, काय करावें यांस ?

कोंबितो उरीं परत तो उसासे अपुले,
त्यां अंकीं घेउनि सकंप कंठें बोले:—

“ कां म्हणुनि आज ही फिरुनि आठवण झाली
सोनुल्यांस माझ्या तिची अशी या काळीं ?

तिजाविणें कांहिं का उणें असे छबिल्यांस ?
मग खंत तिची कां अशी बरें तुम्हांस ?

न्हाणितों, जेवुं घालितों, करविं अंगाई,
मग तुमची आई मीच, म्हणा मज आई."

" तिजविणें कशाचें उणें ? पण तुम्ही दादा ! "
तीं म्हणती, " दादा, बाजू अपुली साधा.

" येईल कधीं घेईल अम्हांला आई ?
हा घेइल पापा ? देइ दुधाची साई ? "

किति मधुर मधुर किति अधर ? मधुर ते बोल
परि उरीं बोचिती सुरी पित्याच्या खोल.

तीं दीन माउलीवांण मुलें पाहोनी
भडभडेल हृदयीं असो दगड का कोणी !

मग बाप कसा तो ताप हे प्रभो, साही ?
घन मोहतमीं बुचकळे, काय नवलाई ?

चुंबुनी, बळें हासुनी पिशापरि हास
तो म्हणे ' उद्यां येईल आइ हो खास ! '

हे पूर्ण उमटले जों न शब्द बाहेर,
तों थरारलें घर आनंदें चौफेर.

ज्यापरी झरा गिरिवरी खदखदा खिदळे,
तो अहेतु सैरावैरा गोंदू उधळे.

ज्यापरी सराच्या उरीं थाटते लाट
त्यापरी शांतिच्या बागडण्याचा थाट !

" येईल, उद्यां घेईल आपणां आई;
मग दिवस मजेचा खरा उद्यांचा ताई ! "

" मी अर्धी देइनच तर्धी आइला पापा,
मग खुशाल दे तूं ! " अशा चालल्या गप्पा.

" किति किती अतां गम्मती सांगुं आईला ! "
यापरी चिमकुली शांति वदे भाईला.

अज्ञान मुलें ती सान, अनृत त्यां कसलें ?
त्या मनोराज्यसुखिं दंग जाहलीं अपुले

अज्ञान बापही कां न ? अरेरे देवा !
कां दिधला दुःखद बुद्धिसुखाचा ठेवा ?

स्वप्नांत राज्यसौख्यांत मग्न बहु असतां
किति मरण बरें हो अवचित सर्पे डसतां ?

नाचती मुलें साच तीं, सकल हा थाट—
पक्वान्न चितेवर शिजवुनि भरलें ताट !

तो उभा, तों फुले प्रभा उषेची सदनीं,
अंधार कोंदला उरिं, पसरे तो वदनीं.

तीं स्वैर मुलें चौफेर गरगरा फिरती,
गरगरा फिरे तो भोवऱ्यांत जणुं सरितीं.

तीं फुलें पाहिलीं मुलें प्रमोदें फुललीं,
हा उभा अचंचल, वृत्ति कुणिकडे झुकली ?

गतकाल सकल तत्काल बालसा जागे,
घनतमीं शुक्रसा प्रगटे, झळकूं लागे.

पातली सती त्या स्थलीं मनोमय युवती
ती नभोद्योति लखलखे उषेची मूर्ती !

धावोनि मुलें उचलोनि धरिल हातांनीं
तों ‘ आई ! आई ! ’ ये कोलाहल कानीं.

ज्यापरी सुखी केसरी तरुतळीं निजला
खडबडोनि धावे शर अवचित जरि रुतला;

त्यापरी स्वप्नसुंदरीं सुखीं तो मग्न
असतांना होई अवचित उर तें भग्न !

टाकितो लांब लांब तो पाउलें आतां,
घे अहेतु फेऱ्या; –हाय पळाली कांता !

“ ती उद्यां तरी होउं द्या अतां लवलाही ! ”
आक्रोशुनि म्हणती बाळें, “ आई आई ! ”

निर्झरी गिरीच्या उदरिं कोंडली असतां
सळसळोनि उसळे स्थळ तिजला सांपडतां;

कोंबिले, उगमिं दाबिले अश्रु आजोनी
खळखळोनि गळती बालवचन परिसोनी.

धुमसतो अग्नि आंत तों होय मग भडका,
वरिवरी उसासे भरी, येउनी हुंद्का.

धावुनी मुलें तत्क्षणीं उरीं तो धरितो,
“ ती अतांच गेली येउनि ” त्यांना म्हणतो,

“ अघनिधी जाहले अधीं करीं या धीट;
मी विपाक त्यांचा भोगावा हें नीट !

चिमुकलीं मुलें सोनुलीं विमल निष्पाप—
हे दीनदयाळा, तयांस कां हा ताप ? ”

इंदूर, ता. २० जून १९०७ ]

# ६१ गतकाल

[ जाति पतितपावन ]

मध्यरात्रिच्या निवांत समयीं रे माझ्या हृदया,
गत घटिकांतुनि किती भटकशिल सांग अतां सखया.

गतकाळाचें श्मशान यापरि जागवितां घटिका
भुतें जागतिल, मुखें वासतिल, खेळ परी लटिका.

निज निधनीं निधनातें नेलीं आशांसह रत्नें,
वदनीं त्यांच्या दिसोत; मिळतिल काय अशा यत्नें ?

सस्मित वदनें, धवल दंतही, कुरळ केश भालीं;
मधुर मनोरम नयन, विकसली गालांवर लाली.

प्राणाहुनिही प्रिय हीं रत्नें मृतघटिकावदनीं
दिसतिल तुजला, गोष्ट खरी परि मिळतिल का बघुनी ?

किंबहुना तें हसणें, रुसणें, गोडहि ते बोल
दिसतिल नयनीं, श्रवणीं येतिल, सर्व परी फोल !

ऐंद्रजालिकें पेढे केले, मुखिं होती माती;
मृतघटिवदनीं तैशीं रत्नें, दुःखचि ये हातीं.

गेल्या गेल्या आशा, पडल्या भस्माच्या राशी,
त्यांवरि घिरट्या घालुनि ये का कांहीं हाताशीं ?

मनोराज्यसम दृश्य मधुर तें परी भासमान,
परिणामीं हें कासावीसचि करिल तुझा प्राण.

सोड सोड रे नाद तयाचा यास्तव तूं सखया,
बघूं नको माघारा, पाहीं आगामी समया.

काळाच्या गर्भांत असति ज्या अजात घटि अजुनी
तयांकडे बघ सख्या, अतां तूं आशाळू नयनीं.

मृतघटिकांहीं नेलें तें तुज आणुनि देतिल त्या,
हताश होऊं नको फसुनिया नादीं तूं भलत्या.

इंदूर, १९०८ (?) ]

## ६२ अंधारांतून डोकावणारीं मुखें

[ सुनीत, वृत्त शार्दूलविक्रीडित ]

रात्रीं शांत निवांत विश्व वश हें निद्रेस झाल्यावरी
निद्रा घालित झांप ये मजवरी, तीतें दुरी सारुनी
काळाचा पडदा वरी उचलुनी गाढांधकारांतुनी
पर्यंकाभवतीं मुखें प्रकटती निश्शब्द जादूपरी.

दादा, एक म्हणे; दुजें प्रिय सख्या; बाळा तिजें; यापरी
प्रेमें बोलविती मला रिझवुनी तीं मूक संबोधनीं;
पर्यंकावरुनी मला उचलुनी गाढांधकारांतुनी
मंत्रें मोहुनि पाडुनी भुरळ तीं नेती क्षणार्धीं दुरी.

विश्वातें गिळितां तमें उजळिती जी ज्योति तीं अंतरीं,
तेणें विस्मृति–अंधकार जळतां, शांत प्रभा फांकुनी
जी रम्या गतसृष्टि दृष्टिपथिं ये तीमाजि संचारुनी,
मी माझ्या मृत संसृतींत मिसळें एका क्षणाभीतरी.
आहाहा ! गतसृष्टि सोडुनि जडीं सृष्टींत या येउनी
देवा, तीं गुज सांगतील निज का केव्हां मला भेटुनी ?

इंदूर, १९०८ (?) ]

## ६३ काळेभोर विशाळ केस

[ सुनीत, वृत्त शार्दूलविक्रीडित ]

काळेभोर विशाळ केस रुळती तीच्या नितंबावरी;
 तैसें भाळ विशाळ गौर झळके चंद्रापरी तें तिचें;
 ते डोळे नच छे ! विलासगृह कीं माहेर चिच्छक्तिचें;
किंवा काव्यलतेवरी उमललीं हीं दोन पुष्पें तरी.

श्री ही केवळ का वसंतऋतुची येई नटोनी खरी;
 किवा मूर्तिमती प्रभात उमले; कीं फांकली पौर्णिमा;
 प्रीतिज्योतिच काय ही उजळली; कीं शारदा, कीं रमा ?
वाटे ही रचितां, विहार कविता चित्तीं विधीच्या करी !

काळा, लावुनि तूं तुझी कलम या रूपास याऊपरी
 रेखामात्र उणेंअधीक करुनी नाशूं नको पूर्णता;
 गालीं ज्या खुलती छटा वितळती, साश्चर्य त्या पाहतां
वाटे सांठविलें कळे न किति तें सौंदर्य या अंतरीं.

 पापाची स्मृति राहिली जर नरा पाहूनि ही सुंदरी,
 धिग्धिक् ! त्या कळली अगाध हरिची नाहींच कारागिरी !

गुदरखेडा, फेब्रुवारी १९१० ]

## ६४ पन्नास वर्षांनंतर

[ जाति मुद्रिका ]

तूं हुबेहूब साउली त्याच मूर्तिची
हरपली दिवंगत झाली  जी मूर्ति साउली तिची,
भटकतां विदेशीं दीन हीन जी मुली,
कधिंकधीं मनोमय ऐशा  स्वप्नभूमधें भेटली.
संपला दिवस, गे अतां सांज जाहली;
कधिं घोर रात्र ये ऐशी  हुरहूर जया लागली,
त्याचिया उषेचें चित्र, तया दाविशी !
का जन्मभरी रचिली गे  ती घडी अंतिं मोडिशी ?
तें विकसित कमलापरी बिंब, ती प्रभा -
सौवर्ण शरांसम हा हा !  ते किरण झोंबती नभा;
तें हरित पल्लवांतील मंजु कूजन,
उघडणें नयन वेलींचें,  तें त्यांचें आंदोलन !
आवरी, आवरीं मुली ! जाइं निर्दये !
जाईल जीव हा माझा  पाहतां चित्र तें बये !
लाविलें दार जखडोनि, कुलुप घातलें,
तें वाद्य उघडुनी हा हा !  कळ फिरवूं मन धावलें.
गत सूर ऐकतां भान न उरलें मुली,
जा ! पुरे करीं तव माया,  हा हाय हद्द जाहली !
चळ भरला म्हणशिल मला खरें तें मुली,
विसरूनि मला मी गेलों  पाहूनि तुला या स्थळीं.
बालार्क-किरण हे तुला न्हाउं घालिती,
या संध्याभेसुर छाया  चहुंकडे मला घेरिती.

चढणीवर पाउल तुझें, उतरणीवरी
भरभरा पाउलें माझीं पडतात सावरीं तरी.

तुज मंडोळ्या प्रीतिच्या शोभती, परी
वांकलों मृताशाभारें वाहुनि त्या पाठीवरी.

यापरी कोण तूं, कोण मीहि आठवें;
जें मेलें गेलें त्याचें भूत गे कशाला हवें ?

जा ! जाइं इथोनी, सुखें मरूं दे मला,
या लीला त्यास्तव राखीं जो प्रीतिमदें झिंगला.

परी दया करीं त्यावरी जया भेदिशी;
नच हत्या करिं कवणाची, बघ दशा होय मम कशी !

तूं नात जिची गे पणतू होउत तिला !
रडणार कोण मजसाठीं ? नशिबास नर्क ठेविला !

गुदरखेडा, मार्च १९१० ]

## ६५ निःशब्द आत्मयज्ञ

[ जाति पतितपावन ]

कधीं भेटतां एकांतीं ती नाहिं कुणा दिसली,
कधीं बोलतां परस्परांशीं नाहीं पाहियली.

दृष्टादृष्टहि परस्परांची जरी कधीं झाली,
कधीं न लवलें पातें, न कधीं छटा दिसे गालीं.

कधीं निमंत्रित भोजनास तो घरीं जरी आला
हर्षविषाद न कधीं तिच्या तो शिवला चित्ताला.

गौर मनोरम रूप तयाचें, लाजावें मदनें,
मोहित सारे, परि न बघे ती एकवार नयनें.

तो दीनांचा कनवाळू जैं भरोनिया डोळे
"या विधवांवरि दया करा हो!" कळवळुनी बोले,

कानोसा घेतांना भासे एक दिवस बसली,
परि पाहुनि मज शांतपणें ती निघोनिया गेली.

कंपित हस्तें लेख लिहित ती नाहीं कधिं दिसली,
वेळिं अवेळीं वळचणींतुनी नाहिं पुडी पडली.

तरी सकाळीं एक दिवस मज तिच्या अंगुलीला,
डाग दिसे शाईचा; कागद तुकडे झालेला,

त्याच अंगुलीवरी परि दिसे फोडहि आलेला,
कधीं पोळलें बोट कशानें ठाउक देवाला!

अंथरुणावरि कधिं रात्रीं नच दिसली बसलेली,
तरी कधिकधीं उशी तियेची दिसली भिजलेली.

कोंदण हरपे, दीन हिरकणी कोपऱ्यांत लोळे,
असें वाटलें मज दगडा कधिं बघुनि तिचे डोळे.

ती चंद्राची कोर, जिला हो लाजावें रतिनें,
कळाहीन लागली दिसाया हाय काळगतिनें!

हळूहळू ती गळूं लागली, गाल खोल गेले,
ज्वरें जीर्ण त्या कोमल हृदयीं ठाणें बसवीलें.

किती वेळ तो समाचारही घ्यायाला आला,
नयनीं त्याच्या काळजिचा कधिं भास मला झाला.

डाक्तर झाले, हकीम झाले, वैद्यहि ते झाले,
निदान होय न कुणा, कुणाची मात्रा नच चाले.

"दीनदयाळा मरणा, सोडिव !" जपोनि जप हाय !
कारुण्याची मूर्ति मावळे, थिजला तो काय !
अकस्मात त्या क्षणापासुनी अदृश्य तो झाला,
कोठे गेला, काय जाहलें, ठाउक देवाला !

[भुदरखेडा, १९१० ( ? ) ]

## ६६ मातृभूमीप्रत

[ वृत्त शार्दूलविक्रीडित ]

जन्मा येउनिया कुशीं तव, तुझ्या स्कंधीं उरीं वाढुनी
प्रेमाचा नच गोड शब्द वदलों केव्हां तुला आजुनी,
नाहीं एक विचारही अजुनिया त्वत्सेवनीं योजिला;
ऐशाला म्हणशील काय मजला तूं सांग गे आपुला ? १

जे त्वत्पुत्र उदारधी झिजविती काया तुझ्या सेवनीं,
जाळाया निज पोट ही शिणविली वाणी तयां निंदुनीं;
व्हावा तोष धन्यास यास्तव सदा मी हासलों त्यांजला,
आतां तूं कुरवाळशील वद का ऐशा कुपुत्रा मला ? २

'खोटी ही दुबळी, गुलाम, भरला वृद्धापकाळीं चळ,'
ऐसा दोष दिला तुला वश परां होवोनिया केवळ;
आतां हें स्मरतां मना हळहळे तें; गे गळा दाटला—
डोळे तूं पुसशील काय पदरें घेवोनि अंकीं मला ? ३

जें त्वां जीवन हें दिलें, सकळ ही सत्ता तुझी ज्यावरी
जातां तें परसेवनीं न तिळही संकोचलों अंतरीं;
धिग्धिग् जीवन हें ! असें मन अतां धिक्कारितें गे मला,
त्यातें तूं धरिशील काय हृदयीं पान्हा फुटोनी तुला ? ४

आहाहा ! सुत ते असिव्रत जई त्वत्सेवनीं पाळितां
धैर्याचे गिरि ते कधीं न डगले आकाशही फाटतां,
नेतां त्यांस दिगंतरास फुटला आई, उमाळा तुला—
डोळे तूं पुसशील का निज, यमें नर्कास नेतां मला ? ५

गुदरखेडा, १९१० ( ? ) ]

## ६७ आलें तुझ्या रे दारीं नृपा

[ राग भैरवी ]

आलें तुझ्या रे दारीं नृपा, घालीं भिकेला करिं रे कृपा ! ध्रु०

नांव ऐकुनी तुझें
वाट दूर चालुनी
आलें उपाशी थकुनि भागुनी. १

मूठ घालितां मला
हीन दीन याचका
भांडार सारें रितेंच होय का ? २

ताट दाटलें तुझें
अन्न त्यांत राहिना,
उच्छिष्ट घालिं रे उपाशि या जना. ३

ज्ञानिया जनार्दना,
जनिस घातली न का ?
केला कुबेरापरि न का तुका ? ४

मीच काय एकली
दारिं तुझ्या येउनी
जाईन विन्मुखी निराश होउनी ? ५

घाल घाल रे नृपा,
वेळ काय लाविशी ?
जीव चालला, किती अंत पाहशी ? ६

प्रतापगढ, १९१८ ]

## ६८ रे चेटक्या !

[ जाति पतितपावन, राग यमनकल्याण ]

नादीं लागुनि तुझ्या चेटक्या, जारिण मी ठरलें. ध्रु०

नादी लागुनि तुझ्या चेटक्या, जारिण मी ठरलें
इहपरलोकां आंचवलें रे, तोंडघशीं पडलें.
सोंगाला भाळलें तुझ्या रे, नेणुनि रूप खरें;
भोळि भुरळलें छायेला रे, फसलें प्रेमभरें.
सासु सासरे नणदा जावा
परोपरीनें धरिती दावा,
तुझाहि अजुनी न कुठे ठावा, न हें न तें घडलें. १

कधिं चंद्राच्या मिषें घालिशी डोळा मजवरती,
कधिं ताऱ्यांच्या मिषें घालिशी कटाक्ष तीव्र अती,
प्रेमकलहिं तूं रागावुनि कधिं सूर्यमिषें बघशी
लाल शाल घालोनि कधिंकधीं उषामिषें हसशी,
करणी करुनी यापरि हरिलें
मन माझें तें, बहु चाळविलें;
खरे रूप परि कधिं न दाविलें, कपटचि आचरिलें. २

कामातुर मी सैरावैरा दाहि दिशा फिरतें,
पाठ पुरविती भुतें तुझीं रे, तुजला अंतरतें;
या दारीं त्या दारिं पाहिलें, कोठे दडलाशी ?
इथें ढुंकितें तिथें ढुंकितें, असुनि न कां दिसशी ?
लाज सोडिली, भीड मोडली,
परोपरी बोलणीं साहिलीं,
वण वण करितां कुडी भागली, मन हें बावरलें. ३

यापरि आतां किती गांजशिल ? करिशिल किति चाळे ?
पुरें सोंग हें ! पुरे खेळ हे ! मन हें कंटाळे.
सत्त्व पाहणें पुरे ! परीक्षा पुरे अतां सखया !
पाटाचा सोहळा लाभुं दे, आतां ये सदया !
नाक घासतें, पदर पसरितें,
निजरूपीं ये, किति आळवितें !
प्राणचि नातरि देइन परते ! काय जगीं उरलें ? ४

प्रतापगड, १९१८ (?) ]

## ६९ प्रभु, तुज कवणेपरि ध्याऊं ?

[ जाति अजर्नी, राग परज ]

प्रभु तुज कवणेपरि ध्याऊं ? ध्रु०

नामातीता तुजला स्वामी
संबोधूं मी कवण्या नामीं ?
किति असलों जरि सेवाकामीं
केवि तुला सेवूं ? १

चिद्घन तूं, ही जड मम वाणी;
सुख तूं, ही दुःखाची खाणी;
अनंत तूं, हीं सांतचि गाणीं,
कैशीं तव गाऊं ? २

रूपातीता रूपमूढ जन,
गुणातिरिक्ता गुणग्रस्त मन
केवि अचिंत्या ध्याइल चिंतुन ?
कैसा तुज लाहूं ? ३

अपार तूझें अगम्य वैभव,
हीन दीन मी मायासंभव,
कसे आळवूं नाथ, चरण तव ?
तेज कसें साहूं ? ४

नामरुपाचा दृश्य पसारा
अवाढव्य हा अपार सारा !
बावरलों, किति सैरावैरा
मृगापरी धावूं ? ५

घनतिमिरीं मी बालक तान्हें
प्रकाशार्थ अति केविलवाणें
हात नाचवीं, टाहो जाणें,
केवि हृदय दावूं ? ६

माउलिला तुजला प्रभुराया,
चुकलों ! लागें आर्त रडाया;
लावशील का कधीं उरा या ?
कोठें तुज पाहूं ? ७

प्रतापगड, ता. १५ मार्च १९१८ ]

## ७० रे मानसहंसा !

[ जाति उद्धव ]

रे मानसहंसा माझ्या, उड्डाण तुझें अनिवार;
वायूहुनि तेजाहुनिही गति तुझी तरल ती फार
त्रैलोक्यीं गमन तुझें रे, कोठें न तुला अटकाव;
रविकिरण न शिरती जेथे तेथेहि तुझी रे धाव.
क्षणिं नभीं क्षणीं पातालीं,
दशदिशांत एके कालीं,
कधिं शांति न ठावी झाली,
घेईल वीजही हार. रे० १

सामर्थ्य अतर्क्यचि तूझें, महिम्यास तुझ्या नच पार,
सुख व्हावें मजला म्हणुनी विश्वांत तुझा संचार.
आणिशी सुरासुर सकलां करुनिया तयां बेजार.
विश्रांति न माझ्या कामीं, मजवरी किती उपकार !
सूर्यही चितारी केला,
केलेंस फरास विजेला,
सारथी रथीं अग्नीला,
परि यांत काय रे सार ? रे० २

घालिशी हमामा कां रे ? विश्वांत कुठे सुखलेश ?
पतिवीण पसारा सारा हा फुका ! करिशि कां क्लेश ?
कारागृहिं कल्पलताही लावितां सुखाशा वाया !
बाजार मांडिला का रे ? निर्जीव भुतें ही छाया !
प्रिय सखा जिव्हाळा माझा
विश्वाचा साऱ्या राजा,
अंतरलें त्या पतिराजा—
त्यावीण काय संसार ? रे० ३

कालाच्या तीरावरुनी,  मरणाच्या वेशीहून
घेउनी भरारी हंसा,  अज्ञातीं जाय शिरून;
प्रिय सखा पहा जा माझा  प्राणाचा माझ्या प्राण,
तरि दूत खरा तूं हंसा,  तरि खरें तुझें उड्डाण!
जा निरोप त्याला सांगें,  जन्माची सांग कहाणी–
"विरहानल जाळी सखया,  वार्ताहि न कोणी आणी.
मी राणी या विश्वाची
जाहलें भिकारिण साची
विपरीत गती कर्माची,
विपरीत कसा व्यवहार!" रे० ४

"दिन गेले, वर्षें गेलीं,  लोटलीं युगेंही नाथा;
तळमळें वियोगी सखया,  पाहशी अंत किति आतां?
विसरशी कसा दासीला?  अपराध काय तरि झाला?
कोणास शरण मी जाऊं?  कथुं दुःख तरी कोणाला?
प्रार्थितें हात जोडोनी,
बहुवार पदर पसरोनी,
शांतवीं अतां भेटोनी!
तुजवीण कोण आधार?" रे० ५

प्रतापगड, फेब्रुवारी १९२० (?)]

## ७१ अनंत-स्तोत्र

[ वृत्त सौदामिनी, राग मालकंस ]

अनंता, तुझे गोल, तारे तुझे,
तुझें रूप ब्रह्मांड सारं तुझें,
तुझी ही कृती रे मनोमोहना,
अहोरात्र गाई तुझ्या गायना. १

तया मूक गानें मना मोहिलें,
जगन्नायका, वेड की लाविलें;
नुरे भान, मी स्वाधिकारा भुलें;
भरूं लागलों सूर वेडे खुळे. २

मदी त्या तुझें रूप गाऊं धजें,
स्वयंदीपका दीप दावूं सजें;
न द्यावा जिथे पाय तेथे दिला,
बहू लाजलों भान येतां मला ३

तुझे लाडके रे, तुझे लाल जे
वृथा स्पर्धण्या त्यांसवें मी धजें;
करोनी दया रे दयासागरा,
क्षमस्व प्रभो, या तुझ्या लेकरा. ४

अहो भाग्य माझें जरी या सुरीं
सहस्रांश त्या गीतिची माधुरी !
तरी हे त्वदंघ्रीं समर्पीं हरी !
रुचो हें तुला स्तोत्र, घे आवरीं. ५

प्रतापगढ, ता. ८ फेब्रुवारी १९२० ]

## ७२ सामाजिक पाश

[ सुनीत, वृत्त शार्दूलविक्रीडित ]

प्रेमोत्कर्ष मनें परस्पर जयीं आकर्षितो भूवरी
तेव्हां काय घडे महाकविसही तें ये कसें सांगतां ?
जन्मा प्रेमिजनाचियाच बघणें जाऊनिया तें स्वता;
वंध्येला प्रसवाचिया वद कळा कैशा कळाव्या तरी ?

माळा व्याकुळ ही गळ्यांतिल करी, होई पळाचें युग,
सांगूं काय, अफाट ये जरि नदी दोघांमधें आडवी,
उत्कंठा ढकली पदोपदिं पुढें, प्रीती उडी घालवी,
ओढोनी जणुं का लगाम फिरवी भीती तयांना मग.

आशा, प्रीति फळा न येउनि जरी मृत्यूच नेई लया,
हा हा हा ! मग काय दुर्गति घडे योगें उरे त्या उरीं
होवोनी भडका हलाहलविषें सांगूं कसें तें तरी ?
देवा रे, जगतांत शांतविल का दाहास कांहींहि या ?

साऱ्या रौरवयातना पुरवती, दुःसह्य ही दुर्गती !
वैऱ्यालाहि न दे हरी ! कुणि तरी पाडील का विस्मृती ?

प्रतापगढ, ता. २९ फेब्रुवारी १९२० ]

## ७३ कोठे शांति, तुझा निवास ?

[ म्रुनीत, वृत्त शार्दूलविक्रीडित ]

कोठे शांति, तुझा निवास ? वसशी तूं प्रीति, कोठे ? सुखा,
कोठे मंगल धाम रे तव ? धरा कीं स्वर्ग पाताळ कीं ?
लोकीं अन्य निवास का ? पडतसे छायाच येथे निकी,
तार्‍यांचा पडतो प्रकाश धरणीभागी तसें हेंहि का ?

विद्युद्दीप, हिरे, विमान, अथवा तारा, सिनेमांतरीं
किंवा कांचन-कामिनींत वसतां ? तारुण्य-बाल्यांत कीं ?
देव्हार्‍यांत मनाचिया पहुडतां गंभीर निद्रासुखीं ?
धुंडूं मी कवणे स्थळीं ? कुणि सखा दावील का हो तरी ?

किंवा केवळ अर्थशून्य असती हे शब्दची पोकळ
जैसें सुंदर नील हें नभ दिसे, अस्तित्व नाहीं परी ?
शोधूं जा तरि दूर दूर पळती हीं चक्रवालापरी
किंवा ही मृगतृष्णिका फसविते भोळ्या जनां केवळ ?

चाले नित्य अकांडतांडव इथें शोधार्थ यांच्या फुका,
देवा, तूं निजलास का ? तुज दयामाया मुळीं नाहिं का ?

प्रतापगढ, ता. ४ मार्च १९२० ]

# ७४ शांतिनिवास

[ प्रेमासाठी तळमळणारी विधवा ‘सामाजिक पाशा’ पायी ‘निःशब्द आत्मयज्ञ’ करिते तेव्हां तिच्याविषयी अगाध सहानुभूति बाळगणारा तो तरुण दुःखानें होरपळून जातो. शांति, प्रीति आणि सुख ही कोठें आहेत, का हे ‘पोकळ शब्दच’ आहेत हें शोधून काढायला तो गिरिगव्हरवासी होतो. त्याचें वसतिस्थान त्याच्या एका मित्राला–आत्मयज्ञ करणाऱ्या विधवेच्या भावाला ठाऊक असतें, पण त्याच्या दुसऱ्या एका मित्राला ठाऊक नसतें; आणि तो तर आपल्या अदृश्य झालेल्या मित्रासाठी तळमळत राहतो. मित्राच्या दर्शनानें नाही तर निदान त्या पुण्यात्म्याचे शब्द ऐकून तरी त्याला विश्रांति मिळावी म्हणून त्याचा मित्र त्याला गिरिमुखभाषणाचा चमत्कार अगदी मुकाट्यानें पाहण्यासाठी म्हणून घेऊन जातो तेथें त्या प्रशांत स्थळी गिरिमुखांतून निघणारा स्वर कोणाचा हें तो ओळखतो. गिरिमुखातून निघणाऱ्या शब्दाचा इत्यर्थ एवढाच की, हे प्रभो ‘तव सहवासी शांति खरी, सुख खरें, खरी प्रीती’—

‘बळकट धरिली कास तुझी हरि, आता करितील
षड्रिपु माझें काय ! यमाचे पाशहि तुटतील.’ —माधवराव पटवर्धन ]

[ जाति पतितपावन ]

“ नितांत झाली शांत निशा ही; गगनाच्या प्रांतीं
गिरिशिखरीं, तरुशिरीं, धरेवरि पसरे ही शांती.
चांदीची चंद्राची नौका क्षीरसागरांत
मूक कशी चालली न करितां सळसळ बघ शांत.
प्राणायामपरायण वायू एकांतीं बसला,
मौन धरुनि मुनि–निसर्ग सखया, समाधींत थिजला.
दाहि दिशा या उज्ज्वल सखया, न्हाउनि माखोनी
ध्यानीं रतल्या शुभ्र पातळें पवित्र लेवोनी.
सोनेरी हें पानहि गळतां सळसळ सहवेना,
कांटा येई शरिरिं, शांतिचा छळ हा बघवेना. १०

केवळ माझ्या हृदयाचे हे ठोके टिकटिकती,
तेच मात्र कानावर येती, भंगति शांति किती !
मीच पिशाच्यापरी तुझ्यासह सखया रे, जागें;
नीज शिवेना मज पाप्याला तळमळ ही लागे."
"शांत पर्वे या काय पहाया हवा चमत्कार ?
माझ्या मागें येइं, शांतिचें पाहीं माहेर.
गिरिमुख बोले, तरुगण हाले, थिजति शिला जागीं,
मुळुमुळु रडती ओहळ परिसुनि त्या काननभागीं.
आवर वस्त्रें, सळसळूं न दे, पाउल वाजोना,
चाल हळुहळू, पानें वाजुनि शांती लाजोना. २०

मला वचन दे, अधीं शपथ घे, उगा न हलशील;
शब्द कशाचा, श्वासहि अपुला रोकुनि धरिशील.
भिंत चालली, रेडा बोले वेद, चमत्कार
तुला वाटती असत्य तरि ये, जपुनी परि फार."
हात ठेवुनी हातीं त्याच्या शपथहि गंभीर
घेउनि बोले सखा, "चल, कधीं ढळे न मम धीर."
गिरिच्या पश्चिमभागीं जेथे झाडी घनदाट,
पाऊलहि ठेवणें न सोपें अशी बिकट वाट,
चंद्राचे कवडसे पडोनी वाट दिसे न दिसे,
असे चालतां जपुनि जपुनि तें स्थळ अंतीं गवसे. ३०

विहिर निमुळती जणूं काय ती गुहा तिथे खोल
बसले जाउनि, गिरिमुख तें तों बोले हे बोल
"'अनुदिनिं अनुतापें तापलों रामराया,
परमदिनदयाळा, नीरसी मोहमाया,

अचपल मन माझें नावरे आवरीतां
तुजविण शिण होतो, धाव रे धाव आतां ! '
त्रिविध ताप तापवी दयाळा, भाजुनि मी गेलों,
शांत होइना दाह म्हणोनी शरण तुला आलों.
पलीकडे त्या पुरश्मशानीं हाय काय चाले !
भुतें घालिती पिंगा त्यानें धरणीही हाले. ४०

मायेनें मारितो त्या स्थळीं भाऊ बहिणीला,
बाप कापतो गळा मुलीचा, गिळी स्वमांसाला !
शास्त्रें लेकीसुनांस छळिती अपुल्या ज्ञानानें;
अज्ञानाला ज्ञान मानिती जणो सुरापानें.
माय-बहिणिच्या कर्कश ऐशा आक्रोशा रामा,
श्रवणमनोरम गान मानुनी करिती आरामा.
न्याय करी अन्याय, आचरी नीति अनीतीला;
प्रीति भीति घे प्रिय विषयाची भिऊनि रीतीला.
सुखास भाळुनि ते आवळती उरास दुःखाला;
एक दुज्याशीं वैर लाविती शांति मिळायाला. ५०

सत्त्व सोडुनी माती सजविति सदा अलंकारें,
स्वरूप सोडुनि रूपा भलत्या भाळति ते सारे.
अखंड चाले उद्दंड यापरि नाच पिशाचांचा,
घातपात तो कसा कळेना तिथें तयां त्यांचा.
उलटीं त्यांचीं खरीं पाउलें, उलटी ही चाल,
उलटें काळिज, उलटें सारें घेति करुनि हाल !
चुकुनि दयाळा, सुखार्थ त्यांतच जाउनि मी शिरलों,
हाय जळालों ! हाय पोळलों ! सुखास अंतरलों. "
क्षणार्ध पावे विराम ह्यापरि गिरिमुख बोलुनिया,
द्विगुणित बाणे शांति, श्वासहि येई श्रवणीं या. ६०

कळवळला तों सखा, लोटला अश्रूंचा पूर,
क्षणोक्षणीं वाटे कीं फोडिल किंकाळी घोर,
जी किंकाळी क्षणीं दुभंगुनि शांती निमिषांत,
पुण्यात्म्याचें चिंतन भंगुनि करील कीं घात.
क्षणोक्षणीं वाटे कीं आतां पळतचि जाईल;
'नष्ट सखा सांपडला' नगरीं डंका पिटवील.
वचनबद्ध तो स्थळगांभीर्यें परी स्थळा खिळला;
कंठ निरोधुनि अढळ बसे जरि धैर्यगिरी ढळला.
एकवार तें फिरोनि गिरिमुख लागे बोलाया,
" प्रभो, अनंता, दयासागरा, जगदात्म्या, राया ! ७०

तव सहवासीं शांति खरी, सुख खरें, खरी प्रीती,
म्हणुनि चरण मीं धरिले, आलों शरण विविधरीती.
तुजसंगें मी करीन हितगुज, तुजशीं गाऱ्हाणें,
लोळण चरणीं तुझ्या, तुझ्याविण जिणें दीनवाणें !
बळकट धरिली कास तुझी हरि, आतां करितील
षड्रिपु माझें काय ? यमाचे पाशहि तुटतील.
धना, मनाला आतां माझ्या करिशिल तूं काय ?
वळवळ खळबळ तुझी संपली, सरे हायहाय !
तरुवर देतिल फळेंमुळें रे, ओहळ जळ मजला;
दिशा पांघरुण, उशा-अंथरुण मला शिला मृदुला. ८०

कामा, गाजव शौर्य तुझें जा भूतांवरि जाण;
प्रीतिमदें झिंगले तयांवर सोड कुसुमबाण.
लोभा, आतां खुशाल गाजव अमल धरेवर जा,
क्रोधा, क्षोभव दुर्बलांस जा, तुज येथोन रजा.

फुलांवरुनिया फुलांवरि झुके फुलपांखरुं जेवी
प्रीति, तूंहि जा नाच सुखानें नगरांतुनि तेवी.
मोहा, मोहिव मोहिनिरूपें असुरां जाऊन,
शिवास शिव जा नाचव त्याला भिल्लिण होऊन.
मदा, तुझा उन्माद काय रे मायेवांचून ?
जा जा आणीं रावण कोणी, पाहीं शोधून. ९०

अरे मत्सरा, विजनगव्हरीं काय तुझें काम ?
क्षण न उभा राहीं रे, येथे वसतो श्रीराम.
काय अतां तुमच्याशीं नातें ? सरला संबंध !
बळिया माझा पाठीराखा केवळ आनंद !
मरणाला आणीन मरण मी, मरेल ब्रह्मांड !
उरेन माझा मीच निरसतां सारें थोतांड."

... ... ...

गिरिमुख विरमे, तरुगणाहि गमे ध्रुवपद हें गाई,
'मरणाला आणीन मरण मी !' गाति दिशा दाही. ९८

प्रतापगढ, ता ४ मार्च १९२० ]

## ७५ चल जळो ज्ञानविज्ञान गड्या !

[ जाति प्रणयप्रभा, राग मालकंस–बागेश्री ]

चल जळो ज्ञानविज्ञान गड्या !
लखलाभ होउ पंडितमन्या. ध्रु०

फाड पटाला, फोड घटाला,
अजुनि न ये त्यांचा कंटाळा;
जपलें प्राणाहुनि मी ज्यांला,
उधळ हिरे मोत्यें सखया ! १

देति शिव्या पंडित मद्याला,
गटगट पिउं पेल्यावरि पेला,
दिली तिलांजलि सुज्ञपणाला,
हसतिल हसोत ते उभयां ! २

कडकड मोडिल गगनमांडवा
फाडुनि उधळिल दिशांस अथवा,
अशा वादळा सोड भैरवा,
बंद तटातट तोड सख्या. ३

काय जागणें ? कसलें निजणें ?
टाक फाडुनी सारीं स्वप्नें ?
चिंध्या चिंध्या करुनि उधळणें !
काळशिरीं चल नाचाया ! ४

तूं राजा मी राणी कांता,
भीड लाज मग कशास आतां ?
होउनि केवळ निसंग नाथा,
रगीं रंग मिसळीं सदया. ५

प्रतापगढ, ता. ६ आगस्ट १९२० ]

# ७६ जीवसंयोग

[ जाति प्रणयप्रभा, राग कालिंगडा ]

जन खुळे म्हणति तर अपण खुळे !
त्यांचें अपुलें कधिं न जुळे ! ध्रु.

त्यांचा अपुला मार्ग निराळा,
दिक्कालांचा त्यांना आळा;
प्रणयी आठवि का दिक्काला ?
पाळ आपुली खिरे पळें. १

हपापले जन वस्त्राभरणा;
विटलों मधल्या देहावरणा;
वस्त्रें रत्नें काय आपणां ?
दों जीवांतिल पटचि गळे. २

जिवा-जिवांतिल भान सुखाचें
आड सुखा त्यांच्या येण्याचें,
तेंच हरपलें अपुलें साचें !
पार सुखास न त्याचमुळें. ३

कमलदलस्थितजलबिंदू गे,
दल हललें, जुळले ते दोघे;
माझ्या तुझिया या संयोगें
आकृतिचा गे बांध गळे. ४

प्रतापगढ, ता. २९ ऑगस्ट १९२० ]

खिरे=खिरते, कणकण सुटून नाहीशी होते.

## ७७ प्रणयप्रभा

[ जाति प्रणयप्रभा, राग असावरी ]

तव नयनिं उजळले बालरवी,
फुले हृदयिं मम उषश्छवी. ध्रु०

हृत्क्षितिजीं मम कनकमनोरम
राग उसळला उधळुनि कुंकुम;
तिळभर न उरे कोठेही तम;
न्हाले बाग सखे; विभवी. १

पिशाच जैसें, धुकें वितळलें;
चोर पळाले घूक दडाले;
सज्जन निज सत्कर्मि गुंतले,
पक्षिबंदिगण तुला स्तवी. २

गूढ गहन हृद्भाग झळकती,
प्रगटति रत्नें तळिं दडलीं तीं;
राज्य तुझें या मुलुखावरती,
घेइं सुखें जी वस्तु हवी ३

तुझें प्रिये, साम्राज्य याचपरि
हृदयाच्या माझ्या मुलुखावरि—
यावज्जीव टिको दृढ सुंदरि,
हेंच हरीला मी विनवीं. ४

प्रतापगढ, ता. १ सप्टेंबर १९२० ]

## ७८ कुणि कोडें माझें उकलिल का ?

[ जाति प्रणयप्रभा, राग कालिंगडा ]

कुणि कोडें माझें उकलिल का ?
कुणि शास्त्री रहस्य कळविल का ? ध्रु०

हृदयिं तुझ्या सखि, दीप पाजळे,
प्रभा मुखावरि माझ्या उजळे;
नव रत्नें तूं तुज भूषविलें,
मन्मन खुललें आंतिल कां ? १

गुलाब माझ्या हृदयी फुलला,
रंग तुझ्या गालांवर खुलला;
कांटा माझ्या पायीं रुतला,
शूल तुझ्या उरिं कोमल कां ? २

माझ्या शिरिं ढग निळा डवरला,
तुझ्या नयनिं पाउस खळखळला;
शरच्चंद्र या हृदयि उगवला,
प्रभा तुझ्या उरिं शीतल कां ? ३

मद्याचा मी प्यालों प्याला,
प्रिये, तयाचा मद तुज आला;
कुणीं जखडिलें दोन जिवांला
मंत्रबंधनीं केवळ ? कां ? ४

प्रतापगढ, ता. ५ सप्टेंबर १९२० ]

## ७९ जीवनसंगीत

[ जाति नववधू, राग भैरवी ]

संसार–सतारीवरि तारा
तूं मीहि; मदन वाजाविणारा. ध्रु०

कलानिधी तो फिरवी चंचल
मधुरारक्त करांगुलि कोमल
अर्पुनि सारेंही कौशलबल;
वर्षती स्वरसुधेच्या धारा. १

लीलालोलुप तो रतिरंगीं
धुंद मद्यपी, तरलतरंगीं
प्रथम रसा घुमवी सुरसंगीं,
नाचवी मूर्त तो शृंगारा. २

मधुर गुलाबी राग थरथरे,
अकाल ये जणुं उषा मदभरें,
वायू निज चांचल्या विसरे,
प्राणही विसरला निज कारा. ३

स्वर्ग सुरांसह वर थरथरला,
जड शशि ज्योत्स्नारूपीं द्रवला,
पुलकित धरणिस बहर उसळला,
चालतां थबकल्या नभिं तारा. ४

अपूर्व सुर–संमेलन रचिलें,
स्वरकल्लोळीं दृश्य बुडालें,
कोण पुसे जिवलगे प्रेमले,
लाकडीच यंत्रा, संसारा ? ५

प्रतापगढ, ता. ७ सप्टेंबर १९२० ]

## ८० मग विसर हवा तर हा क्षण गे !

[ जाति नववधू, राग कानडा ]

मग विसर हवा तर हा क्षण गे !
क्षण हाच जवळ ये तूं पण गे ! ध्रु०

अनंत जन्मांचें शुभ संचित
क्षणीं याच गे होवो कुसुमित,
स्वर्गपणा या क्षणास आणुत,
ये परिस मूक मम भाषण गे. १

सूर्य, चंद्र, सारे तारकगण,
यक्ष, देव, दानव, सारेजण,
क्षणा याच देवोत सैरपण,
थांबवोनि वळवळ वणवण गे. २

पूर्ण विश्वलयिं अति एकांतीं
तुझी ज्योति पसरो स्थिर, कांती
मिळो त्यांत मम, फिटुनी भ्रांती,
ये करुं दे आत्मसमर्पण गे ! ३

हो ध्रुव धरणी चरणाखालीं,
वितळुनि जावो नच पाताळीं
तुझि माझी जों ग्रंथि न झाली;
मग उधळो तीचा कण कण गे ! ४

प्रतापगढ, ता. ८ सप्टेंबर १९२० ]

## ८१ लोकमान्यांस

[ वृत्त भामिनी, राग जोगी ]

राजराजेश्वरा हो दयाळा,
तातडी कां असे हो निघालां? ध्रु०

अंधकारीं पहातां नभांत
किर्र बोले अजूनीहि रात,
देह कष्टामधीं रोड झाला,
रात्र सारी न निद्रा तुम्हांला,
कुक्कुटाचा नसे शब्द झाला,
पाहटेचा न तारा उदेला;
केवि ऊठाउठी हो निघालां?
काय झालें असें हो दयाळा?
हाक कोणीं दिली हो तुम्हांला?
तातडी कां असे हो निघालां? १

व्यापसंताप सोसूनि सारा,
वैरियांचाहि साहूनि मारा,
लाथ हाणोनिया हो सुखाला,
कष्टवीलें सदा की जिवाला,
घास नाहीं सुखाचाहि ठावा,
नाहिं ठावा शरीरा विसावा.
व्याप ज्यासाठिं हा थोर केला
नाहिं भानू अजूनी उदेला,
काय याहूनि ओढी तुम्हांला?
तातडी कां असे हो निघालां? २

शांत या जाहल्या पाउलांला
नाहिं संधी चुराया मिळाला;
नाहिं पत्रें फुलें पूजण्याला
वेळ आम्हां मिळाली दयाळा !
कोठ आतां बघूं त्या मुखाला ?
वंदुं कैसें अतां पाउलांला ?
नाहिं मार्गार्थ केली शिदोरी,
नाहिं हातांत तांब्या, न दोरी;
गूढ संदेश कोठूनि आला ?
तातडी कां असे हो निघालां ? ३

आमुच्या हो जरी काळिजाचे,
आमुच्या हो जरी आंतड्याचे
दोर बांधूं पहाती पदांला
नाथ, तत्रापि कां हो निघालां
शीघ्र सारा त्यजोनी पसारा
कांहिं केल्याविना हो विचारा ?
काळिजांतील साऱ्याहि गीती
आडव्या कीं तुम्हां साश्रु येती;
पाहुनीया तरीही न त्यांला
तातडी कां असे हो निघालां ? ४

कोणतें हो असें शिंग दूरी
घोर रात्रीं तुम्हां हांक मारी ?
कोणता हो तरी मंत्र नाथा,
भूल घाली महाराज, आतां ?

कोठली हो स्मृती होय जागी ?
केवि वारें भरे शीघ्र अंगीं ?
दुर्ग कोठील, कोठील वाडे,
बाग कोठील, कोठील झाडें
मोह घालोनि नेती तुम्हांला ?
तातडी कां असे हो निघालां ? ५

प्रतापगढ, ता १२ सप्टेंबर १९२० ]

## ८२ घट भरे प्रवाहीं बुडबुडुनी

[ जाति नववधू, राग देस ]

घट भरे प्रवाहीं बुडबुडुनी—
न दिसे तुज का न पडे श्रवणीं ? ध्रु०

पदर गळाला, उडे वायुवर,
कुरळे उडती केसाहि भुरभुर,
प्रमदे, बघ त्यां सावर, आवर—
कां उभी प्रवाही शून्य मनी ? १

स्वैर गार या झुळका वाहति,
मातीचा ये वास सभोवति,
क्षितिजीं बघ ढग वरवर चढती,
बघ घरा निघाल्या सोबतिणी. २

सळ डोळयांवर, काय पाहशी ?
कान देउनी काय ऐकशी ?
अचंचळ उभी व्याकुळ दिसशी–
का उचलिल घट येवोनि कुणी ? ३

पाउल नच तें, शेत सळसळे,
शब्द न मानवि, तारा बोले;
शीळ न, वायुच वंशीं खेळे;
कां विरघळशी भ्रमिं फिरफिरुनी ? ४

कवळुनि पद जल थरारुनि हले,
स्पर्शुनि शरिरा वारा बरळे,
वेलि हसति तुज फुलुनि बघ फुलें,
डोलती विनोदें तरु बघुनी ! ५

प्रतापगढ, ता. १४ सप्टेंबर १९२०. ]

## ८३ बघुनि तया मज होय कसेंसें !

[ जाति पादाकुलक, राग पिलू ]

बघुनि तया मज होय कसेंसें,
झुरशि मना, कां भरुनि तुज पिसें ? ध्रु०

हीन दीन मी ब्राह्मणविधवा,
तृणसम जन मज टाकि जणुं शवा;
वासना-भुतें भिववितिं जीवा,
शरीर जीवा हें थडगेंसें. १

सळ = विशेष विचारमग्न असताना होणारा भ्रूनेत्रसंकोच.

हृदयतळीं वळवळति कल्पना,
हाय मना, ही काय हेलना !
जीवनगीतिंत फसशि कां मना ?
जालिं पांखरूं हाय जणुं फसे ? २

आसन त्यास्तव घालायाला;
वस्त्र चुणुनिया ठेवायाला
हातांनो, फुरफूर कशाला ?
कळे तया का ? काय तो पुसे ? ३

बघुनि तया कां डोळे वळती ?
येतां तो कां पायहि पळती ?
कान लपुनि कां शब्द ऐकती ?
हा रे दैवा ! कां हें धुमसे ? ४

जीव तयाच्या प्रकाशीं रिझे,
आहुतिसा जळण्यासही सजे,
हा रे दैवा ! कां हें नुमजे ?
निष्फळ हें ! मग हाय कां असें ? ५

फूल सूर्यमुखि भूवरि, नभिं रवि,
चंडकिरणिं मुख अविरत फिरवी,
जातां तो मुख दुःखें झुकवी,
जळुनि राख हो किरणिं, हें तसें ! ६

प्रतापगढ, ता. २३ सप्टेंबर १९२० ]

# ८४ गौप्यगोपन

[ जाति प्रणयप्रभा, राग शंकरा ]

चंद्राच्या दीप्त पटांमधुनी
डोकावे छाया बघ वदनीं. ध्रु०

हरशिरिं डौलें जाउनि सजला,
स्मरें हरावरि बाण योजिला,
यासहि का ओझरता रुतला ?
घाव न ये अजुनी भरुनी. १

विचित्र करि पोशाख भरजरी,
धवल विहासें न्हाणि जगा जरि,
लाजुनि यापरि घाव लपवि परि
दिसे टरफला भेदूनी. २

गृहविहीन हा पांथ भ्रमणा
करी, तयाचा जादूटोणा
कधीं स्पर्शला तुजला तरुणा ?
काय खुपे तुज सांग मनीं. ३

कधीं कुणीं डोळ्यांतुनि तजला
बाण काळिजीं काय मारिला ?
घाव खोल जो त्याचा पडला
फुका लपविशी तूं हसुनी ! ४

खळखळ रस जरि वाणी प्रसवी,
तुझें हास्य जरि सकलां हसवी,
विलासलीला मला न फसवी,
झळके छाया किति नयनीं ! ५

प्रमदांच्या तूं कथा सांगशी,
व्याजोक्तीनें जनां दिपविशी,
न कळत तापुनि परी बरळशी,
जळजळ झळके प्रतिवचनीं. ६

प्रतापगड, ता. २३ सप्टेंबर १९२० ]

## ८५ भयचकित नमावें तुज रमणी !

[ जाति प्रणयप्रभा, राग भूप ]

भयचकित नमावें तुज रमणी,
जन कसे तुडविती तुज चरणीं ? ध्रु०

महाकवी, तत्त्वज्ञ, भूपती,
समरधुरंधर वीर धीरगति,
स्थितप्रज्ञ हरि उरीं कोंडिती,
प्रसव तयांचा तूं जननी. १

भूत निघाला तव उदरांतुन
वर्तमान घे अंकीं लोळण,
भविष्य पाही मुली, रात्रदिन
तव हाकेची वाट मनीं. २

तुझ्या कांतिनें चंद्र झळझळे,
फुला फूलपण मुली, तुजमुळें,
रत्नीं राग तुझा गे उजळे,
तुझ्यास्तवच हीं प्रिय भगिनी ! ३

प्रतापगड, ता. ३० सप्टेंबर १९२० ]

## ८६ प्रेमरत्नास

[ जाति प्रणयप्रभा, राग कालिंगडा ]

रे हिऱ्या माझिया झळक घरी !
रे झळक उरीं ! तूं झळक उरी ! ध्रु०

जरी घरोघर दिवे विझविले,
जरि घोरत जन सारे निजले,
शांत शुक्र चहुंकडे जाहलें,
किर्र बोलते रात्र जरी— १

स्वप्नभूमितिल जैशा हांका
कोल्हे देती एकामेकां,
प्रतिध्वनी भयसूचक जरि का
वाहत येई खोल तरी— २

आकाशाच्या जरी अंगणी
देवहि निजले दिवे विझवुनी,
गाढ ढगांच्या फटीमधूनी
चोरापरि शशि बघे जरी— ३

शांति असो कीं वीज कडकडो,
अचल असो नभ, कडाडुनि पडो,
शेष डगमगो, धरा तडतडो,
क्षिती तयांची कोण करी ? ४

प्रकाशभाषा तुझी मधुर ती
गोंधळ उडवो इतरां चित्ती,
कळेल मज ती सुंदर गीती,
प्रळयमेघ गर्जले तरी ५

[ प्रतापगढ, ता. ३० सप्टेंबर १९२० ]

## ८७ तें दूध तुझ्या त्या घटांतलें

[ जाति नववधू, राग बिलावल ]

तें दूध तुझ्या त्या घटांतलें
कां अधिक गोड लागे न कळे. ध्रु०

साईहुनि मउमउ बोटें तीं
झुरुमुरु झुरुमुरु धार काढिती,
रुणुझुणु कंकण करिती गीती,
का गान मनांतिल त्यांत मिळे ? १

अंधुक शामल वेळ, टेकडी,
झरा, शेत, तरु, मधें झोपडी,
त्यांची देवी धारहि काढी,
का स्वप्नभूमि बिंबुनि मिसळे ? २

या दृश्याचा मोह अनावर
पाय ओढुनी आणी सत्वर,
जादु येथची पसरे मजवर,
का दूध गोडही त्याचमुळें ? ३

प्रतापगढ, ता. ३ ऑक्टोबर १९२० ]

## ८८ नववधू प्रिया, मी

[ जाति नववधू, राग ललत ]

नववधू प्रिया, मी बावरतें;
लाजतें, पुढे सरतें, फिरतें. ध्रु०

कळे मला तूं प्राण-सखा जरि,
कळे तूंच आधार सुखा जरि,
तुजवांचुनि संसार फुका जरि,
मन जवळ यावया गांगरतें. १

मला येथला लागला लळा,
सासरिं निघतां दाटतो गळा,
बागबगीचा, येथला मळा,
सोडितां कसें मन चरचरतें ! २

जीव मनींच्या मनीं तळमळे
वाटे बंधन करुनि मोकळें
पळत निघावें तुजजवळ पळें—
परि काय करूं ? उरिं भरभरतें. ३

चित्र तुझें घेऊनि उरावरि
हारतुरे घालितें परोपरि,
छायेवरि संतोष खुळी करिं,
तूं बोलवितां परि थरथरतें. ४

अतां तूंच भयलाज हरी रे !
धीर देउनी ने नवरी रे :
भरोत भरतिल नेत्र जरी रे !
कळ पळभर मात्र ! खरें घर तें ! ५

प्रतापगढ, ता. १२ ऑक्टोबर १९२० ]

## ८९ पावलोपावलीं साउलि ही !

[ जाति नववधू, राग मालकंस ]

पावलोपावलीं साउलि ही !
पाठिशी सारखी लागलि ही. ध्रु०

कैद्यामागें सक्त पहारा,
त्यावरि करडा राखि दरारा,
या साउलिचा तसा शशिमिरा
लागला, वृत्ति मम कावलि ही. १

टाळूं पाहे तरी टळेना,
हात जोडिले तरी वळेना,
क्षणभर मज एकांत मिळेना,
कोठली पिशाची लागलि ही ! २

बसलों मी, ही पीडा बसली;
उठलों उठली, निजलों निजली;
रडलों रडली, हसलों हसली;
वांकोल्यांची माउलि ही ! ३

प्रतापगढ, ता. १५ आक्टोबर १९२० ]

## ९० क्षण सुवर्णकण झाले रमणा !

[ जाति नववधू , राग रामकली ]

क्षण सुवर्ण-कण झाले रमणा,
स्पर्शली तुझी न कळत करुणा. ध्रु०

स्पर्शक्षम हे सगुण जरी क्षण
कळे न त्यांचें मोल मला पण,
घरीं लोळती जसे रजःकण
तुज रे चिंता अशरण-शरणा. १

मिळे पारखी तुझ्या दयेनें
तो शोधुनि वेंचोनि तयां ने,
हार रचुनि अर्पिला तयानें
रे जनतारूप तुझ्या चरणां. २

दयाघना पारख्या माझिया,
रमण-मंदिरीं रुजू तव दया,
उपकृति गाऊं फुका कासया ?
जाणतो तोच तव थोरपणा. ३

प्रतापगढ, ता. १६ ऑक्टोबर १९२० ]

## ९१ घन तमीं शुक्र बघ राज्य करी !

[ जाति नववधू, राग केदार ]

घन तमीं शुक्र बघ राज्य करी,
रे खिन्न मना, बघ जरा तरी ! ध्रु०
ये बाहेरी अंडें फोडुनि
शुद्ध मोकळ्या वातावरणीं,
कां गुदमरशी आंतच कुढुनी ?
रे ! मार भरारी जरा वरी. १

प्रसवे अवस सुवर्णा अरुणा,
उषा प्रसवते अनंत किरणां,
पहा कशी ही वाहे करुणा
कां बागुल तूं रचितोस घरीं ? २

फूल हसे कांट्यांत बघ कसें,
काळ्या ढगिं बघ तेज रसरसे,
तीव्र हिमांतुनि वसंतहि हसे,
रे, उघड नयन, कळ पळे दुरी. ३

फूल गळे, फळ गोड जाहलें,
बीज नुरे, डौलांत तरु डुले;
तेल जळे, बघ ज्योत पाजळे;
का मरणिं अमरता ही न खरी ? ४

मना, वृथा कां भीशी मरणा ?
दार सुखाचें तें हरि-करुणा !
आई पाही वाट रे मना,
पसरोनि बाहु कवळण्या उरीं. ५

इंदूर, ता. २९ ऑक्टोबर १९२० ]

## ९२ सोन्याची घेउनि करिं झारी

[ जाति नववधू, राग सोहनी ]

सोन्याची घेउनि करिं झारी
ये आज पहाट, उभी दारीं. ध्रु०

करतल पदतल कोमल रक्तिम
गुलाब फुलले जसे मनोरम,
सुवर्णकांती फांके अनुपम,
ही आज मला हांका मारी. १

" रमणाच्या सोन्याच्या मंदिरिं
सोन्याच्या रे झोपाळयावरि
निजलें; झुलवी निद्रासुंदरि
मज गाउनि गाणें जरतारी. २

रमण म्हणे, जा ऊठ, पहाटे!
बाळा रुतति विदेशीं काटे,
स्मरतां त्यास कसेंसें वाटे,
ने अमृत भरे जें भांडारी. ३

घोर तमाच्या दाट घटांतुनि
क्रमित वाट तारकजालांतुनि
चालत आलें बघ ठेचाळुनि,
रे, उभी तुझ्या मी शेजारीं. ४

धुंदि तुझ्या परि अजुनी नयनीं,
जांभया कशा देशी पडुनी ?
उघड नयन, जा अमृत घेउनी,
कां निजशि मुला, तूं अंधारीं ? " ५

इंदूर, ता. ३ नोव्हेंबर १९२० ]

## ९३ आह्वानशृंग

[ जाति नववधू, राग जोगी ]

आह्वानशृंग तव तीव्र कसें !
रे मरण, सुटे पळ, भरे पिसें. ध्रु०

विसरे जन कीं हवी शिदोरी,
विसरे तांब्या, विसरे दोरी,
विसरे वस्त्रें जुनिं कीं कोरीं,
मग तुमान-धोतर कोण पुसे ? १

विसरे कीं मज मार्ग न ठावा,
उजेड कीं अंधार मिळावा,
स्नेह मिळे कीं मिळेल दावा,
मग धीर नसे वा भीति नसे. २

ह्या जगतांतिल साऱ्या गीती
जरि काकुळती धावत येती,
स्वर-जाळीं चरणां आवळिती,
मग कुठलें रडणें, काय हसें ? ३

आशेनें कीं नैराश्यानें,
माधुर्यानें कीं लवणानें,
भरे कुंभ जो क्षणाक्षणानें
निमिषांत तुझ्या पदिं वाहतसे. ४

इंदूर, ता. ४ नोवेंबर १९२० ]

## ९४ मंदिरीं मना, तव गान भरे

[ जाति नववधू, राग मांड ]

मंदिरीं मना, तव गान भरे,
कुणिकडे बघशि आश्चर्यभरें ? ध्रु०

सप्त सुरांचें त्यास न बंधन,
अडखळे न तें जड शब्दांतुन,
माधुर्यच माधुर्य भरे, मन,
माधुर्याविण कांहिं न दुसरें. १

तेंच फुलांच्या मार्दविं फुललें,
सुवर्णवर्णी उषेंत खुललें,
सायंतनिं तरु-गिरि-घनिं झुललें,
रे, उघड नयन, बघ नीट पुरें ! २

परि फुलास तूं पुसशी भलतें—
औषध, आसव का देशिल तें ?
चिरतां चुरतां तुज का मिळतें ?
छे ! चल मग निघ, तव डौल पुरे ! ३

हाय ! मना, तव कपाळ फुटलें,
तुझ्याच घरचें तुलाच न कळे,
जन्ममरणिं बघ खेटर न मिळे,
जा, फोड ऊर, तळमळ मर रे ! ४

इंदूर, ता. ५ नोवेंबर १९२० ]

## ९५ या प्रकाशशिखरीं

[ जाति नववधू, राग सारंग ]

या प्रकाशशिखरीं कुणिकडुनी
मज चढविशि वाटाड्या, धरुनी ? ध्रु०

खोल दऱ्यांच्या घोर तमांतुनि,
काजळि काळयाकुट्ट जळांतुनि,
वळणांतुनि, घन वनस्थळांतुनि
चढविलेंस कुठुनी वरि जपुनी ! १

मागें वळतां वाट नच दिसे,
पुढें पाहतां वाट न गवसे,
पुन्हा पुन्हा मी म्हणुनि तुज पुसें,
रे, नेशिल कोठे मज अजुनी ? २

चढण अशिच का पुढेंहि राया ?
लागतील का सुंदर राया ?
विश्रांतिस मिळतील सराया ?
थकलों रे सखया, उत्क्रमणीं ! ३

तुझीं पाउलें येती कानीं,
धीर जरा ये जरी तयांनीं,
किति हिंडावें तरि रानींवनिं ?
तें दूर किती रे घर अजुनी ? ४

पार नसे रे तुझ्या कधिं ऋणा,
या शरिराच्या करुनि वाहणा
वाटाड्या, घालिन जरि चरणां
तरि उतराई होणें न जनीं. ५

इंदूर, ता. ११ नोवेंबर १९२० ]

## ९६ रे अजात अज्ञात सखे जन !

[ जाति नववधू, राग काफी ]

पंजरीं पांखरूं फडफडतें,
आदळी पंख, शिर आपटतें. ध्रु०

वर्तमान, तुझि अजस्र कारा,
कुठुनि निघाया न दिसे थारा,
बाहेरिल नच फिरके वारा,
आंतल्या आंत मन हें कुढतें. १

भविष्याचिया दूर कडांवरि,
सखे घुमविती मंजुळ बांसरि,
अंधुक मंदचि येति लकेरी,
भडभडे ऊर, मन तडफडतें. २

रे अजात अज्ञात सखे जन !
जेव्हां तुमची होय आठवण
विसरे मन भिंतींचें वेष्टण
शिर भिंतीवर निघतां फुटतें. ३

हृदयाच्या माझ्या आकाशीं
आंतिल सूर्याचिया प्रकाशीं
तुमच्या छाया पडतां त्यांशीं
कुजबुजे, रमे मन, बडबडतें. ४

या कुजबुजिच्या अंधुक ताना
शतकांतुनि का रिघतिल काना ?
डोलवाल का सांगा माना,
का स्मराल मन जें धडपडतें ? ५

इंदूर, ता. १६ नोवेंबर १९२० ]

## ९७ गोंधळाचें घर

[ जाति नववधू, राग बागेश्री ]

त्या दारावरुनी कोण निघे ?
वाराही चोरापरी रिघे. ध्रु०

निद्रारस संध्या न शिंपडे,
चंद्र शांतिचा सडा न तिकडे
करुनी निसटे चोरसा गडे,
नभ उघडुनि डोळे कधिं न बघे. १

सुवास-सुरिं गे फुलें न गाती,
परस्परीं नच कधिं कुजबुजती,
सुखदुःखाच्या गोष्टि न करिती,
यम घुमटीं काळी घोंगडि घे. २

तिथे न मानव, भुतेंच जमती,
न कळे खिदळति किंवा झुंजति,
नाण्याच्या नादावर नाचति,
गे विचित्र चाळे ते अवघे ! ३

आपण फिरकूं तिथे न सुंदरि,
बसोनि राहूं गे घरचे घरिं,
घरींच घुमवूं गोड बांसरी,
कधिं नांवही न त्या घरचें घे. ४

इंदूर, ता. २४ नोव्हेंबर १९२० ]

## ९८ या वेळीं माझ्या ये रमणा !

[ जाति नववधू, राग पूर्वी ]

या वेळीं माझ्या ये रमणा,
शांतीची द्वाहि फिरे सजणा. ध्रु०

गहन रात्र घनघोर पसरली,
जादुगार झोपेनें अंगुलि
चहूंकडे हळुहळू फिरविली,
ती मिटवी कमळापरि नयनां. १

अधांतरीं बघ घरटीं झुलतां
गुपचुप झाली बघतां बघतां,
तरुंची कुजबुज थांबली अतां,
वेळूंची थिजलि सख्या, वीणा. २

नभें दाट पांघरली दुलई,
मात्र मिणमिणे घरांत समई,
कीं तुज वाट दिसो या समयीं,
कामातुर जागें तुझ्याविना. ३

कानोसा मी घेतां थकलें,
तुझीं न ऐकूं येति पाउलें,
कां मग मजला वेड लाविलें ?
किति विलंब करिशिल आगमना ? ४

फटफटतां होईल कशी गति ?
दारीं ठोठावतील रे किति ?
सळोपळो मज करितिल रे अति,
तुज ठावा त्यांचा क्रूरपणा. ५

इंदूर, ता. २४ नोवेंबर १९२० ]

## ९९ गे शपथ तुझी !

[ जाति नववधू, राग मारवा ]

गे शपथ तुझी, मी वदें खरें,
मी स्पर्शें तुझिया मज विसरें. ध्रु०

सुखदुःखाची मादक वारुणि
गोड जहाली तुझ्या कारणीं,
उन्मादीं कळ कळे न रमणी,
कडुपणांत गोडी प्रिये, भरे. १

गृहकर्मी कीं राजकारणीं,
सुखशयनीं, बाजारीं, भ्रमणीं,
हरिभजनीं की भयानक रणीं,
गे गुप्त तुझी मूर्ती विचरे. २

गार गारगोटींत ज्यापरी
गुप्त अग्नि वावरे सुंदरी,
दुनियेच्या हाटांत खरोखरि
गे गुप्त उजेड तुझाच पडे. ३

सागरावरी ओहटि-भरती,
शांत लहरिवर किरण नाचती,
तुफान हा, तारवेंहि फुटती,
या विविधरूपिं जळ एक भरे. ४

त्यापरि माझ्या विविध तरंगीं
विविध रंगिं तूं रक्तिमरंगी;
विविध रूपिं तूं अविविधसंगी,
माझेपण तुझिया उरीं मुरे. ५

इंदूर, ता. २६ नोवेंबर १९२० ]

## १०० नटेश्वराची आरती

आरती त्रिभुवनजनकाची,
अर्धनरनारि-नटेशाची ! ध्रु०

झळके पुरुष अर्धभागीं,
लखलखे नारी अर्धांगीं,
सीमा ऐक्याची संगीं !
कोटि रतिमदन
मनोरम वदन
लाजतिल बघुन,
खपेना आड शरीराची !
जय जय सांत अनंतांची ! १

अपर्णा तुजविण नीरस ती,
पार्वती शिलाच ती नुसती !
ज्योतिविण केवळ ती दिवटी.
तूंहि तिजवीण
देह गुणहीन,
शून्य रसभिन्न !
काय गति तुझिया प्रेमाची !
जय जय सांत-अनंतांची ! २

अंबिका लाभतांचि संगा
प्रसवे खळखळ भवगंगा,
अनंगहि येई मग रंगा !
सूर्य झळझळति,
चंद्र लखलखति,
उडू लुकलुकति,
रम्यता गति ही प्रेमाची !
जय जय सांत-अनंतांची ! ३

मंदिर नक्षत्रीं जडलें,
रविशशि झुंबर लोंबविले,
सीमा सौंदर्या न मिळे,
तूंच शशिसूर्य,
तूंच सौंदर्य,
मंदिरहि दिव्य,
—रूपें लीला ही ज्याची,
जय जय सांत-अनंतांची ! ४

नीलमणिरचित तबकिं गगनीं
निरांजन रविशशि पाजळुनी
आरती करी सृष्टि-रमणी;
झांझ झंझणण,
वायु दणद्णण,
नगारा गगन,
भास्कर भक्ति तुझी याची,
जय जय सांत-अनंतांची ! ५

इंदूर, ता. २९ नोव्हेंबर १९२० ]

## १०१ घातली एकदा अतां उडी !

[ जाति नववधू, राग ललत ]

घातली एकदा अतां उडी,
रे, बुडव लाव वा पैलथडी ! ध्रु०

साहस म्हण कीं पोरपणा म्हण,
भाबडेपणा, स्वैरपणा म्हण,
नादिपणा, अविचारिपणा म्हण,
पण गेली ती परते न घडी. १

मोह अचानक पडे मजवरी,
खर्कन पदरचि गळे पळांतरिं,
नग्नचि झालें न कळत सत्वरि,
तूं घाल शाल, टाकीं उघडी. २

आतां कैचें मागें वळणें ?
तुजसह लाटांवरि रे झुलणें,
तुझ्यासमोरचि जगणें मरणें,
तूं नाविक आतां तूंच गडी. ३

सर्वस्वी रे अपराधी मी,
लबाड म्हण कीं म्हण साधी मी,
विचार केला नच आधीं मीं,
तूं क्षमा करीं अथवा ताडीं. ४

आतां कांहिं न रे माझ्या करिं,
सर्वस्वी रे भार तुजवरी,
मार तार ! छळ करीं ! प्रीति करिं !
घेतली तुझ्या मीं उरीं बुडी. ५

इंदूर, ता० १ डिसेंबर १९२० ]

## १०२ रुद्रास आवाहन

[ जाति वीरभद्र, राग शकरा ]

डुम्डुमत डमरु ये, खण्खणत शूल ये,
शंख फुंकीत ये, येइ रुद्रा !
प्रलयघनभैरवा, करित कर्कश रवा
क्रूर विक्राळ घे क्रुद्ध मुद्रा ! ध्रु०

कडकडा फोड नभ, उडव उडुमक्षिका,
खडबडवि दिग्गजां, तुडव रविमालिका,
मांड वादळ, उधळ गिरि जशी मृत्तिका
खवळवी चहुंकडे या समुद्रां ! १

पाड सिंहासनें दुष्ट हीं पालथीं,
ओढ हत्तीवरुनि मत्त नृप खालती,
मुकुट रंकास दे करटि भूपाप्रती,
झाड खट्खट तुझें खड्ग क्षुद्रां ! २

जळ तडागीं सडे, बुडबुडे, तडतडे
'शांति ही !' बापुडे बडबडति जन-किडे !
धडधडा फोड तट ! रुद्र, ये चहुंकडे,
धगधगित अग्निमधिं उजळ भद्रा ! ३

पूर्वि नरसिंह तूं प्रगटुनी फाडिले
दुष्ट जयिं अन्य गृहिं दरवडे पाडिले,
बनुनि नृप, तापुनी चंड, जन नाडिले
दे जयांचें तयां वीरभद्रा ! ४

इंदूर, ता. ३ डिसेंबर १९२० ]

## १०३ उद्यांची गति

[ जाति जीवनध्वनि ]

उद्यांची काय कळे रे गती ?
पळपळ पळतो काळ पिळित जन, करी प्रीति संप्रती. ध्रु०
कुठे ते थोर वीर भूपती ?
राख करुनि मिळविली, निघाली त्यांसह का भूमि ती ?
तुझी मग दमडी, दिडकी, टका
गळे पिळुनि मिळविशी तुझ्या तो संगें येइल का ?
नाच तूं, काळ गालिं हासतो
पाहुनी पिंगा हळु खासतो;
निमिष हो भीतीचा भासतो,
तरी बंधुशिरिं लाथ हाणुनी फुगुनी होशी कृती ! १

जगत हा प्रीतीचा फुलवरा,
अनंत रंगीं फुलें ठुमकती, बाग कशी बघ जरा.
तुडुंबे मधु त्यांच्या द्रोणीं,
वेडी होइल बघुनि शारदा, वर्णावी कोणीं ?
पहा ही खरी कशी वैखरी !
हृदयाच्या भाषेंत फुला पुस, उत्तर देतिल तरी.
कुणावरि शस्त्र उचलशी तरी ?
पुढें फुलें रे तुझ्या जिवाचीं, आत्मघात नच करी.
चहुंकडे तुझीच नाडी उडे,
चहुंकडे तुझेंच हसणें–रडें,
नीट बघ, दूर पळे सांकडें.
स्वयें मृत्यु निज शस्त्र चरणिं तव अर्पिल करुनी नती. २

कशाची तळमळ हळहळ तरी ?
स्वयें निर्मुनी गरळ भोवती, धडकी घेशी उरीं.
कळे रे काय कधीं पामरा,
प्रीतिदूत किति तुझ्या रक्षणीं करिति खडा पाहरा ?
तयांच्या दयार्द्र दृष्टीविना
पळभर तरि जगशील काय रे ? उघड जरा लोचनां.
सूर्य जरि निमिष झाकि लोचन,
निजे जर वायू एक क्षण,
जळ न दे पळभर जरि दर्शन,
कुणीकडे तूं ? कुठे धरा रे ? कोण पुसे दुर्गती ? ३

खळखळे प्रीतीची वाहिनी,
चहूंकडे मधु मंजुळ निघतो कसा जीवनध्वनी !
रडशि कां तूंच गान भंगुनी ?
घे धुउनी गंगेंत वाहत्या हात तूंहि रंगुनी.
पळाचा काय भरवसा तरी ?
या गंगेचें मूळ शोध जा, ऊठ तातडी करी.
अहाहा ! वानूं कवण्या मुखें ?
होइल सरस्वतीमुख मुकें !
त्यावरी ओवाळीं भवसुखें !
रंग रतिरसी, मृत्युंजय हो ! काळ काळ तो किती ? ४

इंदूर, ता. २१ फेब्रुवारी १९२१ ]

## १०४ पोशाख नवनवा मला दिला !

[ जाति नववधू, राग तोडी ]

पोशाख नवनवा मला दिला,
नवनवा मुलुख मज दाखविला. ध्रु०

तयार करुनी मम सामुग्री
मधुर दयारस भरुनि समग्रीं
धाडुनि आई ! आधीं अग्रीं
धाडिलें लाडक्या मला मुला. १

एकाहुनिया एक भरजरी
वस्त्रें, अस्त्रें देशि परोपरि,
लाड पुरविशी किती खरोखरि,
किति माझें कौतुक तरि तुजला ! २

कार्यविशेषें जेथे जाईं
तुझ्या दयेचा तेथे आई,
सदा पहारा ठायीं ठायीं
सांभाळि सभोंवति गे मजला. ३

या मुलखाची पाहुनि शोभा
लालचुनी मन लागे लोभा;
देशी तूं, मी मिरवीं टेंभा;
निज पराक्रमाचि समजें सगळा. ४

अंत नसे गे त्वत्प्रेमातें
अशा तुला मी विसरें माते,
उदरीं घालुनि अपराधातें
गे माते, राग न तूं धरिला. ५

जुनीं जाहलीं वस्त्रें पाहुनि
बोलाविशि मज पान्हा फुटुनी,
उरीं लावुनी, नवीं लेववुनि,
धाडिशी श्रेष्ठतर कार्यिं मला. ६

इंदूर, फेब्रुवारी १९२१ ]

## १०५ महा-प्रस्थान

[ जाति उद्धव ]

दैत्यशी छातिवर ठेली तुजपुढें रात्र अंधारी;
चल जिवा, चालणें आलें; कां उगा बघशि माघारी?
मुरडोनि कुणाला बघशी ? ये कोण तुझ्या सांगाती ?
चल, उचल बोचकें अपुलें जोडिलें तूंच जें हातीं.
कडु, गोड, तिखट, खारट जी जोडिली शिदोरी अंगें
घे उचल, तीच कामीं ये. दे कोण आपुली संगें ?
ये हांक किती निकडीची ! लागला तगादा पाठी,
राहुं दे शाल, पागोटीं, राहुं दे वाहणा, काठी.
या घरीं दिवे लखलखती, तुजपुढें परी अंधार;
परि सराय ही, न मिराशी; हें काय खरें घरदार ? १०

येथले हार डोळ्यांचे, बाहूंचे सुंदर शेले
गुंतविती तुजला मोहीं, जरि जिवा आडवे ठेले
तरि काय तुला थांबविती ? कधि कुणा रोकिलें यांहीं ?

मग कासाविस कां होशी ?   चल मार्ग आपुला पाही.
येथल्या सतारी, वीणा   येथल्या लकेरी ताना
स्वरपंजरिं कोंडूं बघती,   परि तयां तुला धरवेना.
चल पुढें मुकाट्यानें तूं,   आठवी कुलस्वामीला,
डोळ्यांस अमंगल पाणी   आणीं न अशा शुभ वेळां.
ऐक ती क्रूर आरोळी !   दरडावुनि येती हांका—
वाढवेळ आधिंच झाला,   मग उशीर आणिक हा कां ?   २०

जरि वाट तुला नच ठावी   तीं ऐक पाउलें प्राणा,
रे धीर धरीं तूं पोटीं,   संगिं ये जगाचा राणा.

अजमेर, ता. ४ ऑगस्ट १९२१ ]

## १०६ घाबरूं नको, बावरूं नको !

[ जाति नववधू, राग दर्बारी कानडा ]

घाबरूं नको, बावरूं नको !
क्षण भीतीनें गांगरूं नको !   ध्रु०

जरि शत्रूंचा अजस्र मारा
उलथुनि पाडी जणुं डोलारा
अभेद्य भक्कम किल्ला सारा,
तरि वीरा ‘ हूं चूं ’ करूं नको.   १

जरी दिशांचे तट ढासळती,
नभ-सौधाचे स्तंभ कडाडति,
हंड्या झुंबर तडतड पडती,
तरि हे वीरा, डगमगूं नको !   २

जरी धुळीनें डोळे मिटती,
धूम्र-मेघ कंठीं घुरघुरती,
सैरावैरा सैनिक पळती,
तरि रणांगणांतुनि फिरूं नको. ३

निर्वाणींचें काढ सुदर्शन,
तळघरांत जें ठेलें लपवुन,
मार नेम रे अचूक रोखुन,
तूं जयश्रीस अंतरूं नको ४

अजमेर, ता. ६ ऑगस्ट १९२१ ]

## १०७ आलों, थांबव शिंग !

[ जाति अजनी, राग हिंदोल ]

आलों, थांबव शिंग दूता, आलों ! थांबव शिंग !
किति निकडीनें फुंकिशि वरिवरि ! कळला मला प्रसंग ध्रु०

जरि सखे जन हाटा निघती,
आर्जवुनी मजला बोलविती,
परोपरी येती काकुळती,
पहा सोडिला संग. दूता० १

जरि नाटकगृह हें गजबजलें,
जरि नानाविध जन हे सजले,
मजविण त्यांचें कितीहि अडलें,
पहा सोडिला रंग. दूता० २

जरी खवळलें तुफान सागरिं,
मार्ग भरे हा जरि घन तिमिरीं,
पहा टाकिली होडी मीं तरि
नमुनि तुला साष्टांग. दूता० ३

अतां पुकारो फेरीवाला,
गवळी नेवो गाइ वनाला,
कारकून जावो हपिसाला,
झालों मी निस्संग. दूता० ४

विसर्जिलीं मीं स्वप्नें सारीं,
आशा लावियल्या माघारी,
दुनियेच्या आतां बाजारीं
माझा न घडे संग दूता० ५

अजमेर, ता. १४ ऑगस्ट १९२१ ]

## १०८ जन पळभर म्हणतिल, 'हाय हाय!'

[ जाति नववधू, राग तोडी ]

जन पळभर म्हणतिल, 'हाय हाय!'
मी जातां राहिल कार्य काय? ध्रु०

सूर्य तळपतिल, चंद्र झळकतिल,
तारे अपुला क्रम आचरतिल,
असेच वारे पुढे वाहतिल,
होईल कांहिं का अंतराय? १

मेघ वर्षतिल, शेतें पिकातिल,
गर्वानें या नद्या वाहतिल,
कुणा काळजी कीं न उमटतिल
पुन्हा तटावर हेच पाय ? २

सखेसोयरे डोळे पुसतिल,
पुन्हा आपल्या कामिं लागतिल,
उठतिल, बसतिल, हसुनि खिदळतिल,
मी जातां त्यांचें काय जाय ? ३

रामकृष्णही आले, गेले !
त्याविण जग का ओसचि पडलें ?
कुणीं सदोदित सूतक धरिलें ?
मग काय अटकलें मजशिवाय ? ४

अशा जगास्तव काय कुढावें ?
मोहिं कुणाच्या कां गुंतावें ?
हरिदूता कां विन्मुख व्हावें ?
कां जिरवुं नये शांतींत काय ? ५

अजमेर, ता० १८ ऑगस्ट १९२१ ]

स्वातंत्र्याचा एकचि ठावा
केवळ यज्ञाचि मजला ठावा;
यज्ञ मार्ग ! हो यज्ञ विसावा !
का यज्ञाविण कांहीं मिळतें ? ३

सीता सति यज्ञीं दे निज बळि,
उजळुनि ये सोन्याची पुतळी,
बळी देउनी बळी हो बळी,
यज्ञेंच पुढे पाउल बढतें. ४

यज्ञिं अहर्निश रवि धगधगतो,
स्वसत्त्वदानें पाश छेदितो,
ज्योतिर्गण नव जन्मुनि जगतो,
रे स्वभाव हा ! उलटें भलतें. ५

प्रकृति-गती ही मनि उमजुनिया
उठा वीर, कार्पण्य त्यजुनिया;
'जय हर !' गर्जा मातेस्तव या !
बडबडुनी कांहीं का मिळतें ? ६

अजमेर, ता. २० ऑगस्ट १९२१ ]

ठावा=आधार

# १११ उदार चंद्रा !

[ जाति सृष्टिलता, राग यमनकल्याण ]

उदार चंद्रा, तुला नमुनि मी मार्ग धरीं आपुला. ध्रु०

शतदा आतां घालीं फेरी,
त्रिलोकगामी दृष्टि रुपेरी
दिशादिशांतुनि टाकुनि हेरी,
तुज न दिसें प्रेमला ! १

सागरतळिं रे कर खुपसोनी
हृद्गत ओढीं वर चेववुनी;
वार्ता न मिळे माझी फिरुनी,
पूस जागवुनि जला. २

नदीतटीं की सागरतीरीं,
दिङ्मृगजलिं वा व्योमसरोवरिं,
कालपुलिनिं वा अफाट हेरीं,
बघशि न या पाउलां. ३

तरुणतरुणि तूं सहस्र बघशिल,
ज्वाला त्यांच्या उरिं भडकविशिल,
वेलिवायुसा त्यां हालविशिल,
नच स्पर्शशिल मला. ४

कमलवनी वायूस निमंत्रुनि
मज्लस भरवुनि मद्य पाजुनी
कळया हसव गुद्गुल्या करोनी,
हासविशिल नच मला. ५

अजमेर, ता. २३ ऑगस्ट १९२१ ]

## ११२ गाडी बदलली !

[ जाति पतितपावन ]

प्रवाहपतिता काष्ठांसम हो, कर्मधर्मयोगें
रेलेमधिं भेटले मुशाफर कुणी मनाजोगे.

झाले कुशल प्रश्न, परस्पर ओळख झाली ती,
एक दुजाची वर्दळ सोसुनि सोयहि ते बघती.

पीकपाणि कीं असहकारिता या गप्पा निघुनी.
मार्गाचे श्रम हलके करिती रंगुनि रंगवुनी.

डबे निघाले, काला झाला, फराळ मग झाले,
चंचि निघाली, विडे लागले, प्रेमानें खाल्ले.

घटिका भरली, संगमभूमी गाड्यांची आली,
एका जाणें गाडिंत दुसऱ्या, गर्दि एक झाली.

उठे भराभर, वळकुटि उचली, उतरे तातडिनें;
हात हालवित सोबत्यां; पळे पुढे गडबडीनें;
रेल गांठली, वळकुटि ढकली, गर्दित तो घुसला,
जागा पटकवि, जीव हायसा होय, सुखें बसला.
घटिका भरली, शीटी झाली ढग फूत्कारीत
धापा टाकित धाडधाड ती रेल सुटे त्वरित.

अन्य दिशेनें क्षणार्धांत ती दृष्टिआड झाली,
बघतां बघतां मुशाफिरा त्या घेउनिया गेली,

गाडि बदलली यांत कशाचें भय, संकट, खेद ?
कां मग मरणा भ्यावें न कळे रटोनिया वेद.

अजमेर, ता २३ ऑगस्ट १९२१ ]

# ११३ किति महामूर्ख तूं शहाजहां !

[ जाति नववधू ]

किति महामूर्ख तूं शहाजहां !
गुपित पळपुटें पंजरिं धरण्या व्यूह काय रचिलास अहा ! ध्रु०

हृदयाचें रे कपाट उघडुनि
अमूर्त कांहींतरि तें काढुनि
पाण्यापरि पैसा रे ओतुनि
तूं मूर्त करिशि तो ताजचि हा. १

स्वप्न तुझें तें निरर्थ छाया !
साक्षिदार निर्मिलास राया,
भलत्याच करी तुझ्या चहाड्या
या अर्थज्ञांना सदैव हा. २

चोहिंकडे रेला किंकाळुनि
देशाचें रे ओझें वाहुनि
जिवंत राखिति गोऱ्या कंपनि,
उपयोगि त्यांस का महाल हा ? ३

इथे न चेते भटारखाना
गोमांसाचा द्याया खाना
चोरांच्या भरण्या पोटांना;
हाणि का हाडुकें गरिबां हा ? ४

मायदेविचें शव फाडोनी
इथ नसा का गणितो कोणी ?
ज्ञानकणीं का भरितो गोणी ?
रे दिवे दिवे अकलेस अहा ! ५

दरवळोत निरपेक्ष फुलें तीं,
निरभिलाष वाहोत झरे किति,
फुकट चंद्र उधळो निज कांती,
परि अर्थशास्त्रिं रे नियम न हा. ६

पायतळीं ताजाच्या बसुनी
टकमक पाहो काळ गुंगुनी,
आदमच्या या खटल्याकारणिं
दुनिया बघ बाजारच हा. ७

अजमेर, ता. २५ ऑगस्ट १९२१ ]

आदमचे खटले = प्रापंचिक मानव.

## ११४ जीवितसाफल्य

[ जाति वनहरिणी, रागिणी भरवी ]

सुफलित झालें गे सखि जीवित ! ध्रु०
युगानुयुग ज्या त्रिभुवनिं शोधीं निधान तें तव नयनिं मिळालें. १
जन्मजन्मिंचें क्षुधाव्यथितमन लाभुनि तुज आकंठचि धालें. २
कंटकमय या अनंत समयीं श्रमुनि दमुनि मन सुखीं निमालें. ३
नयनद्वारीं शिरुनि गगनिं मन रविशशिउडुंतुनि अमृतचि प्यालें. ४
काय भय जरी मरण ये अतां विषवृक्षा फल अमृतचि आलें ! ५

अजमेर, ता. २५ ऑगस्ट १९२१ ]

## ११५ आज तो कुठे जिवाचा चोर ?

[ जाति पतितपावन, राग मियामल्हार ]

आज तो कुठे जिवाचा चोर ! ध्रु०
वादळ गर्जे, विजा चमकती, आलि घनघटा घोर. १
रिम् झिम् रिम् झिम् पाऊस पडे, स्मरास आला जोर. २
उंच गोखड्यामधुनि दिसे या सारें काळेंभोर. ३
लपलिं पांखरें, रानिं एकला उंच पुकारी मोर. ४
तटस्थ पानें, तटस्थ रानें, ये राजा जणुं थोर. ५
नाक फुगवुनी कान उभारुनि उभें चित्रसें ढोर ? ६
टवकारुनिया पातीं—कणसें कुणास बघति समोर ? ७
लीन लयीं का तया प्रतीक्षिति, बांधिन कधिं शिरजोर ? ८

अजमेर, ता. २८ ऑगस्ट १९२१ ]

## ११६ स्वारी कशी येईल ?

[ जाति समुदितमदना ]

कुणास ठाउक कवणे रूपीं येइल माझ्या घरीं ?
कशी तयारी करूं ? कशी मी अंगणिं घालूं दरी ? ध्रु०

का वाऱ्यावरि परिमळापरी अवतरेल तो तरी ?
का ढगावरी गर्जनेपरी येइल भूमीवरी !
काय विजेवरि लखलख येइल जशि सोन्याची सरी ?
नदीपुरावरि येइल का तो तरल तरंगापरी ?

घन राइमधिल का गोड लकेरीपरी ?
का स्मितसा निजल्या बाल-कपोलावरी ?
का मधुसा फुलल्या कमलदलाभीतरीं ?
यापरि करितां विचार साजणि, होतें मी बावरी. १

माळ गळां ताऱ्यांची, रविशशि तळपाति मुकुटावरी,
कर्णि कुंडलें; प्रभा न मावे साऱ्या भुवनांतरीं;
शंख, चक्र आणि गदा, पद्म हीं झळकाति चारी करीं,
कोटिमदन ओवाळा ऐशी छबी शरीरावरी,
शंख-शिंग खिणखिणति, दणाणे चोप नौबतीवरी,
आणि पुढे ललकार ' इत इतो ' चोपदारही करी;
श्यामकर्ण लखलख रथास खिंकाळती,
दो बाजु चामरें ध्वजा तशा फडकती,
गडगडाट चाले रथहि, दिशा कांपती,
काय दणाणत येइल ऐशी स्वारी दारावरी ? २

तारे सारे डोळे मिटती, सूर्यचंद्र धावती,
हाहाकारहि करिति दशदिशा, दिग्गज भांबावती,
चळचळ कांपति वारे, सागर जागजागिं गोठती,
जिकडे तिकडे शाइ फासली ब्रह्मांडाभोवती,
का सकळ काळिमा घनीभूत जाहली,
अति भयाण अस्फुट, उंच रोड साउली
करिं पाश–दंड, ही महिषावर बैसली !
शांत शुक्र का यापरि येइल नेण्या तो नोवरी ? ३

अजमेर, ता. ३० ऑगस्ट १९२१ ]

दरी = सतरंजी. चोप = काठी.

## ११७ वैरिण झाली नदी !

[ जाति समुदितमदना, राग पिलू ]

कशि काळनागिणी वैरिण झाली नदी ! ध्रु०
प्राणविसावा पैलतिरावरि, अफाट वाहे मधी. १
सुखी मीन हे तरति न गणुनी लाटा कोट्यावधी. २
सुखी पांखरें गात चाललीं पार वादळीं सुधी. ३
पापिण खिळलें तिरा, विरह हा शस्त्रावीणें वधी. ४
पैलतटिं न कां तृण मी झालें ? तुडविता तरी पदीं ! ५
पैलतटि न कां कदंब फुललें ? करिता माळा कधीं. ६
प्राणाचें घे मोल नाविका, लावि पार, ने अधी ! ७

अजमेर, डिसेंबर १९२१ ]

## ११८ निजल्या तान्ह्यावरी

[ जाति सृष्टिलता, राग केदार ]

निजल्या तान्ह्यावरी माउली दृष्टि सारखी धरी. ध्रु०

तिचा कलीजा पदरीं निजला,
जिवापलिकडे जपे त्याजला,
कुरवाळुनि चिमण्या राजाला
चुंबी वरचेवरी. १

सटवाई जोखाइ हसविती,
खळी गोड गालांवरि पडती
त्याची स्वप्नें बघुनि मधुर ती
कौतुकते अंतरीं. २

अशीच असशी त्रिभुवनजननी,
बघत झोपल्या मज का वरुनी ?
सुखदुःखांचीं स्वप्नें बघुनी
कौतुकशी का खरी ? ३

अजमेर, डिसेंबर १९२१ ]

## ११९ कळा ज्या लागल्या जीवा

[ वृत्त वियद्गंगा ]

कळा ज्या लागल्या जीवा मला की ईश्वरा ठाव्या !
कुणाला काय हो त्यांचें ? कुणाला काय सांगाव्या ?

उरीं या हात ठेवोनी उरींचा शूल का जाई ?
समुद्रीं चौंकडे पाणी, पिण्याला थेंबही नाहीं.

जनांच्या कोरड्या गप्पा, असे सारे जगद्बंधू !
हमामा गर्जनेचा हो, न नेत्रीं एकही बिंदू.

नदीला पूर हा लोटे, न सेतू ना कुठे नावा,
भुतांची झुंज ही मार्गे, धडाडे चौंकडे दावा.

नदी लंघोनि जे गेले तयांची हांक ये कानीं,
इथे हे ओढिती मार्गे मला बांधोनि पाशांनी.

कशी साहूं पुढे मार्गे जिवाला ओढ जी लागे ?
तटातट् काळिजाचे हे तुटाया लागती धागे.

पुढे जाऊं ? वळूं मार्गे ? करूं मी काय रे देवा ?
खडे मारी कुणी, कोणी हसे, कोणी करी हेवा !

अजमेर, ता. ३० जानेवारी १९२२ ]

## १२० जन म्हणति सांवळी !

[ जाति नववधू, राग दुर्गा ]

जन म्हणति सांवळी तुज सगळे.
करुणार्ह बिचारे ते अंधळे ! ध्रु०

नवमीची गे रात्र सांवळी.
चंद्रकोर बिजवरा कपाळीं,
शालूवरि ताऱ्यांची जाळी,
ज्या मोहवी न त्या काय कळे ? १

त्याच रात्रिच्या अगाध उदरीं
तेजोनिधि वडव्यापरि सागरिं
प्रगटतांच तो दशदिशांतरिं
कोंदुनी प्रभा त्रिभुवन उजळे. २

अगाध सुंदर यमुना काळी.
तटीं गर्द झाडांच्या ओळी,
वेडा झाला तो वनमाळी,
उजळिते मनोमल शाम जळें. ३

काळा काळा मेघ सुंदरी,
भाग्यहीन जो मोहे न परी,
धनधान्याची समृद्धि उदरीं,
मरतील बापडे जरि न वळे. ४

तरंग झुलती, विचार फुलती,
हास्य–अश्रु तव मनिं दरवळती,
बाग पटांतरिं फुले गोड ती,
पट गळतां सेवूं गोड फळें. ५

नील कमलिनी माझी सुंदरि,
जन्मजन्मिं लाभो मज ती तरि,
केवि बघति मतिमंद पटांतरिं,
दृष्टीच जयांची भरे मळें ? ६

अजमेर, ता. १ फेब्रुवारी १९२२ ]

## १२१ फेरीवाला

[ जाति सृष्टिलता, राग भीमपलासी ]

फेऱ्या दारावरी कुणी हा फेरीवाला करी ? ध्रु०

प्रभातकाळीं दीपविसर्जनिं,
सायंकाळीं दीपदर्शनीं,
पुकार करितां खिडकीवरुनी
नजर फेकितो वरी. १

पलीकडे वटवृक्षाखालीं
पारंब्यांची ज्याला जाळी,
गर्द साउली ज्या कवटाळी,
उभा आज तो परी. २

कंवराणीजी, गोखड्यांतुनी
जरा बघा तर हळुच ढुंकुनी,
हवा तरी घ्या बुरखा ओढुनि,
नजर चळो ना परी. ३

किति वीरांनीं सुंदर तरुणी
हरिल्या पूर्वी शत्रुपुरांतुनि,
रसाळ लिहिल्या कथा कवींनी,
किती पुराणांतरी ! ४

विशाल त्याचा बळकट बाहू
तरुणि फुलापरि शकेल वाहूं,
टोळांपरि मग शत्रू येवू,
उडविल माशांपरी. ५

नदीपलिकडे त्याची घोडी
टापा हाणी, जमीन फोडी
कशी खिणखिणे ! तिला न जोडी,
नेइल बिजलीपरी. ६

अजमेर, ता २ फेब्रुवारी १९२२ ]

## १२२ पक्षि पिंजऱ्यांतुनी उडाला !

[ जाति सुश्लिलता, राग यमनकल्याण ]

पक्षि पिंजऱ्यांतुनी उडाला, बसा हात चोळुनी ! ध्रु०

अफाट गगनीं दृष्टी फेका,
खुशाल मारा हजार हांका,
प्राणहि त्याच्या मार्गी झोका,
येइल का परतुनी ? १

डोळे फाडा, तोंडें वासा,
रडा पोटभर अथवा हासा,
बाजी आली, उलटा फासा
पडला हा कोठुनी ? २

अनंग कोणी कुमार आला,
हांक मुकी दे कंवराणीला,
जादूचा मग दोर लाविला
भरजरि खिडकींतुनी. ३

भक्कम तुमचा महाल सारा
दारावरही खडा पहारा,
जनानखान्या कुलुपें बारा,
गेल्या तुरि देउनी. ४

अतां वायुवर शस्त्रें हाणा,
खुशाल घ्या हो भाकाआणा,
उचला विडा, तयांना आणा
मर्द तरिच मी गणीं. ५

अगाध चक्रव्यूह सुरांचा,
झोपाळा त्यामधिं रागांचा,
खेळ चालला त्यावरि त्यांचा,
बघा जरा ढुंकुनी. ६

आकाशांतिल तारे उखडा,
तुरुंगांत वायूला जखडा,
कंवराणीला तेथे पकडा
कोणी वीराग्रणी ! ७

अजमेर, ता. ३ फेब्रुवारी १९२२ ]

## १२३ दृष्ट हिला लागली !

[ जाति सुश्लिलता, राग यमनकल्याण ]

दृष्ट हिला लागली  पडे कुणा पाप्याची साउली ! ध्रु०

लिंबलोण ग कोणी उतरा,
जगदंबेचा ग अंगारा
लावा, बांधा गंडादोरा.
काळजि घ्या चांगली ! १

चाफ्यापरि गोरेपण पिवळं,
काकडीपरी अंग कोवळं,
मैद्यापरि लुसलुशीत सगळं,
दृष्ट पडुनि करपली ! २

ज्याच्या पोटीं उद्दंड माया
लेकुरवाळया आयाबाया,
पोक्त शहाण्या आणा दाया,
दावा चाफेकळी. ३

चिमणिसारखं तोंड जाहलं,
डोळ्यावरचं तेज चाललं,
नाक उंच वर येउं लागलं,
गत कशि ग जाहली ! ४

विशाळ डोळे लावुनि वरती
चित्रें पाही जशि काकुळती,
मधेंच दचकुनि कान देइ ती,
पोर बाइ बहकली ! ५

करकरीत तीनी सांजा ही
देवदर्शना एकलि जाई,
वाऱ्यापरि ही अचपळ बाई
 दृष्टें कुणि पाहिली ! ६

गरिब भोळसर आयाबाया,
खऱ्या दृष्टिची वार्ताहि न यां !
अनुभव घेउनि सारें वाया !
 माया खरि अंधळी ! ७

अजमेर, ता. ३ फेब्रुवारी १९२२ ]

## १२४ विरहांतील चित्तरंजन

[ जाति सृष्टिलता, राग यमन ]

विरहीं मी बहुपरी मनोमय चित्रें रचिं सुंदरी. ध्रु०

चित्रकला ती काय बिचारी
सदा व्यग्र जरि दिसे विचारी !
तिला जखडिती बेड्या भारी,
 काय करिल ती तरी ? १

अडखळोनिया जड रंगांतुनि,
झगडुनिया गे जड कलमांतुनि
चिन्मय हृद्गत ये ठेचाळुनि
 अर्धें मेल्यापरी. २

मला सुंदरी, असें न बंधन;
ब्रह्मांडांतुनि भरारि मारुन
माधुर्या गे सांठवूनि मन
अर्पी चित्रांतरीं. ३

उत्कंठेचा गोड रक्तिमा
खुलवि तुझें मुख, तया न उपमा,
प्रभातिंचा त्यापुढे न महिमा,
न ये गुलाबा सरी ! ४

स्वप्नभूमिंतिल अगाध माधुरि,
चर्मविश्वि का दिसे कुठे तरि ?
भरुनि तुझ्या ती नयनीं अधरीं
चित्र उभें मन करी. ५

हृदयाच्या गे तरंगरंगीं
शृंगारुनि नवनव्या प्रसंगीं
उभी करुनि मन तुला शुभांगी,
विरहखेद गे हरी. ६

कधिं रुसतेशी, कधिं हसतेशी,
लेकरांमधें कधिं रमतेशी,
दुःखीं जशि का पाउस पाडिशि
सौख्याचा मजवरी ! ७

अजमेर, ता. ७ फेब्रुवारी १९२२ ]

## १२५ तुझे लोचन

[ जाति सृष्टिलता, राग बहार ]

अगाध दुर्मिळ जनीं   दिसे मज कांहिं तुझ्या लोचनीं   ध्रु०

या डोळ्यांच्या खिडक्यांभीतरि
अफाट अनुपम दिसे माधुरी,
प्रिये जिवलगे, काळिज त्यावरि
टाकिन कुरवंडुनी.   १

अथांग भरला अपार सागर,
हेलकावतो अगाध सुंदर,
नाचति रविकर जललहरींवर,
कांपे मन पाहुनी.   २

अफाट निर्मल आभाळांतुनि
तारे डौलें निघति पलटणी
तालसुरावर नियमित चरणीं
जणुं तंबुर ऐकुनी.   ३

मूर्तिमंत जणुं रागरागिणी
तन्मय झाल्या गोड गायनी
नाग, हरिण, सुरतरुणि, यक्षिणी
डुलति सखे, परिसुनी.   ४

मदनाचा कुणि तरुणि पाळणा
हलवी गाउनि दिव्य गायना
जादूची का ही गे रचना
की भासचि हा मनीं ?   ५

अजमेर, ता. ८ फेब्रुवारी १९२२ ]

तम्बुर=ढोल

## १२६ घट भरा शिगोशिग

[ जाति नववधू, राग वसंत ]

घट भरा शिगोशिग, भरा भरा !
वाहुं द्या दयेचा वरुनि झरा. ध्रु०

पुत्रोत्सविंही प्रसववेदना,
विवाहमंगलिं विरहयातना,
प्रणयरसोद्गमिं पापकल्पना,
हीं शल्यें सलती, हरा ! हरा ! १

दिनोद्गमीं रविमुखिं घनरेषा,
पूर्णचंद्रिं लांछन दे क्लेशा,
शुक्रमुखा दे तम परिवेषा,
ही न्यूनें आतां दूर करा. २

रंग अडविती चित्रभावना,
सूर दुखविती मधुर गायना,
वर्ण जखडिती कोमल कवना,
शृंखला खिळति या, त्वरा करा. ३

ज्योतिर्मय ही सखिची कांती
वाटे कीं मुरवावी स्वांतीं,
झोकांडी दे, न येचि हातीं,
ही माया निज संहरा, हरा ! ४

अजमेर, ता. ८ फेब्रुवारी १९२२ ]

## १२७ निष्ठुर किति पुरुषांची जात !

[ जाति पतितपावन, राग हमीर ]

निष्ठुर किति पुरुषांची जात ! ध्रु०

भिरकावित गाईस निसटला हुर्र करित निमिषांत ! १
रवि सोडुनि माठांत निघालें महि घेउनि हातांत. २
वेडि उभी मी लावुनि डोळे वाट बघत द्वारांत. ३
नजर एकहि न टाकुनि निसटे सांड जसा नादांत. ४
ठार करी वेताळ वावटळ वितळुनि जणुं वाऱ्यांत. ५
गाळ्या देता दोन तरी मी जळतें अशि न मनांत ६
परि हें निघणें अनोळख्यापरि विळा बाइ पोटांत ! ७
भेट जरा कुंजांत नदीवर, घेशिल तृण दांतांत ! ८

अजमेर, ता. ९ फेब्रुवारी १९२२ ]

मही=लोणी. गाळ्या=शिव्या.

## १२८ घट तिचा रिकामा—

[ जाति नववधू, राग देस ]

घट तिचा रिकामा झऱ्यावरी,
त्या चुंबिति नाचुनि जळलहरी. ध्रु०

अशी कशी ही जादू घडली ?
बघतां बघतां कशी हरपली ?
का समजुनिया राणी अपुली
तिस उचलुनि नेई कुणी परी ? १

मिळत चालल्या तीनी सांजा,
दिवसाचा हा धूसर राजा,
चंद्रा सोपुनि अपुल्या काजा
घे निरोप कवळुनि जगा करीं. २

पलीकडे त्या करुनि कापणी
बसल्या बाया हुश्श करोनी,
विनोद करिती, रमती हसुनी,
जा पहा तिथे कुणि ही भ्रमरी. ३

तिथे वडाच्या पाळीभवती,
नवसास्तव मृगनयना जमती;
कुजबुजुनी गुजगोष्टी हसती,
रतिमंजरि हेरा तिथे तरी. ४

तांदुळ पदरीं, बिल्वदळ करीं
चरण क्षाळुनि जवळ तळयावरि,
जमति शिवालयिं पोक्त सुंदरी;
फिरकणी बघा ही त्यांत तरी. ५

पलीकडे वेळूंची जाळी;
तेथें वारा धुडगुस घाली,
शीळ गोड तीमधुनि निघाली,
ही झुळुक हरपली लकिरिपरी. ६

अजमेर, ता. १५ फेब्रुवारी १९२२ ]

फिरकणी=भिंगरी. कवळुनि = आलिंगन देऊन.

## १२९ पुनवेची शारद रात

[ जाति अचलगति, गभां ]

अजि पुनवेची शारद रात,
झिगत आला तारानाथ.
आल्या मुखरिणि या बाहेर,
चंद्राभोवति धरिती फेर.
फेर धरिति या गाउनि आज,
लखलख चमकति लेउनि साज,
अंगणिं भरला वरि आनंद,
लीला मचली अंदाधुंद,
गवळणि जमल्या कुरणीं आज,
मुरली घुमवा या महाराज ! १०
शरदाचा हा मादक काळ ,
अंगीं आला, या गोपाळ,
गाणीं गाऊं घेउनि फेर,
मोरमुगुट शिरिं, या बाहेर.
धवल पिठापरि यमुना-तीर.
लहरी नाचुनि गाई नीर,
खिदळे वारा हा कुंजांत,
डुलती राया, गाई आंत;
विखरी परिमळ हा कुरणांत
मद संचरला दाहि दिशांत.
चंचळ चरणीं नाचूं आज,
मुरली घुमवा या महाराज ! २२

अजमेर, ता १६ फेब्रुवारी १९२२ ]

मचली=खच्चून झाली.

## १३० कवणे मुलखा जाशी ?

[ जाति लवंगलता, राग ललत ]

कवणे मुलुखा जाशी गे तूं ? कवणे मुलखा जाशी ? ध्रु०
भार शिरावर, अपार सागर, फुटकी नाव जराशी. १
जनकजननि ते तुझे कवण ते ? कोठिल तूं रहिवाशी ? २
कुठे वतन तें, कुठे सदन तें ? मळे, खळ्यांच्या राशी ? ३
वायु झराझर आळवि सुस्वर, ओढि तुझ्या पदराशी. ४
सूर्याचे कर धरुनि तुझे कर आर्जविती रहाण्याशी. ५
या जळलहरी येथिल सुंदरि, आवळिती चरणांशीं. ६
माझें तें घर तुझें गडे कर, लावुनि ऊर उराशी ! ७
गाउनि निज गुज निजविल काळिज माझें श्रांत मनाशी. ८
साहस न करीं अथांग सागरिं एकलि अशी प्रवासीं. ९

अजमेर, ता. २२ फेब्रुवारी १९२२ ]

## १३१ रतलें परपुरुषाशीं

[ जाति लवंगलता, राग ललत ]

रतलें परपुरुषाशीं रे, मी रतलें परपुरुषाशीं. ध्रु०
मधुर मुरलिसुर हलवुनि थरथर ओढिति या चरणांशी. १
पैलतिरावर कुंज मनोहर, माझी तेथ मिराशी. २
भिकार सागर गर्जो भेसुर, पुसतें कोण तयाशी ? ३
प्रबल कुसुमशर उचलि परांवर, नेइल पैल तिराशी. ४

मिराशी = कुळ-वाडी

तरंग मनिं किति ! झुळुका ढकलिति, उत्कंठा-शीडाशीं. ५
चंचल उर जरि चळलें, सावरि रति आवळुनि तयाशीं ६
परचुंबनमधु पिउनि पुसति वधु का शिळपट नवऱ्याशी ? ७
लज्जाभीती घोळुनि पीती रमती ज्या पर-पाशीं. ८
जडलें मन जर परपुरुषावर, भान न मग शरिराशी. ९

अजमेर, ता. २४ फेब्रुवारी १९२२ ]

## १३२ हिंदु विधवेचें मन

[ जाति पादाकुलक, राग पिलु ]

सांगुं तुम्हांला किती दयाळा ?
न घडे त्याचें नांव कशाला ? ध्रु०

पतित दीन मज पाहुनि दुर्भग
कळवळलें उर, सागर तें मग !
साहसिं सजलां लाथाळुनि जग,
उदारपण का न दिसे मजला ? १

निःस्वार्थाचा कळसाचि वाहुनि,
यज्ञिं सुखाची आहुति देउनि,
पापिणिला मज पुसतां विनवुनि,
उत्तर देऊं काय तुम्हांला ? २

“ चराचरांचीं मिथुनें जगतीं
सहवासानें ” म्हणतां, “ जगती ”
कळे मलाही, काय परी गति ?
भ्रमण भुतापरि आलें भाला ? ३

नीरस वेलिस फुलें उमलती,
खिन्न नभाला तारे भेटति,
रिक्त सरोवरिं कमळें फुलती ”
कां मज कथितां हें विधवेला ? ४

अमरें मजवर दार लोटितां
मर्त्य तुम्ही तें उघडूं झटतां,
सुखमंदिरिं त्या नेण्या झुरतां,
दयाघना, कशि फेडुं ऋणाला ? ५

पतित बहिष्कृत अस्पृश्यापरि
घिरट्या घ्याव्या मी बाहेरी;
दया करा, जा आंत तुम्ही तरि
घेउनि कुणि अनुरूप सखीला. ६

बहीण होइन, दासी होइन,
भक्त होउनी चरणां पूजिन,
तुमच्या वाटा केशीं झाडिन,
अधिक पत्निपणिं काय कृपाळा ? ७

बोल न बोला एकहि यावर,
धैर्याचे ढासळतिल डोंगर,
भलतें जाइल निघोनि उत्तर.
भागिदार नच व्हा नरकाला ! ८

औदार्यास्तव ह्या रात्रंदिन
आळवुनी मी हरिला विनविन,
अभद्र माझ्या मलिन कराहुन
श्रेयस्कर कर देउ तुम्हांला ! ९

अजमेर, ता. २ एप्रिल १९२२ ]

## १३३ दे पूर्ण हृदय सुंदरी

[ जाति सृष्टिलता, राग भैरवी ]

देशि मला तूं जरी  तरी दे पूर्ण हृदय सुंदरी.  ध्रु०

जरी कोपरा ठेविशि राखुनि
चोर तिथें गे शिरतिल लपुनी,
घालितील गे छापे तेथुनि
  रतिसाम्राज्यावरी.  १

दुधामधें गे थेंब विषाचा,
सुखसंभव गे तेथ कशाचा ?
मार्ग सरळ मग तो नाशाचा,
  दूध विषच हो तरी.  २

तार सतारिस सैल एक गे
संगीताचें नांवहि न लगे,
सोंगढोंग बाहेरिल अवघें
  समज शवाचेपरी.  ३

कुभावनेनें विटाळतां मन
प्रीती जाइल पळून तेथुन,
विषमय होइल जीवन त्याहुन
  मरण बरें किति तरी !  ४

अजमेर, ता. ६ एप्रिल १९२२ ]

## १३४ उखळांत दिलें शिर ! काय अतां !

[ जाति नववधू, राग मालकंस ]

उखळांत दिलें शिर, काय अतां ?
दणकवा मुसळ ढोंग न करितां ! ध्रु०

दुबळयांचें बळ केवळ दुस्तर,
करील कैसें दिव्य भयंकर,
बलोद्धतांची मोडिल कंबर,
जग चकित होउं द्या हें बघतां ! १

माय, तुझा तो चिलया बाळा
विसरुं कसा ? कांडितां तयाला
अश्रुबिंदु त्या एक न आला,
बांधिलें अनंता बलवंता. २

प्रल्हादहि सत्याग्रहरत तो,
आइ, आठवे सदैव सुत तो,
ढळे न तिळभर छळीं आमित तो,
पशु करुनि सोडिलें भगवंता. ३

हरिश्चंद्र तव सुत सत्याग्रहि,
सदा अहिंसारत तो निग्रहि,
अजस्र मारा रिपुचा साही,
परि हरीस आणी मानवता. ४

ह्या बाळांचा आत्मा पसरे,
युगांतरीं तो आतां उतरे,
एकवटुनि ‘ मोहनीं ’ अवतरे,
तूं वांझ न गे माझी माता ! ५

अजमेर, ता. १३ एप्रिल १९२२ ]

## १३५ दरडीवरील बाला

[ जाति मदनमंजरी, राग जोगी ]

चहुंकडे ढगांच्या माळा,
उभि दरडीवर ती बाला. ध्रु०

वायुची बसे थाप ती, चिरगुटें उडाति, केस भुरभुरती,
का चढली दरडीवरती ? १

चौबाजुंस शेतें छान, झोपडें सान गर्द राईत,
तें दिसे गार वेलींत. २

टाकोनि मोकळें दार तुफानीं गार आज कां आली ?
कां उभी उंच या काळीं ? ३

क्षणिं नजर फेकि मेघांत, पुन्हा मार्गांत काय ही पाही ?
का दिसे दूर हिस कांहीं ? ४

ते विशाल डोळे किती गरगरा फिरति खालती वरती,
गगनाचा वेधचि घेती ! ५

कालवे काय हृदयांत ? एक निमिषांत छटा किति खुलती
बिजलीपरि गालांवरती ! ६

प्रीति का मिळे बाजारि ? काय शेजारि ? सोड मीमांसा,
प्रीतिमूर्ति बघ ये ऐसा ! ७

अजमेर, ता. ३० एप्रिल १९२२ ]

## १३६ अंगाईगीत

[ जाति चंद्रभागा, राग सारंग ]

जो जो जो जो रे ! ध्रु०

निज माझ्या छकुल्या चिमण्या राजा,
निज रे लडिवाळा !
बाळ गुणी, झोप नेलि रे कोणीं ?
जो जो जो बाळा ! १

घरटीं तीं फांद्यांमधुनी झुलती,
निजले चिउकाउ;
निजवीती झुळका गाउनि गीती;
गाणीं किति गाऊं ? २

हम्मा ही दूदू देउनि पाहीं
निजली गोठ्यांत;
रे छबिल्या, राघूमैना निजल्या
अपुल्या पिंजऱ्यांत. ३

या वेळीं निजलीं झाडें वेली;
निजला चांदोबा;
रात्र किती चढली काळी भवतीं
आला बागुलबा ! ४

शुक्र गडे झालें जिकडे तिकडे;
झोप न तुज बाळा !
खिंदळशी, खुदुखुदु खुदुखुदु हसशी,
एकच हा चाळा ! ५

लडिवाळा, रुणुझुणु घुंगुरवाळा
पायीं वाजविशी,
कशि बाळा, झोप शिवेना डोळां ?
अफु आली तुजशी ! ६

सटवाई षष्ठिदेवि जोखाई,
सांभाळा याला.
न शिवो तें पाप अमंगल भलतें
माझ्या छबिल्याला ! ७

अजमेर, ता. २ मे १९२२ ]

## १३७ मिळे गे नयनां नयन जरी

[ जाति पतितपावन, राग भीमपलासी ]

मिळे गे नयनां नयन जरी—
नयनमोहिनी, मनी उसळती लहरींवर लहरी. ध्रु०
काय घुसळिला यापरि सागर मंथनकालिं सुरीं ? १
विजेपरी लखलखतां अवचित दिपविशि नेत्र खरी. २
पिटाळुनी स्मृति, धृति, मति ह्रदया व्यापिशि तूंच पुरी. ३
निलाजरे हे नयन पाहतिच, हासति लोक तरी. ४
नयनगवाक्षीं सकलेंद्रियगण एकवटे सुंदरी. ५
पापदृष्टि ही म्हणति, त्यांहिं मज ओळखिलें नच परी. ६

आग्रा रेल्वेस्टेशन, ता. २२ जुलै १९२२ ]

## १३८ समजुनि बांध शिदोरी

[ जाति लवगलता, राग तिलककामोद ]

सहचरि, समजुनि बांध शिद्ोरी. ध्रु०

आवडनावड राख बाजुला, बघ मार्गाची दूरी. १
गोड करंज्या, खार्जी बासति; बुरसे गे साटोरी, २
लग्नीं कार्यी घीवरलाडू, मार्गि न त्यांची थोरी. ३
पोहे, सत्तूपीठ, फुटाणे वाट काटितिल सारी. ४
मार्गि मिळे कीं न मिळे पोई, असुं दे तांब्याद्ोरी. ५
हरिनामाची गांठ घाल मग न घडे मार्गी चोरी. ६

अजमेर, ता, १ ऑगस्ट १९२२ ]

सत्तूपीठ = गहू, हरभऱ्याची डाळ आणि थोडे तादूळ ही भाजून केलेले पीठ.
बासती = शिळी होतात खाजी = खाद्ये

## १३९ अशांचें कोण करिल तरि काय ?

[ जाति पतितपावन, राग अडाणा ]

अशांचें कोण करिल तरि काय ? ध्रु०

वस्त्र हवें ज्यां लाज झाकण्या, अन्न ढकलण्या काय १
रडति न ज्यांचीं रांडापोरें, शिवे धनाचि न हाय २
दिली तिलांजलि देहसुखावरि काय अशांस अपाय ? ३
खुशाल घाला अशां तुरुंगीं, काय अशांचें जाय ? ४
भीती का चतुरंगबल नृपा ? दिला मृत्युशिरिं पाय ! ५
'जनीं जनार्दन' ही हरिसेवा, अन्य न ज्यां व्यवसाय ६
अशांस पाहे वक्र कुणाची ऐशी व्याली माय. ७
दीन जनांची एक काळजी, मनीं दुजीस न ठाय. ८
धन्य तुझा गे कुसवा माते ! दैन्य कां न तव जाय ? ९

अजमेर, ता. ८ ऑगस्ट १९२२ ]

## १४० कोण रोधील ?

[ जाति वरमंगला, राग भूप ]

या भविष्याचिया दिव्य कारागिरा
कोण रोधील ? दे कोण कर सागरा ? ध्रु०

शूल राजा, तुझा रक्त त्यांचें पिओ,
गृध्रगण भक्षण्या पुण्य गात्रां शिवो,
दुर्गि त्यांची शिरें अधम कुणि लोंबवो,
अंत त्यांचा नको समजुं हा नृपवरा ! १

ज्योति मृत्युंजय प्रबळ पिंडाहुनी
समज दावाग्निशा चहुंकडे पेटुनी
देशकालांसि रे टाकितिल व्यापुनी,
अंतिं फडकेल रे ध्वज तयांचा खरा. २

ज्यावरी भार तव, ज्यावरी गर्व तव,
विफल तोफा तुझ्या, पलटणी सर्व तव,
विफल बलदर्प तव, यांत का शर्व तव ?
उघड लोचन, पहा दूर राजा, जरा. ३

भव्य ते स्तंभ बघ तुंग अट्टालिका,
त्या कमानी पहा, त्या गवाक्षादिकां,
सौध ते, कळस तो सोनियाचा निका,
ध्वज वरी प्रीतिचा मोहवी भास्करा. ४

तेथ त्या रत्नमय दिव्य सिंहासनीं
लखलखे भरतभूजननि बघ विजयिनी !
प्रणय, नय, सत्य हे सज्ज गण रक्षणीं,
बघ भविष्याचिया दिव्य त्या मंदिरा. ५

अजमेर, ता. १८ ऑगस्ट १९२२ ]

## १४१ प्रतिज्ञा

[ वृत्त सौदामिनी, राग मालकस ]

धुळीलाहि जाऊं मिळोनी सुखें,
घरालाहि होऊं सुखें पारखे,
उपाशी मरूं दूर देशांतरीं,
वनी रानिं हिंडूं पिशाचापरी,
सुळाच्या अती तीव्र धारेवरी
हसोनी सजूं रक्तपुष्पापरी,
असत्या तुझ्या हा न माथा झुके,
जरी कापशी, काप येई सुखें !
जुलूमा न दे अंगुली हात हा,
कलम् कर सुखें, आण चाकू पहा ! १०

असे दोगला, दो पित्यांचा तरी
फसे ऐंद्रजालीं तुझ्या यावरी !
फिरूं नागवे होउनी वानरें,
विषारी तुझे ते दुशाले पुरे !
तुझ्या त्या महालां विलासां भुले
महारौरवीं घोर नर्की गळे !
नको स्पर्श हा दुष्ट माये अगे !
भुतासारिखा मोह आतां निघे ! १८

अजमेर, ता. २६ सप्टेंबर १९२२ ]

दोगला = शिंदळीचा, दोगला-दोन बापांचा. असा शब्दप्रयोग माळव्यात रूढ आहे.

## १४२ वसंत फेरीवाला

[ जाति लवंगलता, राग देस ]

आला हाऽऽ द्वारि उभा,ऽऽ वसंत फेरीवाला ! ध्रु०

पोतें खांद्यावरि सौद्याचें देइल ज्याचें त्याला. १
कुणीं लाविला गुलाब-बेला, घर न पुरे वासाला. २
कुणीं पेरिले अंगणिं कांटे वाव न पद्‍ देण्याला. ३
कुणी पेरिले पेरू-आंब्रे, वाण न माधुर्याला. ४
कुणीं लाविल्या बोरीबाभळि, हाणिति कर कर्माला. ५
चोख दयाळू फेरीवाला, त्याला दोष कशाला ? ६
लावुनि पालवि खुलवुनि फुलवुनि देइ परत कांट्याला. ७
दाम तसा घ्या माल मोजुनी, बोल इथे कोणाला ? ८

अजमेर, ता. ५ नोवेंबर १९२२ ]

## १४३ जेव्हां लोचन हे

[ सुनीत, वृत्त शार्दूलविक्रीडित ]

जेव्हां लोचन हे तुझे विहरती या माझिया लोचनीं
तेव्हां ज्योति झळाळते जिवलगे, सौंदर्यसीमाच ती !
वर्णाया तरि वर्ण आणुं कुठुनी ? कुंठेच माझी मती,
राही मूक उभा, गती नच अतां वाचाळतेलागुनी.

कैशी मी लपवूं, कुठे छिपवुं ही रम्याकृतींची खनी ?
हें माझें पडकें भिकार घरटें, या चोरही घेरिती,
ठेवूं मी हृदयांतरीं तरि तया कांटे अतां व्यापिती,
कोठे ठेवुं तरी सुरक्षित हिला काळाचियापासुनी ?

वार्णीचें बनवीन मंदिर तरी सौभाग्य तें कोठुनी ?
जें लाभे कविला तया यम जया कांपे सदा निर्दय.
रंगी रंगुनि जो रची सुकवितामंजूषिका-वाङ्मय
त्याला ये लपवावया निजसखी, आशा वृथा मन्मनीं !

आतां दीनदयाघना, चरणिं रे ही एकचि प्रार्थना,
नेतां पुण्यमयी प्रिया तिजसवें ने पातकी या जना.

अजमेर, ता. ७ डिसेंबर १९२२ ]

## १४४ तूं कवण जगांतिल ललना ?

[ जाति लवंगलता, राग परज ]

तूं कवण जगांतिल ललना ? ध्रु०
बाण-कल्पनासृष्टींतुनि का अवतरलिस या भुवना ? १
गंधर्वांच्या सुरसृष्टीमधिं पावलीस का जनना ? २
का नंदनवनकुसुम पातलिस रिझवाया मम नयनां ? ३
सुर-जान्हविंतिल कमलगंध का मूर्त येशि मम सदना ? ४
आनंदच का शरीर धरुनी आलिस विहसितवदना ? ५
येइं, करीं पावन या सदना लावुनि कोमल चरणा. ६
स्थिरावले हे लोचन, पडली भुरळ बघुनि तव नयनां ७
स्रवुनी सुहसित चंद्रकिरणमय उजळी या मम भुवना. ८
बहु रत्नांची जननि जागवी हृदयगुहागत कवना. ९

अजमेर, ता. २२ जानेवारी १९२३ ]

## १४५ रुणुझुणु ये !

[ जाति शुभवदना ]

रुणुझुणु ये, रुणुझुणु ये झणकारित वाळा
लुटुलुटुलुटु दुडुदुडुदुडु ठुमकत ये बाळा ! ध्रु०

धुंदि अजुनि रजनिनयनिं;
सावरूनि पदर धरुनि
शुभवदना उडुरदना देइ जांभयांला. १

दिग्ललना धौतमुखी
रत्नदीप कनकतबकिं
घेउनिया वाहति या बालभास्कराला. २

काकड-आरति करिती
देवगृहीं नवयुवती;
आळविती जागविती नंद-नंदनाला. ३

रजनितनय मारुतगण
नृत्य करिति चपलचरण,
तोम् तननन झूम् झननन करिति गायनाला. ४

जागति बघ चिउकाऊ;
लागति घरट्यांत गाउं;
डोलति तरु, लागति करुं ते हरिभजनाला. ५

जागति गोठ्यांत गाइ,
पाजति वत्सांस पाहि;
ये रांगें ! कळ लागे माझिया स्तनांला ! ६

अजमेर, ता. २४ जानेवारी १९२३ ]

## १४६ समज मानिनी !

[ जाति वनहरिणी, राग भूप ]

समज मानिनी, मान न करिं गे. ध्रु०
झळक चपल ही व्यथार्थ, द्विस्तव प्रणयाचा अपमान न करिं गे. १
अमृतमधुर रसपान हवें तरि अधररसाचें दानच करिं गे. २
मधुमय कोमल कमल कमलमुखि, मधुदानीं अनमान न करिं गे. ३
चंद्रमुखी, हा चंद्र कांतिमय कांतिदानिं अभिमान न करिं गे. ४
अधरमाधुरीविषयिं कृपणपण, नियतिविमुख कृति जाण, न करिं गे. ५
देहभोग हे भोगुनि सरती, सकरुण सुमुखि, उत्थान न करिं गे. ६

अजमेर, जानेवारी १९२३ ]

## १४७ उडाला हंस !

[ जाति लवंगलता, राग जोगी ]

ये ना हंस उडाला हाता,
कां रे तळमळ करितां आतां ? ध्रु०

अनंत निर्मळ गगननीलिमा येइ न हातीं धरितां;
त्यांत निसटुनी घेत भरारी वितळे बघतां बघतां. १

रत्नखचित हा सुवर्णपंजर; त्यांत लोभुनी फसतां
रमुनि रमविलें, परि न गुंतला तटका तोडुनि जातां. २

भक्कम तुमचा पंजर बळकट; दार जखडिलें असतां
निघे तयारी कडेकोट ही जुमानिली नच निघतां. ३

मोत्याचा चारियला दाणा प्राणांहुनि या जपतां,
निघे लावुनी चटका ! कोठे तुमची मायाममता ? ४

रमला, झुलला, फुलला, खुलला मनगटावरी डुलतां;
कां मग तातडि तीरसा सुटे टाकुनि पंजर उडतां ? ५

कुणीं दिली या हांक ? कोठुनी कानीं येउनि पडतां
हा तडफडला, हा फडफडला निघे निरोप न घेतां ? ६

पूर्ववनांतिल रव परिचित का कानीं याच्या येतां
होउनि जागी स्मृति, खडबडुनी निघे न कांहीं बघतां ? ७

मधुर रवें हा पंजर घुमतां मोहवि साऱ्या जगता,
सुना रिकामा मुका तिडिक दे नयनां आतां बघतां. ८

कां रे डोळे फाडुनि बघतां ? कां रे उर बडवीतां ?
कां तळमळतां ? कां हळहळतां ? आतां न फिरे परता ! ९

लष्कर-ग्वाल्हेर, ता. १ एप्रिल १९२३ ]

## १४८ नदितिरीं उभी ती

[ जाति नववधू, राग जोगी ]

नदितिरीं उभीं ती दाट तृणीं,
आर्द्र वस्त्र ठिबके चरणीं. ध्रु०

नयन नभीं, कर दोन्ही जुळले;
केशपाश उरिं पाठीं रुळले;
तुफान हृदयीं घोर उसळलें;
ही पसर छाया मुखिं नयनीं. १

बघति तुंगगिरि घेरा घालुनि,
थिजले तरुवर तिला पाहुनी,
स्थिरावले ढग पळतां गगनीं,
डोकावि बालरवि ढगांतुनी. २

असह्य छळ ज्यांस्तव सोशियला,
तेच निघाले टाकुनि मजला,
नभ कोसळलें, हाय कपाळा,
परि दुभंग न देवा, धरणी ! ३

कोण कुणाचें जगतीं देवा ?
कोण दीर रे ? कोण सासवा ?
कुठला मायेचा ओलावा ?
गांजिलें भाजिलें दिनरजनीं ! ४

म्हणति मीच कीं त्यांना गिळिलें,
करंटीच अवदसा जन्मलें,
खरेंच का हें देवा, सगळें ?
मग नको दावणें मुख फिरुनी ! ५

डोईवर चिमण्यांची पाटी,
पैसा अडका एक न गांठीं,
कोण पृथ्विच्या अफाट पाठीं ?
मग काय करिन तरि मी जगुनी ? ६

पिलें अर्पितें तुझिया चरणां
दयाघना, तुज त्यांची करुणा,
फुटेल पान्हा तुजविण कवणा ?
त्यां तूंच माय, तूं बाप जनी. ७

मायपोट तूं गंगामाई;
अगाध माया तुझिया ठायीं;
आल्यें धावत तुझिया पायीं;
दे ठाव तुझ्या डोहीं गहनीं ! ८

तुझा डोह मज महाल आई,
मऊ बिछाना तव तळ बाई;
करिल तुझा ध्वनि मज अंगाई,
किति शांत झोप येइल मरणीं ! ९

उडी घालण्या टाकी चरणा,
विदारुनी तों वातावरणा
हंबरडा तो आला श्रवणां—
गे आइ आइ ! जाशी त्यजुनी ! ' १०

ऐकुनि ती व्याकुळ किंकाळी
मटकन माउलि बसली खालीं;
निश्चय ढळला तो तत्कालीं,
हो हृदयाचें पाणी पाणी ! ११

घे ओढुनि पोटी वत्सांला,
मोलमजूरी करीन बाळा,
भिक्षा मागिन रे वेल्हाळा !
परि भरीन हीं तोंडें चिमणीं ! १२

लष्कर-ग्वाल्हेर, ता. २३ ऑगस्ट १९२६ ]

# १४९ ते कांत यापुढें !

[ जानि भपनि ]

कुणि कसें म्हणा, कुणि करा हवें तें आता
ते कांत यापुढें, मीहि तयाची कांता.
कुणि म्हणाच पापिण, म्हणाच कुलटा आतां,
तो एक जाणतो मला, माझिया नाथा. ध्रु०

कुणि म्हणा, भाळलें वृथा बाह्य रूपाला,
कुणि म्हणा, बळी मी पडलें तारुण्याला,
कुणि म्हणा, सोडिली लाज, सोडिली माया,
कुणि म्हणा, टाकिली भीति, दूषिली काया,
कुणि म्हणा, लाविला कलंक कुलशीलाला,
कुणि म्हणा, फासलें काळें चारित्र्याला,
कुणि म्हणा, टाकिला देव, टाकिली नीती,
कुणि म्हणा, लाविला हरताळचि शास्त्राला,
तो जुलूम तुमचा, आग लागुं दे त्याला !
जग रुसोच रुसले, रुसो न परि तो त्राता ! ते० १

कुणि म्हणाच, मारूं, म्हणा छळूं दोघांला,
कुणि म्हणाच लावूं आग घरादारांला,
कुणि म्हणा, पेटवूं वैरहि, साधूं दावा,
कुणि म्हणा, साधुनी संधी घालूं घाला,
घ्या हातिं पाजळुनि हवी तशी तरवार,
या पढा तुटोनी ! करा हवे ते वार !

त्या दयाघनाची करुणा चिलखत भारी,
ह्या सत्प्रीतीवर बोथटतिल तरवारी.
आकाश कोसळो, उलो पृथ्वि या काळीं,
जी गोष्ट झालि ती आतां झाली, झाली !
मज मरण येउ, हरि सुखी राख परि नाथा ! ते० २

कुणि कसेंहि समजो, करोहि छळ या काळी,
कुणि गांजो भाजो अमुचाही हरि वाली !
पति तुम्हींच निजपदिं हरी, जरी बोलविले
हे भ्रतार दुसरे तुम्हींच ना अर्पियले ?
आज्ञेविण तुमच्या हलेल का हो पान ?
मायेविण तुमच्या जगेल का हो कोण ?
तुम्हि सर्वसाक्ष, मग म्हणोच जग हें कांही,
तुम्हि 'होय' म्हणा. शास्त्राची पर्वा नाही !
मज माझें काळिज देतें देवा, ग्वाही,
निष्पाप असें मी, कुणी म्हणो हें कांहीं.
मग लाज तम्हांला दीन जनाच्या नाथा ! ते० ३

लष्कर-ग्वाल्हेर, ता. १३ सप्टेंबर १९२६.

## १५० पहा हो कसा हा कारागीर!

[ राग भैरवी ]

पहा हो कसा हा कारागीर !
थरारुनी तनू झरे नयनीं नीर. ध्रु०

कतरण ही पानिंपानि रम्य झालरीपरी
तरी करांतरीं कुठे नाहिं कातरी ! १

फुलाफुलामधें कशा छटा सुरम्य रंगल्या !
इंद्रचाप रंग हे ! करिं न कुंचल्या. २

मखमाली फुलपांखरुं सुबक हें पहा कुणी,
बुट्या पहा परांवरी, करिं न लेखनी. ३

अगाध नीलिमा वरी, रम्य गोल त्यावरी
सुनेरी रुपेरी हे खीळहि न करीं. ४

काळी ही चंद्रकळा रात्र ल्यालि, तीवरी
कशीदा रुपेरी हा, सुइ कुठे करी ? ५

गझनीचा पट भरजरि भानुच्या गवाक्षिं तो,
अधांतरीं अयंत्रची किति चकाकतो ! ६

लवव मान मानवा, वृथाभिमान सांडुनी;
अनंत रम्यता पहा ! लाज रे मनीं. ७

लष्कर-ग्वाल्हेर, ता. २० जानेवारी १९२७ ]

## १५१ वाटलें नाथ हो !

[ जाति महात्मवती ]

वाटलें नाथ हो, तुम्ही उतरतां खालीं
दे असहकारिता हांक तुम्हां ज्या कालीं. ध्रु०

हंबरडा फोडी आर्त महात्मा जेव्हां
आघात झेलिले घोर उरावर तेव्हां,
त्या यज्ञें द्रवुनी गमे धावलां देवा,
ऐकिली आर्त किंकाळी. १

वाटलें उघडलीं द्वारें तीं स्वर्गाचीं,
वाटलें धावली माउलि ती गरिबांची,
वाटलें पळालीं सकळ संकटें साचीं,
गरिबांचा आला वाली ! २

घेतली धाव हो तुम्हीं द्रौपदीसाठीं,
गरिबांस्तव धरिली तुम्हीं कांबळी काठी,
गुरगुरलां होउनि पशुहि गांजल्यापाठीं,
ती वेळ वाटलें आली. ३

परि हाय ! कोणतें पाप आडवें आलें ?
हा ! कपाळ फुटलें, संचित तें ओढवलें !
परतली माउली, स्वार्थानें अडवीलें,
आशेची माती झाली ! ४

हा दुणावला हो घोर अतां अंधार,
ह्या दिशा करिति हो भयाण हाहाकार,
जखडिती पाश हो अतां अधिक अनिवार,
हा हाय गति कशी झाली ! ५

लष्कर-ग्वाल्हेर, ता. ३१ मार्च १९२७ ]

## १५२ सहज तुझी हालचाल

[ जाति अरुण, राग भैरवी ]

सहज तुझी हालचाल मंत्रें जणुं मोहिते. ध्रु०

सहज चालणेंहि तुझें,
सहज बोलणेंहि तुझें,
सहज पाहणेंहि तुझें
मोहनि मज घालितें. १

संसृतिचा घोर भार
बघतां तूं एकवार
विलया सखि, जाय पार,
देहभान लोपतें. २

देवी, वनदेवि म्हणूं,
स्वप्न, भास काय म्हणूं ?
प्रतिभा कीं भैरवि म्हणुं
मति माझी कुंठते. ३

एकवार बघ हासुन
डळमळेल सिंहासन !
तळमळतिल मनिं सुरगण !
हास्यास्तव खास ते ४

ही अपूर्व शक्ति सगुण
झाडितसे मम अंगण,
हें माझें भाग्य बघुन
जळफळतिल देव ते ५

लश्कर-ग्वाल्हेर, ता. ३ एप्रिल १९२७ ]

## १५३ केवळ सुखराशी !

[ जाति सुखराशी, राग काफी ]

थांब जराशी !
चपलचरण सखि जाशी ? ध्रु०

मुरड परत अशी त्वरित, बघिन खचित पळ या दिव्याशीं. १
या प्रभात-करीं स्नात, मधुर गात दिसशी कमलाशी २
मधुर मधुर, नयन मधुर, मधुर पदर जणुं खळें मुखाशी. ३
मधुर चित्र, अति पवित्र ! कुठे क्षेत्र या पुढती काशी ? ४
भरुं दे मन, करित मनन, मग रेखिन सखि, या चित्राशीं. ५
पुसतिल जन, रमणि कवण ? मी म्हणेन केवळ सुखराशी ! ६

लष्कर–ग्वाल्हेर, ता. ७ एप्रिल १९२७ ]

## १५४ तृणाचें पातें

तृणाचें पातें हालतें डोलतें वातें. ध्रु०

झगा मखमली हिरवा गार,
मुकुटहि रत्नजडित छान्दार,
तुरा तयावर झपकेदार,
हलवि हृदयातें. १

यावरि तेज कसें रसरसतें;
जीवन नसांतुनी थबथबतें,
चिमणें इंद्रचाप थयथयतें.
दंवीं जइं न्हातें. २

तुम्हापरि सूर्य किरणिं या न्हाणि !
तुम्हापरि वरुण पाजि या पाणि,
तुम्हापरि पवन गाइ या गाणिं,
  बघा हें नातें. ३

मग या पायिं कसें तुडवीतां ?
खड्ग यांतलें उद्यत बघतां
भरे कांपरें स्मरतां सत्ता
  झुलवि जी यातें. ४

यांतुनि कृष्ण मुरलि वाजवितो,
वामन बलीस यांत दडवितो,
यांतुनि नारसिंह गुरगुरतो,
  भ्या रे यातें ५

लष्कर-ग्वाल्हेर, १९२७ ]

## १५५ स्त्रीहृदयरहस्य

[ जाति भूपाति ]

तो :

तुम्हि असे समजतां, गुपित न तुमचें कळलें,
परि माणुस अमुचें मनांत तुमच्या शिरलें.
लपवोनि सात खोल्यांत लाविलीं दारें,
राखिती दरारा दारीं खडे पहारे,
भरभक्कम केली त्यांत वरुनि तटबंदी.
ढुंको न आंत कीं गुंड बंड कुणि फंदी.

अनि कडेकोट हा करोनि बंदोबस्त
तुम्हि अशा भरंवशावरी घोरतां स्वस्थ.
तुम्हि सुखें निजा हो महाराज, घनघोर,
चोराच्या वाटा एक जाणतो चोर                    १०

पाडिला भेद, फितविले पहारेवाले
हे घरचे वासे फिरले, विपरित झालें.
घरभेदू, बांके कमानवाले डोळे
कुचमती खुणवितीं आंतिल सोळें ओळें.
या घरावरुनि का एकच वाट झऱ्याला ?
ते चुगल पाय परि ओढिति या मार्गाला.
कां इथेच कमरेवर घागर खळखळते ?
कां इथेच तुमचें पाउल हो अडखळतें ?
कां इथेच तुमचे कांकण हो रुणझुणतीं ?
कां इथेच तुमचे पैंजण हो झुमझुमती ?                    २०

कां इथेच तुमचा पदर असा थरथरतो ?
कां कुरळया केसावरुनि हात सरसरतो ?
कां इथेच मुरडुनि मुरडुनि बघतां मागें ?
कां इथेच बहिणिस रोजच भरतां रागें ?
जर यापरि घरचे फितूर चाकर व्हावे
तर एक धन्यानें कितीक सांभाळावें ?
जा बघा जरासें कोठे तुमचें रत्न,
मग कळेल फसले कसे सकलही यत्न.
आमुचा बिलंद्र चोर चुकेना केव्हां
किति यत्न करा, किति जपा आपुला ठेवा.                    ३०

कुचमती = खोडसाळ

उधळिला घरांतिल खडा खडा मर्दानें,
कोपरा कोपरा स्वैर हुडकिला त्यानें;
कोण हा चोर, का महाराज, सांगाल ?
इवलेंसें कोडें ? सांगा का उकलाल ?
जर म्हणाल तर हा चोर धरोनी देऊं,
परि चार पंक्तिंचा लाभ तुम्हा घरिं घेऊं !        ३६

ती :

तें हिरा काय कीं हळूच त्या चोराल,
कोंदणीं जडोनी बोटावर मग ल्याल ?
बांसरी काय कीं ओठांनीं चुंबाल,
मग सूर भरोनी उन्मादें नाचाल ?        ४०

तें शराब का कीं गटगट प्याला प्याल ?
मतवाले होउनि झिंगुनि झोले घ्याल ?
आकाश काय कीं ग्रहतारे वेधाल,
स्वार्थार्थ आपुलें भविष्य मग वर्ताल ?
तें समुद्र का कीं खुशाल गोते घ्याल,
तीं प्रवाल मोत्यें हातांनीं उकराल ?
कुणिकडे तयाचें तीर, कुठे तळ बोला,
इवलेंसें कोडें उकला, सुखांत डोला.
जें पदरीं पडतां स्वर्ग तुच्छ मानाल,
जें पदरीं पडतां अमृताला विसराल,        ५०

तें काय तुम्हांला सहजासहजीं मिळलें ?
मग काय बरळतां गुपित तुम्हांला कळलें ?

राहुं द्या पंक्तिच्या, चोरीच्या हो बाता,
तें अशा रितीनें कधी न येइल हाता.
तुम्हि काय समजलां सांगा, स्त्री-हृदयाला ?
का पोरखेळ हो मनीं मानितां त्याला ?
तुम्हि आकाशाला गवसणीहि घालाल,
स्वर्गही सुतानें हवा तरी गांठाल,
भूगोलखगोलादिकां मुठिंत आणाल,
स्त्रीहृदयाचा परि थांग न कधिं पावाल. ६०

ज्या देतों त्यावर तनमन ओवाळीतों,
ज्या देतों त्याला अपुलेपणही देतों.
किरणास्तव एका सूर्य मोल मागेल,
थेंबास्तव एका मेघ दाम सांगेल,
श्वासास्तव एका विनिमय घेइल वायू,
ज्या देतों त्या परि देतों अपुलें आयू !
कधिं कुणी ऐकिलें काय कुलवधूलाही
हृदयाचें अपुल्या मोल मागतां कांहीं ?
चालला सकलही प्रपंच या दानानें,
मांगल्य दिव्य जें तेंहि याच यज्ञानें. ७०

ब्रह्माशिवविष्णू यांहि दरारा ज्याचा
होईल दास तो मदन देउं ज्या त्याचा.
स्वार्थावर अपुल्या आधीं पाणी सोडा,
सर्वस्व होमुनी सर्वस्वच हें जोडा. ७४

लष्कर–ग्वाल्हेर, डिसेंबर १९२७ ]

# १५६ सरस्वती-स्तोत्र

[ सोरठा ]

जय जय जननी देवि ! जय जय भगवति शारदे !
नमूं तुला मी केवि ? वानूं कवण्या वाणिनें ? १
अनंतगत तूं स्फूर्ति, मूळ शक्ति, जय अंबिके !
तूं सच्चित्सुखमूर्ति, जगीं असज्जडदुःखिं या. २
पापघटीं निष्पाप, अमंगलीं मांगल्यखनि !
त्रिविध घोर भवताप, त्यांत सुधाकर शीतला. ३
मूर्त सत्य तूं देवि, असत्यमय संसारिं या
पंकीं पंकज जेवि कोळशांमधें कीं हिरा ! ४
कुरूपतामय भूमि, असौंदर्यि सौंदर्य तूं !
स्फुलिंग ज्यापरि धूमिं काष्ठगर्भगत ज्योति कीं ! ५

[ दोहा ]

एकीकृत सर्वेंद्रियीं देवि, तुला प्रणिपात !
दुरित दूर करिं माउली, ज्ञात तसें अज्ञात. ६

[ पादाकुलक ]

ध्यानावस्थित करुनि मनाला
स्थितप्रज्ञ मुनि शोधिति ज्याला,
तयांहि ज्याचा लेश कळेना,
वेदांला जो देवि, वळेना, ७

तया अ-जाला घालुनि जन्मा
कोण अकर्म्या जुंपी कर्मा ?
निराकार गे अगुण अनंता
कुणीं कोंडिलें त्या भगवंता ? ८

सगुण मूर्त त्या सांत करोनी
नाचविलें गे सलील कोणीं ?
वाल्मीकिमनीं करुनि विलासा
खेळवोनि निज बाळा व्यासा ९
कोण सोडवुनि अढळ पदाला
लोळवि त्याला तुझ्या पदाला ?
तुझ्या कटाक्षा कोण निवारी ?
आली नाचत खालीं स्वारी ! १०
महालांतुनी खोपट्यांतुनी
नगरांमधुनी कीं रानींवनिं,
रावांसंगें, रंकांसंगें,
गोपांसंगें कृषकांसंगें ११
पापी दुःखी भूवरि ओढुनि
नाचविलें त्या दुसऱ्या कोणीं ? १२

[ दोहा ]

अतर्क्य महिमा असूनिही  भूवरि तुझा निवास !
दुःखी पापी जनमनीं  सुखमय पुण्यविलास. १३

[ पादाकुलक ]

अनंत माझीं असतिल पापें,
परि हृदयस्थे, अघ तुज कांपे.
कोण अन्यथा हृदयीं पापी
मंगलमय मधु सुर आलापी ? १४
भेसुर भरल्या मनिं किंकाळ्या
त्यांतुनि रागिणि केवि निघाल्या ?
अशिव अभद्रें भरलों आई,
विटाळलिस परि त्यांहीं नाहीं. १५

अति विरूप अति कृष्ण मनीं या
पुण्य रम्यता गे कुठुनीया ?
अतिलंपट मी स्वार्थी कामी
शुभ शृंगारा गाइन का मी ? १६

पुतळा केवळ मी अनृताचा
कशी सत्यमय येइल वाचा ?
खोटी लज्जा, हसणें खोटें,
खोटी भीती, रुसणें खोटें, १७

हे मम चाळे, मर्कट-चेष्टा,
पोटासाठीं हाल-अपेष्टा !
धनिकलोचनां बघुनि रहावें,
श्वानकाकसें जीवित जावें, १८

निःस्पृहतेची केवळ खाणी
कशी निघावी निर्भय वाणी ?
हीन दीन अतिमंद असा मी
गाणीं माझीं म्हणूं कसा मी ? १९

नाहीं नाही माझी वाणी,
आइ, सरस्वति, तव हीं गाणीं ! २०

[ जाति वल्लभा ]

छलछद्ममय भूवरि न करिशी देवि, जरि संचार गे
या त्रिविध तापें दग्ध मनुजां कोण मग आधार गे ?
जगिं कोण रोधि तुझ्या प्रवाहा? वेग तव अनिवार गे,
मग सत्य-शिव-सौंदर्य यांना काय पारावार गे ? २१

[ दोहा ]

अनंतास आकळी कसा सांतेंद्रियगण सांग,
नमस्कार माझा तुला सरस्वती साष्टांग ! २२
ऊर भरे; दृष्टी झरे, फेडुं कसे उपकार ?
भास्कर करिशी काजव्या, तुझ्या दयेस न पार. २३

लष्कर-ग्वाल्हेर, ता. २० डिसेंबर १९२७ ]

## १५७ निशिदिनिं तुज हरि, ध्याइन का मी ?

[ जाति वनहरिणी, राग भैरवी ]

निशिदिनिं तुज हरि, ध्याइन का मी ? ध्रु०

विकसित कमलासम फुललें मम सुमन तुझ्या पदिं वाहिन का मी ? १
जनिं वनिं गगनीं त्रिभुवनिं एका अनेक रूपीं पाहिन का मी ? २
सुतदारा समजुनि तव सत्ता, प्रेमीं काया झिजविन का मी ? ३
अखिल कर्म या कार्यक्षेत्रीं पूजन समजुनि अर्पिन का मी ? ४
सप्तसुरीं सुरहीन लयीं तुज उन्मादीं कधिं गाइन का मी ? ५
विविध कवनिं मम अविविध रसमय लाहुनि तुज कधिं नाचिन का मी? ६
प्रेषणहेतू तव संपादुनि कृतार्थ तव पदिं येइन का मी ? ७

लष्कर-ग्वाल्हेर, ता. ४ जानेवारी १९२८ ]

## १५८ चरणिं तुझ्या मज देईं रे वास हरी !

[ जाति चरणरज, राग भैरवी ]

चरणिं तुझ्या मज देईं रे, वास हरी. ध्रु०

चरणतळीं तव कमल विराजे,
तेंच करीं मज देवा रे, कल्पवरी. १

कुणा संतती, कुणा राज्य दे,
मजला हरि, ते देईं रे, चरण परी. २

कुणा स्वर्ग दे, कुणा मुक्ति दे,
मजला परि चरणाचा रे, दास करीं. ३

मी घालीं ना संकट तुजवरि,
केवळ मज चरणाचे  रे,  रजच करीं.  ४

चिकटुनि राहिन सदा पदांला,
इतुकी मम पुरवावी  रे,  आस परी.  ५

मिरविन वैभव हें त्रैलोक्यी,
येइल तरि नृपतीला  रे,  काय सरी ?  ६

लष्कर-ग्वाल्हेर, ता ४ जानेवारी १९२८ ]

## १५९ चरण कधीं का पाहिन आई ?

[ जाति वनहरिणी, राग भैरवी ]

चरण कधीं का पाहिन आई ?  ध्रु०

त्रिभुवनजननी, मुंगीची तुज काळजि, मग का माझी नाहीं ?  १
ढळे ऊन, दिन उरला थोडा, मागमूसही घरचा नाहीं.  २
थकलें घोडें पाय न टाकी, कशि गत होइल आज अगाई ?  ३
वाट विसरलों, बिकट घाटही उभे काळसे ठायीं ठायीं.  ४
सिंह, वाघ हे चोर लुटारू टपती, आतां त्राहि त्राहि !  ५
बावरुनी मी बघें चहुंकडे, शून्य दिशा मज दिसती दाही.  ६
डोळे सदनाकडे लागले, कुणी सखा का नेइल पायीं ?  ७

लष्कर-ग्वाल्हेर, ता. ४ जानेवारी १९२८ ]

## १६० वंदन व्हावें हरि, मम जीवित

[ जाति लवंगलता, राग भैरवी ]

वंदन व्हावें हरि, मम जीवित. ध्रु०
शरीर हें अभिषेकपात्र, तें निर्मळ शुद्ध असावें. १
अभिषेकास्तव जीवन माझें पावन विमल असावें. २
कर्में सारीं फुलें पुजेचीं समजुनि कर्म करावें. ३
श्वासोच्छ्वासहि धूप पुजेचा, हें न कधीं विसरावें. ४
ज्योति जिवाची दीप पुजेचा, भावें ओवाळावें. ५
आरति व्हावी वाणी माझी, वचनीं स्तोत्र झरावें. ६
नैवेद्यास्तव नवरसभोजन, तुला ग्रास अर्पावे. ७
संपत्, संतति, मुक्ती इतरां, हरि, मज इतुकें द्यावें. ८

लष्कर-ग्वाल्हेर, ता. १२ जानेवारी १९२८]

## १६१ हरि, अर्पावें काय तुला मीं ?

[ जाति लवंगलता, राग भैरवी ]

हरि, अर्पावें काय तुला मीं ? ध्रु०
दीन दरिद्री अति मी, पूजाद्रव्य कुठुनि आणावें ? १
धूप, दीप, जळ, फूल, फळ तुझें कसें तुलाच वहावें ? २
माझें मजला कांहिंच न दिसे, मग तुज काय यजावें ? ३
रिक्तहस्त तरि कसें तुजपुढें स्वामि, उभें ठाकावे ? ४
मीपण मम मी म्हणें तेंच मी अतां अर्पितों भावें. ५
विदुराच्या त्या कण्या, शबरिचें उच्छिष्टहि सेवावें, ६
त्या त्वां माझें मीपण कडुही गोड करुनि हरि, घ्यावें. ७

लष्कर-ग्वाल्हेर, ता. १८ जानेवारी १९२८

# १६२ कलेचें हृद्गत

[ जाति पतितपावन ]

अगाध, निर्मळ, अपार, सुंदर, शांत, नील गगनीं
चंद्रसूर्यतारे तव करिती पुकार दिनरजनीं.
स्फटिकोपम या नील सरोवरिं आनंदें डुलुनी
अरुणवर्ण हीं कमळें फुलती तान तुझी भरुनी.
गगनभेदि हे गिरी पुरातन शुभ्रधवल वदनीं
तुझें अनंता, प्रवचन करिती गूढ मूक वचनीं.
कळ्यांकळ्यांना नाचवीत हा गंधवाह वाही,
अनुपम मधुमय अनिर्वाच्य तव वार्ता जगिं वाही. ८

लेवुनि भरजरि झगा अरुण हा सुवर्ण वर्णाहीं
नभःपटीं तव चित्रलेखनीं गुंगुनिया जाई.
मोहिनिमंत्रा शिंपित येई श्यामल ही संध्या,
तुझ्या सुखस्वप्नांत गुंगवी जगा जगद्वंद्या !
लेउनि काजळि शालू येई गभीर ही रजनी,
अरे अनंता, मोहनि घाली गान तुझें म्हणुनी !
तूं सततोद्यतखड्ग अनंता, दुष्टां दंडाया
गर्जुनि गर्जुनि सागर सांगे रोषें बधिरां या. १६

अकांडतांडव करुनि खड्गसम जळत्या जिव्हांनीं
दांत रगडुनी तडित् कडकडे रुद्ररूपकथनीं.
रूपांरूपांमधुनि निघे हा अनहत तव नाद,
भाग्यहीन मी बधिर पडेना कानीं पडसाद.
रूपीं रूपीं तुझी अनंता, विभूति विस्तरली,
डोळे फुटले माझे ! सारी सृष्टि तमें भरली.
प्रफुल्लहृदया, अमृतसागरा, माझ्या कविराया,
मंत्रोदकिं परिमार्जुनि उघडीं कर्णा नयनां या. २४

[ लष्कर-ग्वाल्हेर, ता ८ ऑगस्ट १९२२ ]

# १६३ म्हाताऱ्या नवरदेवाची तक्रार

[ जाति पादाकुलक, राग पूर्वी ]

गहनविपिनिं करि गौरि घोर तप,
जरठास्तव नवयुवती करि जप ! ध्रु०

नीरस हर तो भणंग जोगी,
रसें रसरसे ही सुखभोगी;
फटिंग तो, ही तपे वियोगीं;
स्मरारि तो, ही स्मरसुखलोलुप. १

उपवर मुलिंनो, कित्ता गिरवा,
त्यजुनि फाकडा धटिंग हिरवा
फटिंग जोगी पिकला भगवा
वरा ! पुजा हर सफल गतत्रप. २

नशीब अमुचें जरठ वरांचें !
सोंगाड्या मुलि, ढोंग जपाचें !
लचके रुचती या तरुणांचे;
नातरि वरितों मुली सपासप. ३

आजोबा या म्हणति अम्हांला;
ठार करिति उरिं खुपसुनि भाला,
गौरि असें का म्हणे हराला ?
पाहुनि घेइल शंभु भवाधिप. ४

लश्कर-ग्वाल्हेर, ऑगस्ट १९२९ ( 1 ) ]

## १६४ जय वाल्मीकि !

[ जाति पादाकुलक ]

जय वाल्मीकि ! तुज हें तर्पण;
तव चरणीं सर्वस्व समर्पण ! ध्रु०

त्रिभुवनपति जो राम रघूत्तम,
सुरनरकिन्नरनुत पुरुषोत्तम,
हे वाङ्मयतरुकोकिल, निरुपम
त्या रामा तूं देशि रामपण. १

विधिहि शकेना द्याया कवणा
तीं दश वदनें देशि रावणा;
राम यमाधिप दे ज्या मरणा,
अमर करिशि तो सुरारि रावण. २

अधनांचें धन, अबलांचें बल,
अमंगलांचें श्रेयोमंगल,
जन्मांधांचे लोचन निर्मल,
दुर्वृत्तांचें दुरितनिवारण. ३

हात दिला तूं किति बुडत्यांना !
धीर दिला किति तूं व्यथितांना !
उरीं लाविलें किति पतितांना !
जय भवनाविक पतितोद्धारण ! ४

कालाच्या अति कराल दाढा
सकल वस्तुंचा करिति चुराडा,
कालशिरिं झडे तुझा चौघडा,
जय मृत्युंजय ! जय कविभूषण ! ५

लष्कर-ग्वाल्हेर, ता. ६ सप्टेंबर १९२९ ]

## १६५ साम्राज्यवादी

[ जाति त्रिभुवन, राग धनाश्री ]

फस्त करी भक्षुनिया सर्व धान्यराशिं हा,
हडुकास्तव वसवस ये, झुंजे इतरांशिं हा. ध्रु०

त्रिभुवनही या न पुरे, खादाडचि हा गिधाड,
कळवळतो वखवखला बापुडा उपाशि हा. १

गिळि अपुलें, गिळि परकें; खाच ती तरी भरे न,
शांतीच्या वर बाता, बोंबले अधाशि हा. २

परमुलुखा जाळि, पोळि; लाखांचे खून करी,
न्यायाचा वर तोरा, चोर चढवि फाशिं हा. ३

शस्त्रतटीं तोफ घोर फडशा करि बंधूंचा !
विश्वबंधुता खरि ही रक्षी दुबळ्यांशि हा ! ४

मातित राबोनि गरिब धान्याचे रचिति ढीग,
भक्षुनि रक्षक निरिच्छ बोका संन्यासि हा ! ५

धन्य तुझी धर्मात्म्या ! पसरे हा जगद्व्याळ !
चिरडी हा पायिं दीन, उन्नति करि खाशि हा ! ६

लष्कर-ग्वाल्हेर, ता ८ सप्टेंबर १९२९ ]

## १६६ कोणिकडे जादुगरिणि ?

[ जाति परिलीना, राग भैरवी ]

कोणिकडे जादुगरिणि; आज सांग धावा ? ध्रु०
दडपित कां तरुणमनें चरण हा पडावा ?
आज खैर मज न दिसे बघुनि तुझ्या भावा,
ही गहिरी नजर जहर,
कवणावरि करिल कहर ?
तरुण कवण लक्षिशि जो चरणिं लोळवावा ? १

लष्कर-ग्वाल्हेर, सप्टेंबर १९२९ ]

## १६७ अर्जी ऐका हो सरकार !

[ जाति हरिभगिनी, राग बिहाग ]

अर्जी ऐका हो सरकार,
अंदाधुंद कसा दरबार ? ध्रु०
फुंकुनि ठेविति पाय तयांवर कां दुःखाचा हो भडिमार ? १
चोर मिरवती गजगंडस्थलिं हा न्यायाचा का व्यवहार ? २
तुमचा कानू अढळ जागरुक; कां पापांची मग ललकार ? ३
तुमच्या वाटा तुम्हास ठाउक, इतरां लागे अंत न पार ! ४

लष्कर ग्वाल्हेर, सप्टेंबर १९२९ ]

## १६८ कशि लाज सोडिशी सारी ?

[ राग काफी ]

कशि लाज सोडिशी सारी रे सारी ?
मी रविहुनि वारी
तें वदशि मुरारी
कशि लाज सोडिशी सारी रे सारी ?
चेष्टा करिशी, दहांत हसशी,
रीत तुझी ही न्यारी रे न्यारी !
कशि लाज सोडिशी सारी रे सारी ?

लष्कर-ग्वाल्हेर, सप्टेंबर १९२९ ]
वारी = दूर ठेवितें.

## १६९ भोग कुणा सुटले ?

[ जाति अंजनी, राग असावरी ]

भोग कुणा सुटले जगिं या ? ध्रु०

सुखदुःखांची अलक्ष्य भेसळ,
द्वंद्वमूल संसार अमंगल !
येथे कसलें सुख तें केवल ?
मुनिमन या विटलें. १

दास जयांचा झाला श्रीहरि
तयां पांडवां सुटली नगरी,
दास बनुनि राबति परक्या घरिं,
मनोदुर्ग फुटले. २

श्रीरामा वनवास भूवरी,
त्यावरि वैरी हरी नोवरी,
दीन वनोवनिं तो वणवण करि,
सुख त्याला कुठलें ? ३

रे रे माझ्या विषण्ण हृदया,
दुःखा दे मुख धीर धरुनिया !
स्मरुनि हरी वागेल जो तया
भोग असुनि मिटले ! ४

लष्कर-ग्वाल्हेर, १९२९ ]

## १७० सखि आली !

[ मारवा एकताल ]

अरुणनयन
अरुणचरण
अरुणवसन
सखि आली,
ही अरुणोदयकाली !
कांति फांकली सखिच्या तनुवर
उजळे मम घर
अनुपम सुंदर,
हास्य विकसलें गाली.
सखि आली. १

डोह विमल,
पुण्य सलिल
स्फटिकोज्ज्वल
द्युतिशाली
प्रसन्न मोहनि घाली.
प्रसन्न सखिचे प्रस्फुट अवयव,
यौवनवैभव
फुललें अभिनव,
अरुणकिरणीं सखि न्हाली,
सखि आली ! २

लष्कर-ग्वाल्हेर, १९२९ ]

## १७१ झांशीवाली

[ जाति महाकाली ]

रे हिंदबांधवा, थांब या स्थळी अश्रु दोन ढाळी,
ती पराक्रमाची ज्योत मावळे इथे झांशिवाली. ध्रु०

तांबेकुलवीरश्री ती
नेवाळकरांची कीर्ती,
हिंदभूध्वजा जणु जळती,
मर्दानी राणी लक्ष्मीबाई मूर्त महाकाली ! १

घोड्यावर खंद्या स्वार,
हातांत नंगि तर्वार,
खणखणा करित ती वार
गोऱ्यांची कोंडी फोडित पाडित वीर इथे आली. २

कडकडा कडाडे बिजली,
शत्रूचीं लश्करें थिजलीं,
मग कीर्तिरूप ती उरली,
ती हिंदभूमिच्या पराक्रमाची इतिश्रीच झाली ! ३

मिळतील इथे शाहीर,
लववितील माना वीर,
तरु, झरे ढाळितिल नीर,
ह्या दगडां फुटतिल जिभा कथाया कथा सकळ काळीं ! ४

लष्कर-ग्वाल्हेर, १९२९ ]

# १७२ रिकामे मधुघट

[ जाति नववधू, राग बागेश्री ]

मधु मागशि माझ्या सख्या, परी
मधुघटाचि रिकामे पडति घरीं ! ध्रु०

आजवरी कमळाच्या द्रोणीं
मधू पाजिला तुला भरोनी,
सेवा ही पूर्विची स्मरोनी,
करिं रोष न सखया, दया करीं. १

नैवेद्याची एकच वाटी
अतां दुधाची माझ्या गांठीं;
देवपुजेस्तव ही कोरांटी
बाळगीं अंगणीं कशी तरी. २

तरुण-तरुणिंची सलज्ज कुजबुज,
वृक्षझऱ्यांचें गूढ मधुर गुज,
संसाराचें मर्म हवें तुज,
मधु पिळण्या परि रे बळ न करीं ! ३

ढळला रे ढळला दिन सखया !
संध्याछाया भिवविति हृदया,
अतां मधूचें नांव कासया ?
लागले नेत्र रे पैलतिरीं. ४

लष्कर-ग्वाल्हेर, १९३३ ]

# १७३ हांक

[ जाति भूपदंड, राग असावरी ]

तूं ये गे, ये गे, ये, ये सजणे !
तनमनधनजनसदन पाहती वाट तुझी गे सखये ! ध्रु०

विशाल माझें मंदिर अभिनव,
गजांतलक्ष्मी, अपार वैभव,
जों न रुणझुणे तव कंकणरव,
करविहीन जणुं वलयें ! १

सत्याचे पोकळ डोलारे,
सौंदर्याचे हे देव्हारे,
देवाविण देउळ जणुं सारें !
करिं आरोहण सदये ! २

फळें, फुलें, रवि, शशि, नक्षत्रें,
तुजविण सारीं असार चित्रें !
येइं मंगले, शुभे पवित्रे,
प्राण वितरिं शुभ समयें. ३

ये ये तूं यक्षाची कांडी,
स्पर्शुनि जगिं या जीवन सांडी,
पाप अमंगल तिमिरा काढीं,
पसर कांति निज उदयें. ४

तूं मंगल, तूं सुख ! गे तुजविण
भुताटकीची माया त्रिभुवन,
खाया धावे मज आ वासुन,
येइ, मिळूं दे हृदयें ! ५

लष्कर-ग्वाल्हेर, ता. ३१ ऑगस्ट १९३३ ]

# १७४ स्त्रीला नमस्कार हा !

[ वृत्त शार्दूलविक्रीडित ]

भोळा शंभु दिसे वरी, परि महाकोपी बळी तापसी,
ज्याची नौबत दणूदणे त्रिभुवनीं, जाळी स्मरा साहसी,
त्याला भिल्लिण नाचवी बहुपरी वृद्धापकाळीं अहा !
आतां कोण म्हणे स्त्रियेस अबला ? स्त्रीला नमस्कार हा ! १

ब्रह्मांडें रचितां कुतूहल जिरे, ये शीण गात्रांप्रत,
वेदाभ्यास करोनि बुद्धि जड हो, ब्रह्मा जरापीडित;
डोळे तो मिचकावि पाहुनि सुता, चाळे करी, ही स्पृहा !
आतां कोण म्हणे स्त्रियेस अबला ? स्त्रीला नमस्कार हा ! २

विष्णु क्षीरसमुद्रशेषशयना सोडी, त्यजी इंदिरा
लत्ता स्वर्गविलासिं दे, तळमळे सेवोनि दुःखी धरा;
वृंदेकारण तो झुरोनि तुळशीखालीं पडे ईश हा !
आतां कोण म्हणे स्त्रियेस अबला ? स्त्रीला नमस्कार हा ! ३

वाटे स्त्रीच सुधा, हलाहलहि ती, ती वारुणी दारुण,
दृष्टिक्षेप पुरे, उठे मृत, मरे प्राणी, पडे झिंगुन !
ब्रह्माविष्णुमहेश लोळति पदीं, स्त्रीचा दरारा पहा !
आतां कोण म्हणे स्त्रियेस अबला ? स्त्रीला नमस्कार हा ! ४

लष्कर-ग्वाल्हेर, नोव्हेंबर १९३३ ]

## १७५ भैरव

[ जाति भूपदंड, राग भैरव ]

नटवर तो हर ध्यावा,
प्रभातकाळीं उठोनि आधीं त्रिभुवनजनक नमावा ध्रु०

जगद्रंगीं ज्यातें नटवाया
अघटितघटनासमर्थ माया
नटी नाचवी ज्याची जाया;
भावें भैरव गावा. १

अरुणरूपधर सूत्रधार जो
घालुनि कंठीं रत्नहार जो
पीतांबरधर करि विहार जो
उधळि गुलाल, भजावा, २

सूर्यचंद्र अगणित नक्षत्रें,
गिरि, सागर, तरु, असंख्य पात्रें
सजुनि नटे जो लीलामात्रें,
शिवसत्याचा ठावा. ३

अपूर्व सुंदर नाटक हें जग,
मांगल्याचें आगर सौभग,
कसें म्हणावें दुःखमूल मग ?
जयजयकार करावा ! ४

लष्कर-ग्वाल्हेर, ता. १५ डिसेंबर १९३३ ]

## १७६ एक आकांक्षा

[ जाति शुभवदना, राग देसकार ]

हळु हळु हळु वर वर नभिं मेघशकल चाले,
नील जलीं नाव काय मूक शांत हाले? ध्रु०

अरुण, जांभळी, सुनेरि
लखलख करि कड रुपेरि,
सायंतनिं हें पाहुनि नयन भरुनि आले! १

काय रम्य हें विमान
ज्यांत बसुनि पुण्यवान
वरि वरि वरि अपुल्या घरिं जावया निघाले! २

पुण्यात्मे भवयात्रा
साधुनि तर्पुनि गात्रां
गांठति घर पाहुनि वर व्याकुळ मन झालें. ३

काय कधीं मजसमान
पुरुषास्तव ये विमान
हें वाटुनि उर दाटुनि हृदय भारि झालें! ४

लष्कर-ग्वाल्हेर, ता. ११ जानेवारी १९३४ ]

# १७७ वधूवरयोः शुभं भवतु !

[ जाति सुरमंदिर, भैरवी झपताल ]

योग हा वधुवरां
हो सुमंगल खरा !
हो सुमंगल खरा !
हो सुमंगल खरा ! ध्रु०

आज हृद्‌यांतुनी
सकल पट भेदुनी
आन्तरिक ये ध्वनी
" हो सुमंगल खरा ! " १

जीव ही मम सुता
रूपगुणसंयुता
तुल्यवरसंगता
श्री नवी ये घरा. २

याच घटिपासुनी
पुण्य परिवर्तनीं
रम्य नवजीवनीं
प्रीति येवो भरा. ३

नवनव्या कामना,
नवनव्या कल्पना,
नवनव्या भावना
वेढितिल अंतरा. ४

जीवनक्रांतिचा
दिवस नव कांतिचा,
विभव-सुख-शांतिचा
होउ हा आसरा. ५

रम्य संसारतरु
शीत छाया धरू,
मधु फुलांहीं भरू
ओटि मंगलकरा. ६

आयुरारोग्य तें,
सत्कुला योग्य तें,
पुण्य चिरभोग्य तें
सकल येवो करा. ७

झडति किति चौघडे,
घुमुनि नौबत झडे,
दुमदुमुनि चहुंकडे
हर्ष आला पुरा. ८

लष्कर-ग्वाल्हेर, फेब्रुवारी १९३४ ]

## १७८ अवमानिता

[ जाति भूपदंड, राग तोडी ]

कां मज आज तुम्हीं बोलविलें ?
बहु दिवसांनीं स्मरण जाहलें,
आज कसें हें घडलें ? ध्रु०

बालपणांतिल बालिश वर्तन,
तरुणपणांतिल तें भ्रूनर्तन,
स्वप्निं आज कां दिसलें ? १

चित्रगुप्त लिहि वह्या आपुल्या,
वरी धुळीच्या राशि सांचल्या,
त्यांस कुणीं हालविलें ? २

हृदयपटावरि सुंदर चित्रें
आपण रचिलीं पूर्वि पवित्रें,
बघुनि आजवर जगलें. ३

स्मराल कधिं तरि या आशेवरि
उदासवाणे दिवस कसे तरि
आजवरी घालविले. ४

परि समजूं का हा भाग्योदय,
भाग्यास्तचि कीं पूर्ण तमोमय ?
हृदय तरल खळबळलें ! ५

सोक्षमोक्ष घेइन करुनी मी,
जगेन कीं जाइन मरुनी मी,
कांपत येण्या सजलें ! ६

लष्कर-ग्वाल्हेर, ता. १५ मे १९३४ ]

## १७९ कां उभी तूं तरी ?

[ भैरव, झपताल ]

दिनांतीं श्रमांतीं  किती गोड शांती !
सकलहि घरिं जाती  श्रमोनी दिनांतीं. ध्रु०

एक नच वासरूं,
नाहिं चिटपांखरूं,
गजबजति गृह-तरू
तेथ सुखें गाती. १

क्रमुनि पथ आपुला
निकट अस्ताचला
पांथ रवि चालला
सावरूनि कांती. २

ओस पडल्या दिशा
ये भराभर निशा;
निघति छाया कशा
गुहांतुनि घरांतीं. ३

चकित हरिणीपरी
हरिणनयने, परी
कां उभी तूं तरी
क्षेत्रतटप्रांतीं ? ४

कोण ये या स्थळीं ?
चाल सदना मुली,
पेटल्या पुरिं चुली
पाहि सांजवाती. ५

लेक, लेकी, सुना,
मिळति वडिलां जनां;
काय तुझिया मना
पाडि इथे भ्रांती ? ६

लष्कर-ग्वाल्हेर, ता. ७ जून १९३४ ]

## १८० फसवणूक

[ जाति लवंगलता, राग पिलू ]

उगिच कशाला पाहशि लावुनि आस ? ध्रु०

जुई बहरली, कळी उमलली, परि न मिळे तुज वास. १

भरली कैरी सरस सुनेरी ये न तुझ्या हातांस. २

रे, लुसलुसलें पांखरुं फसलें दुसऱ्याच्या जाळयास. ३
देवच रुसला, सौदा फसला, गळे ओठिंचा घास. ४
अभागि पांथा, चुकशी पंथा, लाग अतां मार्गास. ५
केविलवाणें तोंड दिवाणें माझ्या रुते जिवास. ६
जा जा ! दुसरी पहा मंजरी, सजव तुझ्या हृदयास. ७

लष्कर-ग्वाल्हेर, ता. २० ऑक्टोबर १९३४ ]

## १८१ अहो धन्वंतरी !

[ जाति समुदितमदना ]

" तुम्हीं न यावें हो धन्वंतरि, जरी तापलें ज्वरें;
नका शिवूं नाडीस, तुम्हांला काय न दुसरीं घरें ? "
" तुम्हां पाहिजे शेज फुलांची "—" पुरे ज्ञान हो पुरे !
आग अधिक होइल अंगाची ! खरेंच औषध खरें ! "
"मग वाळयाची उटी कपाळीं लावूं शीतळ करें ? "
" शूल दुणावे, हात न लावा. भरे मला कांपरें ! "
" तुमच्या अंगा हवें चांदणें, नेउं धरुनि का त्वरें ? "
" नको नको हो ! पडेन, वादळिं कशी वेल सावरे ? "
" तुम्हांस शीतोपलादि चूर्णें वाटेलच हो बरें;
काय, घालुं मी मुखीं मधांतुनि ? " " कधीं सोंग हें सरें ?
तो शिवेल नाडिस करग्रहण ज्या हवें,
स्पर्शील अंग जो देइल जीवन नवें;
त्या निदान हो ज्या मनिंचें गुज जाणवे.
प्रणयपंडिता, तुम्हां आणखी काय सांगणें बरें ? "
रसिका, सांग कसली मात्रा मिळतां रोग न उरे ?

लष्कर-ग्वाल्हेर, ता. २३ डिसेंबर १९३४ ]

## १८२ माळीण

[ जाति लवंगलता, राग काफी ]

“ तुला न देइन माला,
जा जा चाल घराला. ध्रु०

“ मोठा भोळा, घालिशि डोळा, हाणिन हा पाचोळा,
काय गिऱ्हाइक बाइ फुलांचा ! ” “ पूस तुझ्या डोळयांला ! ” १

“ हा फुललेला गुलाब-बेला ! तुला न देइन झेला.
कसा गिऱ्हाइक बाइ ! ” “ पूस त्या गालांला, दांतांला ! ” २

“ तुला न देईं मोहरेलाही ! दुज्यास परि पैशाला !
कसा गिऱ्हाइक बाइ फुलांचा ! ” “ पूस तुझ्या जीवाला ! ” ३

“ फुलें पाहशी, सौदा करिशी, घेशिल बघ कांटयाला ! ”
“ रुतुं दे कांटे चलाख माळिणि, खुपुं दे ग कालिज्याला ! ” ४

लष्कर-ग्वाल्हेर, ता. २८ जानेवारी १९३५ ]

## १८३ गति कशी व्हावी ?

[ वृत्त शार्दूलविक्रीडित ]

माझे बांधुनि हातपाय कुजक्या एका फळीला बळें
दर्यामाजि अफाट दुस्तर मला हे नाथ, कां सोडिलें ?
‘ शिंतोडा पदरावरी जरि उडे जाई तळाला फळी ’
ऐशी ही धमकी वरी, गति कशी व्हावी तुफानीं जळीं ?

लष्कर-ग्वाल्हेर, ता. २८ जानेवारी १९३५ ]

## १८४ स्फुट ओव्या

झोपाळ्यावर बसूं, सारख्या साड्या नेसूं,
फांदीच्या साळुंक्या ग सारख्या बहिणी दिसूं. १
* * *

मोहरा आला आंबा, फळा आली ग चमेली,
माझ्या राघ्व्यासाठीं तुझी मैना ग तान्हेली. २
* * *

शेजारीण बाई, सडा घाला अंगणांत,
रावा, मैना दोघां जेवूं घालूं दूधभात. ३
* * *

माझ्या दारावरी कोण आले दोघेजण ?
भाऊबीजे आले भाऊ रामलक्षुमण. ४
* * *

शेजारीण बाई, तुझा गुलाब कांट्याचा,
माझ्या जुईला ग नाहीं बाई झेपायाचा ! ५
* * *

थोरल्या विहिणीबाई, नका सांगूं हो गाऱ्हाणीं;
कोण पुसे तुम्हां नांदतां राजाराणी ? ६
* * *

श्रीमंतीण बाई, तुझा शृंगार कांट्याचा,
मानितें गरीबीचा संसार झपाट्याचा. ७
* * *

तुझ्या गळा बाई, सोन्याचं ग लोढणं,
पोतेचं गरीबीचं मंगलसूत्र माझं लेणं. ८
* * *

वेल फोफावली, तिला ये ना बाई फळ;
दारीं हत्ती-घोडे, घरीं नाहीं बाई मूल ! ९
* * *

हत्ती-घोडे दारीं,   चोपदाराच्या ललकारी,
नाहीं मंगलवाद्यं,   तोरण नाहीं दारीं !   १०

*   *   *

शितं तिथं भुतं,   घरीं एक गजबज,
बोबडा बोल नाहीं,   नाहीं कानीं कुजबूज.   ११

*   *   *

माझ्या दारावरी   गलबला ग कशाचा ?
आतां कीं वेणूसाठीं   तंटा चालला राजांचा.   १२

लष्कर-ग्वाल्हेर, ता. २३ फेब्रुवारी १९३५ ]

## १८५ जोगी

[ जाति अभिमन्यु, राग देस ]

घेतला जोग,
जोग धरुनि भगवें   कशाला मग तुज गांव हवें ?   १
याच तरुखालीं
खालिं, कुसापाशीं   ठाण कां देशि ? कवणपाशीं ?   २
टाकुनी दुसरीं,
दुसरीं सकळ तळीं   येशि कां स्नाना याच जळीं ?   ३
स्नानिं का ‘ हरहर !
हरहर !’ गर्जोनी   पाहशी वर तूं चोरोनी ?   ४
खुडोनी कमळें
कमळें या कांठीं   टाकिशी सांग कुणासाठीं ?   ५

याच जळिं कां तूं,
तूं धूशी छाटी, वाळवित बसशी कां कांठीं ? ६

त्यजुनि देवांचीं,
देवांचीं गाणीं रमे कां रतिगीतीं वाणी ? ७

गाशि तूं विरही,
विरही कृष्णाचीं गायनें रुक्मिणिहरणाचीं. ८

सुभद्राहरणीं
हरणीं तुज गोडी भक्तिचीं भजनें का थोडीं ? ९

खिडकिवर टाकिशि,
टाकिशि कां डोळा ? प्राण कां होति तुझे गोळा ? १०

लष्कर- ग्वाल्हेर, ता. २४ फेब्रुवारी १९३५ ]

## १८६ माहेरची आठवण

[ ओवी ]

चंद्राच्या गालावरी
देव लावी गालबोट;
मिरवितें आई,
माझ्या गालीं तुझे ओठ. १

जडली हिरकणी
सोन्याच्या ग कोंदणीं;
मोला झाली दुणी
आई, तुझी ग करणी ! २

सासू सासऱ्याचं
घर दिरां-नणंदांचं;
पृथ्वीच्या मोलाचं ग
लेणं दिलं भ्रताराचं. ३

मायेची माझ्या माय,
जोडिली तूं ग जोडी;
सुरीं सूर लावूं,
लाविली तूं ग गोडी. ४

सूर-सूरीं, झालं
संसाराचं गोड गीत;
मायेची माझ्या माय,
तुवां लाविली ग रीत. ५

फळा आली भाळीं
तीट मायेच्या हाताची
भरलं घर माय,
किलबिल पांखरांची. ६

भरलं घर माय,
अंगण झालं थोडं;
दुडुदुडू धावे
लेकराचें खेळघोडं. ७

राज्यगादीवरी
काढीं तुझ्या आठवणी;
फळां आली माय,
मायेची पाठवणी. ८

उचकी लागे माय, कांहीं केल्यानं राहीना;
काढिशी आठवणी ? सुखी माय, तुझी मैना; ९

लष्कर-ग्वाल्हेर, ता. २५ फेब्रुवारी १९३५ ]

## १८७ माझ्या अंगणांत

[ ओवी ]

माझ्या अंगणांत
चिमण्यांची किलबिल;
हळू पाय टाका,
भुर्र उडूनी जातील. १

बहिणीशीं नको
वांकडा लावूं बोल;
आतां कीं भाऊराया,
सांभाळीं तुझा तोल. २

वांकडा बोल तुझा
तुझें काळीज कापील;
सासरीं गेल्यावरी
तुझ्या दारीं न येतील. ३

भ्रताराच्या राज्यीं
उणें ठेवीना रे देव;
बहिणीच्या मनीं
चोळीची आशा ठेव ! ४

लष्कर-ग्वाल्हेर, ता २५ फेब्रुवारी १९३५ ]

# १८८ लाजूं नको ताई !

[ ओवी ]

“ माझ्या दारावरनं  कोण गेलं झपाट्याचं ? ”
“ लाजूं नको ताई,  तें ग वारं सोसाट्याचं ”  १

“ माझ्या दारावरी  घोड्याची वाजे टाप ”
“ लाजूं नको ताई  डफावरी वाजे थाप. ”  २

“ माझ्या दारावरी  हळू बोले कुणी तरी ”
“ लाजूं नको ताई,  कुणी वाजवी बासरी.  ३

लाजूं नको ताई,  ढुंकूं नको बारीतूनीं,
खंत कोणाची ग ?  आलं कोणाचं ग कोणी ?  ४

पाहुणा आला दारीं  कुणी तरी ग रात्रींचा,
पाही बहिणाताई,  का ग तुझ्या ओळखीचा ?  ५

वेणीफणी करीं,  घाईघाई घालीं साज;
कोणी कोणाचं ग  सांजचं आलं आज ?  ६

लाजूं नको ताई,  पाय धुण्या आणीं पाणी;
चांदीचे प्याले आणीं  चांदीची चहादाणी. ”  ७

लष्कर-ग्वाल्हेर, ता. २५ फेब्रुवारी १९३५ ]

## १८९ वाटेच्या वाटसरा !

[ जाति मुद्रिका ]

या, या हो, या हो रसिका, येथे लपा,
जो शब्द बाळपणिं गेला  त्याचा हा तोटानफा.
ती काय बोलते ऐका चोरुनि जरा,
त्या तिऱ्हाईत पांथस्था  जो आला तीच्या घरा.

[ ओवी ]

" जिवाचे लागेबांधे  ठाव नाहीं सख्या भावा;
वाटेच्या मुशाफिरा,  जाई जाई दुज्या गांवा. १

जन्मोजन्मींचं तें  तळा गेलं आतां पाप;
गुहेच्या अंधारांत  लोपलं रे आपोआप. २

चाळवोनी आतां  ओढिशी का वरवर ?
वाटेच्या वाटसरा,  दृष्ट जादूची आवर. ३

बिळांत झोपे नाग,  नको घालूं रे फुंकर;
चाळवून त्याला  नको ओढूं वरवर ४

असावधपणीं  शब्द गेला कधीं काळीं;
भरल्या संसारांत  नको फोडूं रे किंकाळी ! ५

झालं गेलं आतां  नाहीं त्याचा मागमूस;
माझे आई गंगे,  कां रे उकरिशी कूस ? ६

सांज झाली तरी  जाई जाई दुज्या गांवा;
वाटेच्या वाटसरा,  नको साधूं पुरा दावा. ७

कालवूं विष नको  भरलेल्या आतां ताटी;
झालं गेलं त्याची  कशासाठीं आटाआटी ? ८

जन्मजन्मींच्या रे   तुझ्या ऋणानुबंधाची
गोष्ट लांब गेली,   वाट पुढील जन्माची.   ९

पुढील जन्मीं आतां   तुझा हिशेब करीन;
गहाण जीव माझा,   मी या जन्मीं पराधीन."   १०

लष्कर-ग्वाल्हेर, ता. २८ फेब्रुवारी १९३५ ]

## १९० आज फिरुनि कां दारिं ?

[ जाति सुश्लिलता, राग सोहनी ]

आज फिरुनि कां दारिं उगवलां ?
शपथ घेउनी गेलां त्या दिनिं केलि न कां दुजि नारि ? ध्रु०

स्वचित वाटलें याल कधींहि न,
भाजुनि पोळुनि गेलें हें मन,
ओस जाहलें सारें त्रिभुवन,
जिती मरें संसारिं.   १

मन गुंतविण्या कांहिं न उरलें,
दिवस सुखाचे सारे सरले
असें समजुनी मना मारिलें,
आस जाळिली सारि.   २

झालें ते दिनिं मी संन्यासिनि
आशा–तृष्णा सकल जाळुनी,
राख तयांची उरीं बाळगुनि
हिंडें मी व्यवहारि. ३

काय फायदा आतां येउनि ?
हवें त्यापरी मोल चढवुनी
शोधा दुसरी सुंदर रमणी,
दुनियेच्या बाजारिं. ४

"त्या राखेचा प्रसाद देउनि
कृतार्थ करि मज अंगा फासुनि,
तव नामाची स्मरणी धरुनी
सफल गणिन ही वारि. ५

जर आशेचा उरला अंकुर
दडला कोठे राखेमधिं तर
जीवन दे त्या, डुलुं दे तरुवर,
नयनिं भरे कां वारि ?" ६

लष्कर-ग्वाल्हेर, ता. ५ मार्च १९३५ ]

## १९१ ये पहाटचा तारा गगनीं

[ जाति नववधू, राग सोहनी ]

ये पहाटचा तारा गगनीं,
कुणिकडे निघशि लगबग करुनी ? ध्रु०

तार स्वरिं आरवे कोंबडा,
सुरू न झाला अजुनि चौघडा,
काक एक जागला निसुरडा,
खाकारि कुठे तरि वृद्ध कुणी. १

अजुनि रात्र ही देइ जांभया,
घरोघरीं मिणमिणती समया;
निघशि झुंजुमुंजू या समया,
वाटे न भीति का तुज तरुणी ? २

शुक्राची चांदणि झळके वरि,
भूवरिची चांदणि तूं कुमरी !
तुझी न येई तिला सर परी,
लागेल दृष्ट तुज गे रमणी. ३

"वेळ घालवूं नका हटकुनी
गांठायाची मज पुष्करणी,
वनीं कार्तिकस्नान करोनी
सूर्योदयिं येणें मज फिरुनी." ४

कुणी सोबतिण नाहिं बरोबर,
वेळ चोर-जारांची ही तर;
मिळेल का त्या वनीं खरोखर
या समयिं सोबती तुला कुणी ? ५

लष्कर-ग्वाल्हेर, ता. ७ मार्च १९३५]

निसुरडा = निर्लज्ज, नफ्फट.

## १९२ प्रिया हेंच सर्वस्व !

[ जाति लवंगलता ]

दुनियेच्या भरल्या बाजारीं तुम्हिच करा जा सौदा;
मला फकीरा पुरे प्रिया ही, नको गजाचा हौदा.
वेळ न खणण्या भूतकाळ, जा उकरा दौलत पुरली;
मला आळशा पुरे प्रिया आणि ओठावरली मुरली.
वाट भविष्यीं पुसत जा ग्रहां चाचपडत अंधारीं;
मूर्त सुखचि ही प्रिया सोडुनी अमूर्त कोण निहारी ?
तुम्हीच मिळवा स्वर्गि अमरपद हवि अर्पुनिया देवा;
स्पर्शें सखिच्या अमर जाहलों, मला न तुमचा हेवा.
भरा भराऱ्या कल्पनेचिया अजब अशा मुलखांत,
मूर्त कला लाभतां कशाला वाऱ्यावरिल वरात ?
जा कुठेहि जगिं या कांहिं न् कांहीं उणें,
तिळ एक न जागा कोठें न्यूनाविणें,
मग केविलवाणें काय वृथा हिंडणें ?
एक सखीच्या हृदयिं पूर्णता मज लाभे संसारीं—
कशास वणवण करूं वृथा मी हिंडुनि दारोदारीं ?

लष्कर-ग्वाल्हेर, ता. ७ मार्च १९३५]

## १९३ कुणि असेल ग !

[ जाति अक्रूर ]

कुणि असेल ग   असेल बोबडकांदा
खुदुखुदू हसत एखादा. १

कुणि असेल ग,   असेल, मैनाराणी !
कुठ गात पोपटावाणी. २

कुणि असेल ग   असेल चिमणा रावा
कुठ तरी कुठिल तरि गावा. ३

कुणि असेल ग,   असेल त्या शेतांत
खुसुखुसू ग हुरडा खात. ४

कुणि असेल ग,   असेल लाडिक माझा
स्वप्नांतिल तुझिया राजा. ५

नदिपल्याड ग,   पल्याड त्या रानाच्या
कुणि असेल ग भाग्याचा. ६

कुणि येईल ग,   येइल ग न्यायाला
या नाजुकशा कमळाला. ७

लष्कर-ग्वाल्हेर, ता. १३ मार्च १९३५ ]

# १९४ दिव्यांगनेची ओढ

[ जाति दिव्यागना ]

“ तरुणा जिवा, अंत
हें सत्य अत्यंत;
कसली वृथा खंत ?
 करिं मौज घडिची !   १

होई तुला काय ?
कां नूर तव जाय ?
कसली जिवा हाय ?
 वद, लागली रे ? ”   २

“ स्वप्नांत सुस्नात
दिव्यांगना कांत
पाहूनिया भ्रांत
 हा जीव झाला.   ३

लावण्य तें दिव्य
सौभाग्य तें भव्य
वर्णील कविवर्य
 कधिं कोण होई ?   ४

तीचा जिवा ध्यास,
तीचाच हव्यास,
तीची सदा आस
 झुलवी जिवाला.   ५

नभिं येइ नक्षत्र,
भासे तिचें चित्र.
चोखाळ हे नेत्र
 नच साक्ष देती.   ६

येतां उषःकाल
प्राची फुले लाल,
स्मरती तिचे गाल,
 परि फोल तेंही.   ७

पाहूनि कुसुमास
होई तिचा भास,
परि तेंहि जीवास
 माझ्या पटेना. ”   ८

“ रे स्वप्न तें स्वप्न !
कां होशि उद्विग्न ?
हें कोठलें विघ्न !
 हें काय मूर्खा ?   ९

शोधूनि परिसास
हो मात्र परिहास
आणील करि त्यास
 कुणि जन्मला का ? ”   १०

" निंद्रो अतां कोणि,
वंद्रो अतां कोणि,
मज सारखे दोन्हि,
  मन हें वळेना. ११

लाभेल ती खास
हा एक विश्वास !
ही एक रे आस
  आधार जीवा." १२

" तरुणा पिसें सोड,
भरलें किती गोड
रे ताट तें ओढ
  जें लभ्य लोकीं." १३

" रे पंजरीं पक्षि
तें तें दिलें भक्षि,
तो तृप्त; का लक्षि
  कधिं रानमेवे ? १४

धिग्धिग् ! जिणें व्यर्थ
जेथे न पुरुषार्थ,
ना स्वार्थ-परमार्थ !
  मरणें बरें रे ! १५

कटु मद्य हें गोड,
लागे जित्रा ओढ,
मिळवील तें जोड
  दिव्यांगनेची." १६

लष्कर-ग्वाल्हेर, ता. १७ मार्च १९३५ ]

## १९५ पूर्णाहुति

[ जाति वरमगला, राग भैरव ]

जीवनाध्वरिं पडे आज पूर्णाहुती,
येइ अन्त्येष्टिघटि, आज झालों कृती. ध्रु०

कर्मभूमीवरी अवतरुनि जीं करी
  सकल कर्में हवी आज होवोत तीं. १

कोणि आणूं नका आसवें लोचनी,
  छे ! न ही शून्यता ! पूर्णता, सद्गती ! २

आज वीणेवरी भगवती शारदा
  साममंत्रावली स्वैर आलापु ती. ३

आज षड्दर्शनें मूर्त येवोनिया
वेदघोषें भरुत सवनभूमीप्रती ! ४

शंखघंटादिकीं नाद घुमवा अतां,
चौघडा द्या झडूं, या करा आरती. ५

आज पुष्पांजली स्थंडिलीं अर्पुनी
स्वस्तिवचनीं करा सांगतासिद्धि ती. ६

लष्कर-ग्वाल्हेर, ता. १४ ऑगस्ट १९३५ ]

## १९६ दुर्गा

[ जाति पादाकुलक; राग दुर्गा ]

छेड सखे, दुर्गा मधु रागिणि;
बीनलयीं धर टाक थरारुनि. ध्रु०

लालन लालडि, लोचनमोहिनि
अमृत झरूं दे निजकंठांतुनि. १

उन्मादक सुर-मोत्यांच्या सरि
उधळ, थरारीं मैफल भारुनि. २

धवल चांदणें स्रवे अमृतरस,
कशी पसरली शांत यामिनी ! ३

धीरोदात्त गभीरा दुर्गा,
ओत ओत सुर गभीर साजणि ! ४

लष्कर-ग्वाल्हेर, ता. १ सप्टेंबर १९३५ ]

## १९७ चरणाखालिल हाय मीच रज !

[ जाति श्रीमती, राग तिलककामोद ]

सांगुं कुणा गुज साजणि, मनिंचें ?
बोलहि वदण्या चोरि समज मज;
मी पतिविरहित, शंकित नयनें
बघति लोक मज, अशुभ गणुनिया टाळतात मज. ध्रु०

कुणाजवळ करुं हृदय मोकळें ?
कोंडमार किति ! दिवस कंठितें गिळुनि दुःख निज १

मी न मनुज का ? काय न मज मन ?
नच विकार का ? लहरि उठति मनिं, काय सांगुं तुज ! २

पुरुष वरिति नव नवरि किතितरी,
सकल शुभच तें ! असहायच्च मी मुकेंच सावज ! ३

कशास जाई तो या मार्गी ?
बघुनि दुरुनिया पाणी पाणी होतें काळिज ४

दुसऱ्या मिरविति युवति पतिशिरीं,
तुडविति पाउलिं चरणाखालिल हाय मीच रज ! ५

लष्कर-ग्वाल्हेर, ता. १८ सप्टेंबर १९३५ ]

## १९८ कवनकमळें

[ जाति लवंगलता, राग काफी ]

सखिलोचनकासारी सारीं माझीं कवनें फुलति बहारीं  ध्रु०

मूळ धरुनि ताळिं गहन, जळावरि नाचति ठुमकुनि सारीं !
अथांग तळ तुज न कळे रसिका, सुषमा वरिल निहारीं.  १

सुरांगनांचें क्रीडास्थळ हें ह्या कमळांमाझारीं,
इंद्रासह त्या उतरुनि या जाळिं केलि करिति शृंगारीं.  २

सुरासुरांची झुंज कमळिं या, रमति इथे नरनारी;
उषा-निशा नाचती, न उठती काळाच्या ललकारी !  ३

लष्कर-ग्वाल्हेर, ता. १९ सप्टेंबर १९३५ ]

## १९९ मेनकावतरण

[ जाति मंदहसित, राग खमाज ]

आलि आलि दीप्तिशालि
कोटि चंद्र नेत्रिं भालिं
स्वर्गाहुनि खालिं खालिं
मेनका वसंतीं.  १

अवतरली जें छुमछुम
जिरुनि तपाची खुमखुम
थरथरूनि रोम रोम
टकमक मुनि पाही !  २

लटपटला गाधिजमुनि
जोडी जी सिद्धि तपुनि
चरणिं तिच्या ती ओतुनि
श्वानासम लोळे !  ३

जय जय जय जय मदना !
ब्रह्मा-शिव-विष्णु-गणां,
न चुके तव शर कवणा,
ध्वज तुझा त्रिलोकीं !  ४

लष्कर-ग्वाल्हेर, ता. २४ सप्टेंबर १९३५ ]

## २०० जय रतिपतिवर!

[ जाति पादाकुलक, राग मारवा ]

सुरासुरांचा चुरा करी स्मर,
मंत्रि शीतकर, सेनाधिपवर
मधुऋतु मृदुतर, युवतिनयन शर ! ध्रु०

वैरि भयंकर योगीश्वर हर,
सोडि तयावर मृदुल नयनशर;
जळफळला क्षोभला मुनीश्वर
झोडुनि परि त्या स्मर करि जर्जर ! १

डळमळलें अढळहि योगासन,
तृतीय नयनीं क्षोभ हुताशन,
धगधगला जणुं जाळी त्रिभुवन !
भस्म जाहला जळुनि कुसुमशर ! २

आटोपेना अशरीरहि परि
शरावरी शर सोडि हरावरि,
जेरिस ये हर, अस्त्रें आवरि,
आला शरणागत चरणांवर. ३

स्मरमीनध्वज फडके त्रिभुवनिं,
सुर-नर-खग-मृग लोळति चरणीं,
वृथा वल्गना प्रीतीच्या जनिं !
जय कविकुलगुरु ! जय रतिपतिवर ! ४

लष्कर-ग्वाल्हेर, ता १ ऑक्टोबर १९३५ ]

## २०१ शरणागत

[ जाति पादाकुलक, राग केदार ]

दारि उभा शरणागत तव मी,
क्षुद्र जंतु अति भवसंभव मी. ध्रु०

दिशि दिशि वणवण करुनि खपुनि अति
धरुनि देहली करितों स्तव मी. १

गहन तिमिरिं चांचपत येइं वर
त्रिविध ताप सोसुनि नव नव मी. २

ताड ढकल ! हें सोडिं दार नच;
उभा अढळ तें उघडाशि तंव मी ! ३

लष्कर-ग्वाल्हेर, ता. १ ऑक्टोबर १९३५ ]

## २०२ चुकला बाण

[ जाति गंधलहरी, राग हमीर ]

आलिस काय खिडकींतून गेलिस काय पळ ढुंकून
एक कटाक्षशर टाकून कासावीस जीव करून ? ध्रु०

आंबराईत झुळुक शिरून मोहर जाय जशी उधळून
शांत तळयांत पवन घुसून जाई शीघ्र जळ ढवळून !
आलिस काय, गेलिस काय ? १

मी पांथस्थ मार्गी जाइं, तुझिये दारिं ठरलों नाहिं,
धरिला नेम अन्यासाठिं चुकला बाण कां मज गांठि ?
आलिस काय, गेलिस काय ? २

लष्कर-ग्वाल्हेर, ता. २ ऑक्टोबर १९३५ ]

# २०३ मावळत्या सूर्याप्रत

[ जाति सुष्टिलता, राग यमन ]

मावळत्या दिनकरा, अर्घ्य तुज जोडुनि दोन्ही करां ! ध्रु०

जो तो वंदन करी उगवत्या,
जो तो पाठ फिरवि मावळत्या,
रीत जगाची ही रे सवित्या !
स्वार्थपरायणपरा. १

उपकाराची कुणा आठवण ?
‘ शितें तोंवरी भुतें ’ अशी म्हण;
जगांत भरलें तोंडपुजेपण,
धरी पाठिवर शरा ! २

असक्त परि तूं केलिस वणवण,
दिलेंस जीवन, हे नारायण,
मनीं न धरिलें सानथोरपण.
समदर्शी तूं खरा ! ३

प्रभु-सचिवा विरहीं मुखधूसर
होति दयामृदु नयनिष्ठुर कर
टाकुनि कारभार चंद्रावर
चाललास तूं घरा ! ४

लष्कर-ग्वाल्हेर, ता. ३ ऑक्टोबर १९३५ ]

## २०४ घर राहिलें दूर !

[ जाति किंकिणी, राग भीमपलासी ]

उरला दिवस अल्प, घोडें थकुनि चूर,
पथ रानिं चढणींत, घर राहिलें दूर. ध्रु०

असशील घरिं आज तूं गे बघत वाट,
प्राण स्वनयनांत, पोटांत काहूर. १

मुद्रा तुझी म्लान डोळयापुढे येइ,
नाहीं मला पंख, हृदयांत हुरहूर. २

या निर्जनीं रानिं दे कोण मज साथ ?
माम् त्राहि जगदीश ! होई न निष्ठूर ! ३

लष्कर-ग्वाल्हेर, ता ३ ऑक्टोबर १९३५ ]
सवन-यज्ञ

## २०५ पाणपोईवाली

( एका संस्कृत श्लोकाच्या आधारें )

[ वृत्त स्रग्धरा ]

झाली ती ओणवी, तों पदर उरिं सरे सैल झाला, झुले तो
पाणी दे पाणपोईजवळ उभि, पितां, ऊर्ध्वदृष्टी फुले तो !
बोटें तीं ओंजळीचीं विरळ, मग तिची धार बारीक झाली;
मद्येच्छू काय पीतो अविचल ? मदिराक्षी तरी काय घाली !

लष्कर-ग्वाल्हेर ]

# २०६ वारुणीस्तोत्र

[ जाति सुरमंदिर, भूपाळी ]

जयतु जय भगवती ! जयतु जय वारुणी !
मूलमायाभगिनि जय जगन्मोहिनी ! ध्रु०

मूलशक्त्यंतरीं
उठति लहरि न जरी
सृजन कवणेपरी
करिल मायाविनी ? १

केवि जगदंड हें,
सोममार्तंड हे,
रचिल नव पिंड हे
मोह नसतां मनीं ! २

कल्पनागार तूं !
मोहभांडार तूं !
पुरविशी सार तूं
शक्तिसहचारिणी. ३

देवदानव मिळुनि
धर्म निज सांडुनी
सागरा मंथुनी
काढिलें तुज गणीं ! ४

श्रीसहोदरिणि तूं !
अप्सरा-भगिनि तूं !
रतिसुखस्रविणि तूं !
जयतु जय भास्विनी ! ५

जय कराल-प्रिये !
मोहनिद्रामये !
मूर्त हास्य स्वयें
हटविकटहासिनी ! ७

दुःखदलमर्दिनी,
विभवसुखवर्धिनी !
मोहिले ऋषिमुनी
जयतु उन्मादिनी ! ६

देवि उदयोऽस्तु तव !
देवि विजयोऽस्तु तव !
जय उदे ! जय उदे !
जय उदे ! स्वामिनी ! ८

## २०७ जमादार

[ जाति दासी, राग कालिंगडा ]

‘ काय जमादार तुझा शेवटील पाहरा ?
जागाशि निमकास खरा, पाहऱ्यांत मोहरा !
क्षितिजिं अर्धमग्न चंद्र वाट पाहि का सखिची ?
मदनापरि हा प्रवालवर्ण उधाळि किरणशरां ! १

जागुनिया अंवशीचा दाट पालवीमधून
पक्षि, हांक दे प्रियेस, ‘ जाइन बाहेर जरा, ’
‘ परवल बतलाव जाव ! रोकटोक फिर किंसकी ? ’
‘ परवलची बात मजशि करिशि काय चाकरा ? ’ २

‘ मालिक तुम् मैं नोकर कवराणीसाब, सही;
पर बंदा हुक्म का हुं, पहरेका काम बुरा ! ’
‘ सरली रे रात्र परी, परवलचे काम काय ?
हटकशील दिवसा का ? तूं आखडसासरा ! ’ ३

‘ नहि तंबुर, बुगुल नही, वर्दि नही, बजि अबतक;
अमल तीन बजनेका, हिरना नहि अभि उतरा ! ’
‘ सारि रात्र झोप नाहिं, ये हुशारि पवनिं गार, ’
‘ नींद लेव बाइसाब ! ’ ‘ नेक एक तूंच खरा ! ’ ४

लष्कर-ग्वाल्हेर, ता. ६ ऑक्टोबर १९३५ ]

परवल = खुणेचा शब्द. वर्दी = जागण्याची सूचना. हिरना = मृगनक्षत्र.

## २०८ ग्रीष्म

[ जाति अरुण, राग सारंग ]

स्वारि बाइ केवि आलि !
घर्मि अंग अंग न्हालि !
आलि गालिं बाइ लालि,
उतरिन जलकुंभ मी ! ध्रु०

तापे शिरिं अंशुमालि,
आग आग भोवतालि,
रखरखीत ह्या अकालिं
अग्निच्या जिभा झळा ! १

तरुतळिं बसुनी विवशी
रंवथ करिति गाइम्हशी,
गुपचुप हे पशुपक्षी
दडति गुहाकोटरीं. २

पक्षि एकटा सुतार
ठकठक करि बेसुमार,
सारखा करी प्रहार,
ध्वनि गभीर खोल हा ! ३

पोपट पिंजऱ्यांत शांत
चित्रसा बसे निवांत,
श्वान हलुनि नखशिखांत
धापा हें टाकितें ! ४

वाटेवर तप्त धूळ,
फिरके ना मुळिं पाउल,
गांव जणूं निद्राकुल,
सामसूम चहुंकडे ५

आगीची उठे लाट,
तप्त भिंति, तप्त वाट,
तप्त पाट, तप्त खाट,
लाहि लाहि काहिली ! ६

ओढ दासिची नितांत.
आलां या वेळिं कांत !
पाय धुतें, बसा शांत,
वारा मी घालितें ! ७

लष्कर-ग्वाल्हेर, ता. १८ ऑक्टोबर १९३५ ]

## २०९ विरहांतील जीवन

[ जाति पादाकुलक, राग बागेसरी ]

केवि सरे रजनी ! मज नीज न,
सरे कसा तरि कामकाजिं दिन. ध्रु०

विरहिं विकल तळमळतां, साजणि पळपळ निघतें युगसें जाण. १
मिणमिण करि असुदीप अंतरीं जळे कसातरि सजणाकारण. २
विरहपवनिं जरि ज्योत थरथरे, तगे आसपट, आड येइ घन. ३
तिळभर परि नच उरलें तैलहि, जळे अतां तग वातहि त्याविण. ४
किति दिन बघशिल अंत साजणी, झरझर सरतें चंचल यौवन. ५

लष्कर-ग्वाल्हेर, ता २५ ऑक्टोबर १९३५ ]

## २१० आज पारणें कां फिटलें ?

[ जाति हरिभगिनी, राग वसंत ]

किति फुगशि फुलशि तूं छबिले !
लाजुनि मुरडुनि मुरकुंडि वळे छुम् छुम् चलती चरण खुळे ! ध्रु०
कोटि चंद्र नयनीं लखलखती, गालिं गुलाबहि किति फुलले ! १
अशि कशि बघशी दारुड्यापरी, भूत काय कुणि संचरलें ! २
तळमळ करिशी दिवस कितितरी, आज पारणें कां फिटलें ? ३
स्मित गालीं, मधु ओठिं कांपरें, हसतिल तुजला गे सगळे ! ४
काजळ कुंकूं, वेणिफणी कर, चढव साज सगळे अपुले ! ५
अशी उताविळ काय होशि गे ? सांज न होइल का चपले ? ६

लष्कर-ग्वाल्हेर, ता. २५ ऑक्टोबर १९३५ ]

## २११ चौकीदार

[ जाति किंकिणी, राग दुर्गा ]

अस्ताचलीं सूर्य, हें किर्र घन रान,
घाटींतली वाट, पायीं नसे त्राण. ध्रु०

ती गर्जना ऐक, हें हादरे रान !
ती मृत्युची हांक भयसूचना जाण. १

ये सांजचा पांथ, त्या थांबवायास
लावी इथे चौकि राजा दयावान ! २

हें झोपडें क्षुद्र, ती पाहि परि खाट,
फळमूळकंदांस नाहीं इथें वाण. ३

त्या बोरजाळींत खुळखूळ वाहून
बोलावि ओढाहि करण्यास जलपान. ४

मी पेटवीं आग काटेरि झगऱ्यांत,
पाणी करीं ऊन, येईं करीं स्नान. ५

रे कोसचे कोस नाही कुठे गांव,
टेकावया अंग नाहीं कुठे ठाण. ६

घरची तुला ओढ, बघती तिथे वाट,
धोक्यामधें ऐक झोकूं नको प्राण. ७

निघतां उद्यां सूर्य, तूं लाग मार्गास,
दावीन मी वाट हातीं धनुर्बाण. ८

लष्कर-ग्वाल्हेर, ता. २६ ऑक्टोबर १९३५ ]

## २१२ तें कोण या ठायिं ?

[ जाति किंकिणी, राग खंबावती ]

मी चालतां वाट, या येइं दारास,
घोटाळुनी पाय लागें स्वमार्गास. ध्रु०

पुरला निधी काय माझा कुठे येथ ?
हरपे इथे रत्न आधार जीवास ? १

ज्या जन्मजन्मांत शोधीं कुठे येथ
चिंतामणी काय लोपे जवळपास ? २

संदिग्ध मनिं लीन पूर्वस्मृती काय
जागूनि या ठायिं पिळतात हृदयास ? ३

जळल्या इथे काय आशा कधीं काळिं
ज्यांच्या मुळांतून नव पालवे आस ? ४

कां संचितीं गूढ सळसळ इथे होइ ?
किंवा फुटे वाट माझ्या भविष्यास ? ५

कां पापण्या येथ भिजती न कळतांहि ?
पोटांतुनी खोल कां येइ निश्वास ? ६

कां हें असें होइ ? कां कालवे जीव ?
तें कोण या ठायिं ज्याची धरूं कास ? ७

लष्कर-ग्वाल्हेर, ता. ६ जानेवारी १९३६ ]

## २१३ वायो, खुणव तीस

[ जाति किंकिणी, राग बागेसरी कानडा ]

येतां तुझ्या दारिं मी वाट चालोनि
चालें पुढे, येथ थांबोनि थांबोनि. ध्रु०

असशील तूं आंत घरकामधंद्यांत,
रेंगाळि कुणि दारिं, तुज भान कोठोनि ! १

छुम्‌छुम् तुझे पाय स्रवतात नव राग,
कुणि भाग्यवंतास सुख आंत ऐकोनि ! २

डोळे तुझे जेथ पडती घरामाजि
सौभाग्य अरुणास त्या ठायिं नाचोनि ! ३

मी मात्र या दारिं घोटाळिं आशाळ,
कीं ढुंकशिल काय येथोनि तेथोनि ! ४

चाले असें येथ हें रोजच्या रोज,
सांगेल तुज कोण दारीं उभें कोणि ? ५

मी टाकितों येथ काळीज हें फूल,
वायो ! खुणव तीस, ने वास वाहोनि ! ६

लश्कर-ग्वाल्हेर, ता ८ जानेवारी १९३६ ]

## २१४ संगीत कलेप्रत

[ जाति जीवनलहरी, राग तोडी ]

अतां राहु देइं नाम
भजनिं कळाहीन राम ! ध्रु०

रागरागिणीमधून
ऐश्वर्यें नटुन सजुन
येइ हृदयपट उघडुन
राम परमसौख्यधाम ! १

नृत्य करिति तुझे सूर,
भरुनि भरुनि येइ ऊर,
तान-लय-निकुंजिं चूर
राम इंद्रनील शाम ! २

नलगे मज पुजापाठ,
दंभाचा थाटमाट,
गायनिं तव ह्या विराट
राम मुनिमनोभिराम ! ३

ऐकतांच तुझी टीप
उजळति जणुं रत्नदीप
स्वर्ग येइ का समीप ?
राम दिसे पूर्णकाम ! ४

ऐकतांच तुझी तान
घेई मन हें विमान.
तमःपटावरि उडाण !
विमल तेजिं घे विराम ५

मनश्चक्षुच्या भवतीं
थय थय थय नृत्य करिति
स्वर्ललना ज्योतिष्मति
ही पुजा खरी अकाम ! ६

लष्कर-ग्वाल्हेर, ता. १४ फेब्रुवारी १९३६ ]

## २१५ तरुणांस संदेश !

[ वृत्त मंदारमाला, राग भूप ]

हातास ये जें, स्वनेत्रांपुढें जें, तया वर्तमाना करा साजिरें,
हेटाळुनी त्या अदृश्या भविष्यामधें बांधितां कां वृथा मंदिरें ?
जी ‘ आज ’ आली घरा माउली ती ‘ उद्यां ’ ची, स्वकर्मी झटा रंगुनी,
प्रासाद् निर्मा स्वताच्या उद्यांचा इथे कर्मभूमीवरी जन्मुनी.

जो पाडि धोंडा अशक्ता, बली त्यावरी पाय रोवी, चढे तो वरी.
निःसत्त्व गाई करंटाच गाणी स्वताच्या स्थितीचीं, बहाणे करी.
हाती विटा त्या, चुना तोच, भव्य स्वयें ताज त्यांचा कुणी तो करी;
कोणा न साधे कुटीही; भविष्या रचाया हवें सत्त्व, कारागिरी.

## २१६ शुभं भूयात्

[ जाति रुद्र ]

आज नृपराज ये दिव्यनिधि घरिं खरा
आर्त हांकेसरशि येशि देवी घरा ध्रु०

शून्य जग तुजविणें विभव सारें सुनें
उगवतां तूं फुटे जीवनाचा झरा ! १

येइं येईं म्हणुनि सोत्कंठ बहुजनी
बाहिलें ती महा- लक्ष्मि आली घरा ! २

आज चिंतामणी पाहिला लोचनी
परिस लाभे अहो भाग्य येई करा. ३

देवि मांगल्य तूं सत्य तूं सौख्य तूं
काय आतां उणें धन्य झाली धरा. ४

आज झालों कृती धन्य ही संसृती
नव फळांहीं भरो तव मळा नृपवरा ! ५

दणदणो दुंदुभी देव गाउनि नभीं
अक्षता वर्षुनी प्रीति येवो भरा. ६

लष्कर-ग्वाल्हेर, ता १६ फेब्रुवारी १९४१ ]

# २१७ कोठें मुली जासि ?

उगवे निशाकांत  झाल्या दिशा शांत
न्हालें जगत् काय  क्षीराब्धि फेनांत ?  ध्रु०

या काळवेळेस  निघतात वेताळ
नाचोन खिदळोन  बेताल गातात !  १

बाई, शरीरास  उन्मादकर वास
तो आवडे यांस  येतील अंगांत !  २

गुंडाळुनी काम-  धंदे मुली लोक
मातीत राबोन  स्वगृहा परततात.  ३

तरुवेलिच्या खालिं  हे अंगणीं अंग
टाकूनिया स्वैर  रमतात निभ्रांत !  ४

घालोनि चटयांस  हे अल्पसंतुष्ट
स्वच्छंद तंबाखु  पीतात खातात.  ५

हीं पांखरें पाहिं  येतात घरट्यांस
चंचूपुटीं भक्ष्य  पिल्लांस नेतात.  ६

तूं एकली मात्र  कोठें मुली जासि ?
या राक्षसी वेळिं  छाया विचरतात.  ७

लष्कर-ग्वाल्हेर, ता. ११ नोव्हेंबर १९४१ ]

## २१८ पुनः पुनः यावें

[ अभंग ]

धन्य झालों देवा   केलें आगमन
जाहलें पावन   घर माझें
भजनपूजन   नामाचा गजर
लाजले निर्जर   देखोनिया
दाही दिशां भरे   आनंदीआनंद
आनंदाचा कंद   घरीं आला
आणखी याहून   स्वर्ग दुजा काय ?
जेथें तुझे पाय   तोची स्वर्ग !
भाबड्या भावाची   अज्ञानाची सेवा
गोड केली देवा   दयावंता
आतां गमनाची   वेळ ये जवळ
जीवा तळमळ   लागलीसे
पुनः पुनः यावें   घ्यावा समाचार
हेंच वारंवार   विनवीं देवा !

## २१९ तुझे चरण पाहिले

[ राग भैरवी, ताल दादरा ]

भाग्य उजळलें तुझे चरण पाहिले. ध्रु०

लागुनिया तुझे चरण
घर झालें हें पावन
इडापिडा जाति पळुन
हृदय विकसलें. १

नामाचा तुझ्या गजर
लाजति मुनिवर निर्जर
आनंदें भरलें घर
नयन-फळ मिळे. २

घडलें कारिं तव पूजन
मुखें नामसंकीर्तन
दर्शनसुख घेति नयन
अंग हर्षलें. ३

करुणेचा तूं ठेवा
केली काशितरि सेवा
गोड करुनि परि देवा
सकळ घेतलें. ४

आतां परि करिसि गमन
पुनः पुनः दे दर्शन
हेंचि विनविं शिर नमवुन
हात जोडिले. ५

# कांहीं संस्कृत आणि हिंदी कविता

## २२० ॐ तत्सत्

ससर्ज यो विश्वमनंतमेतत्
व्याप्यानिलं वारि भुवं स्थितो यः
ज्ञेयो न जानाति तथापि सर्व
ध्येयः स एकः प्रभुरद्वितीयः १

सुरः सुराणां च गुरुर्गुरूणां
प्रभुः प्रभूणां जगतां विधाता
छाया जगद्यस्य विभाति सर्व-
मवेहि पूज्यं तमनन्यमेकम् २

शक्यो वर्णयितुं कथं यदि यतो वाणी स्थिता कुंठिता
सादृश्यं न च येन गायति यथा वेदोऽस्ति कुत्रोपमा
जिज्ञासा यदि तस्य ते स्ववहितो भूत्वा मनो धारय
मुक्तः सन् भवसंभ्रमादवितथं ज्ञानं परं लप्स्यसे ३

इंदूर, १९०२ ]

## २२१ राधा झूलत माधवसंग

[ जाति पतितपावन, राग बिहाग ]

राधा झूलत माधवसंग. ध्रु०

जमुना-तट-तरु माझ रेशमी झूलो लाल सुरंग ! १
गगन बीच घन माधव, राधा बिजली लिपटी अंग. २
गात गीत शृंगाररस भरो, झलकत नाद्‌तरंग. ३
माधवजीके अंगसंगसे जागे हृदयअनंग. ४
अंग अंग भये पुलकित मुखपे गेहेरे छाये रंग. ५
अर्धनिमीलित नयन मद्‌भरे चितवन हरिमुखदंग. ६

## २२२ अब तुम जयजयकार करो !

[ जाति पतितपावन, राग कालिंगडा ]

अब तुम जयजयकार करो ! रे ! ध्रु०

दुर्गम परवत आडो ठाडो, तामे द्वार परो ! १
द्वारे ठाडो बीर महात्मा, नेन सनेह भरो ! २
कमर बांध कलजुग ललकारो, डरपत भाग परो ! ३
हाय पडी अब कलजुग-दलमो तासें कोन लरो ? ४
याहि काज नरसिंह पधारे हरनाकूस मरो. ५
याहि काज दसरथसुत जाये बंदर सरग चढो. ६
याहि काज वामन बटु आये बलि पाताल धरो. ७
वेहि पधारे मोहन प्यारे अब दुख दरद टरो ! ८
आवो आवो अब सब भैया काहूसे न डरो ! ९
मुसलमान, द्विज, सूद्र आव सब बाह पसार खडो ! १०

अजमेर, ता. २६ ऑगस्ट १९२२ ]

## २२३ विनती सुनो आज

[ जाति मधुमधुरा, राग असावरी ]

बिनती सुनो आज
त्रिभुवनके महाराज !
बेर भई टेर टेर बैठ गयो अब अवाज. ध्रु०

तुम गरीबके निवाज;
गरिबनकी तुम्हे लाज,
गरिबनपर पीर परे, और करे कोन काज ? १

परधर्मी होथ राज,
धर्मी जनको समाज
त्राहि त्राहि टेर रहों ! कवन दूसरो इलाज ? २

खावनको नही नाज,
चीर न ढाकनकुं लाज,
अबहू तो बचन सुमिर आव, अन्य काज त्याज. ३

लश्कर-ग्वाल्हेर, ऑगस्ट १९२३ ]

## २२४ शारदास्तोत्र

[ जाति दिव्यागना, राग बागेश्री ]

जय शारदा देवि ! जय हो तुम्हारी !
स्वीकारिये मात प्रणती हमारी ! ध्रु०

हम पापघट, आप
घट में रहीं व्याप,
पापघ्न निष्पाप,
भवतापहारी ! १

हम मूर्त अज्ञान,
तुम ज्ञानकी खान.
तुम प्रान, जिमितान
वीणाविहारी ! २

हम तो असत् मूर्ति,
तुम सत्य की स्फूर्ति !
लहरा रही ज्योति
तिमिरापहारी ! ३

सौंदर्य–शिव–सत्य–
रसरूपसाहित्य,
तुमरो श्वसन नित्य,
नवमोदकारी ! ४

लश्कर-ग्वाल्हेर, १९३५ ]

**स मा प्त**

# काव्यारंभांची सूची

[ आंकडे पृष्ठांकांचे आहेत ]

# टीपा

[ टीपांच्या आरंभींचा अंक कवितानुक्रमाचा आहे. ]

भास्कररावांच्या कवितांचा आधार समाजाच्या अंतर्बाह्य अवलोकनावर आहे. कवितांना आधारभूत असे प्रत्यक्ष घडलेले प्रसंग फार कमी. स्त्रीपुरुषांच्या भावनाची हालचाल कोणास दिसत नाही ? ती पाहून लागलेला चटका अशा काव्यनिर्मितीस कारणीभूत होतो. भास्कररावांच्या कल्पनांसारख्या कल्पना अन्य वाङ्मयसागरांत नसतील असें नाही. कारण वर्ण्य विषय व कवि एकाच जगांतील असल्यामुळें अशी सदृशता उत्पन्न होणें शक्य आहे.

रसिकांचा उपमर्द केल्यासारखें होईल म्हणून प्रथम टीपा देणार नव्हतों परतु जरूरच पडल्यास वाचकास त्या उपयुक्त वाटतील या भरंवशानें कांहीं कवितावर टीपा दिल्या आहेत

—मायदेव

१ या कवितेंत कवीची रसिकाना विनंति आहे. म्हणूनच कालानुक्रमानें पहिली नसतांही ही कविता प्रारंभी दिली आहे. भास्करराव रतलाम येथें असतांना एक भाविक गृहस्थ एका परडीत स्वच्छ व ताजी फुलें घेऊन चालला होता. गडबडीत दुर्दैवानें ती परडी सांडली व देवांच्या मस्तकी वाहिल्या जाणाऱ्या सुमनांवर मातीत पडण्याचा प्रसंग आला. भास्कररावांनी खिडकीतून हें दृश्य पाहिलें व माझ्याही सुमनांची म्हणजे कवितांची अशी स्थिति होईल की काय, अशी शंका येऊन त्यानी ' कुस्करूं नका ही सुमनें ' ही कविता रतलामपासून उज्जेनला पोंचेपर्यंत आगगाडीतच लिहिली. जाति=जाई. बागेचे डोळे=फुलें

२ ताहन—तहान शब्दाबद्दल वापरला आहे. रूपभंगाचा दोष झाला आहे. निकुंज—लतागृह, वंश—वेळू. १८ व्या श्लोकांतील दुसऱ्या चरणात वशनिकुंजि असा पाठ पाहिजे.

३ दुर्दैवानें या कवितेचें दुसरें कडवें मिळालें नाही. मिळालें असतें तर बहार झाली असती. ' डोळे तुमचे जादुगिरी ' अशी एक जुनी लावणी ऐकिवांत आहे.

४ चोख–स्वच्छ, शुभ्र ३,४,५,६,७ या कविता १८९३ नंतरच्या असाव्या असें वाटतें.

७ बालपणीं तांबे यांनीं आपल्या कुटुंबांतील एका स्त्रीची अशी उडालेली तिरपीट पाहिली होती. त्याची स्मृति या कवितेस आधार आहे. कडीवर आणखी लोखंड घालून ठेवणें हा प्रियवस्तुमीलनावर तोडगा मानतात. ( श्लोक ६ ). १६ व्या श्लोकांत तिसऱ्या चरणांत 'असें' च्या ठिकाणी 'असे' पाहिजे.

८ "बालांसाठी जें गीत तें बालगीत. या प्रकारच्या गीतात मुलाना रुचतील असे विषय असावे लागतात. खेळ, दांडगाई, भातुकली, चिऊकाऊ, बागुलबुवा असे प्रसंग यात पाहिजेत. तात्पर्य, मुलाचें जेणेंकरून रंजन होईल अशी ही गीतें असली पाहिजेत. हें गीत या प्रकारचें आहे. मुलास अद्भुत, हास्य, भयानक इत्यादि रस फार आवडतात. शृंगारहास्याचा संकर हाही मुलाचा फार आवडता रस आहे. 'आता गडि फू दादाशी' ही कविता या प्रकारचें उदाहरण आहे." तांबे यानी मला पाठविलेल्या एका पत्रातील उतारा.

९ हें छोटेखानी काव्य प्रख्यात आंग्लकवि Robert Browning याच्या Pied Piper चें रूपातर आहे. हें प्रथम देवासचे श्रीमंत खासेरावसाहेब पवार यास काव्याची अभिरुचि लागावी म्हणून त्याच्याकरिता लिहिलें. ( ५७ ) डगणें–भिणें. 'मथे'–ही भास्कररावांची वडील मुलगी. हिचा विवाह पुढें खाडवा येथील वकील श्री. उमाकांत बाळकृष्ण घाटे याच्याशी झाला.

१० या कवितेंतील शेवटच्या कडव्यातील कल्पनेप्रमाणें काही कडवी असलेलें तांबे यांचें एक असमग्र गीत उपलब्ध आहे. त्यातील काही ओळी पुढीलप्रमाणें आहेत.

हे भगवंता सदय अनंता । तूं भवनाविक राणा
अमुची चिंता तुज, तरि फुटतां । तारी दीनोद्धरणा !
आदळतें हें भयकर वादळ । गगनी वळवी नयनां
कामनक्रदळ वेंचित निजबळ । सागरतळ दावोना
पैलतिरावर तेज दिसे घर । अपुलें त्यावर फिरवी नयना

१२ गुराख्याचे तोंडी हें गाणें घातलें, म्हणजे प्रत्येक गुराख्याचे मनांत हे विचार येतात असें नव्हे. कल्पनेच्या साम्राज्यांत व अप्रत्यक्षाच्या वातावरणात निसर्गाला धरून असा विहार हक्कानें करता येतो.

१३ प्रतापगडाहून २३ ऑगस्ट १९२० या दिवशी मला लिहिलेल्या पत्रात तांबे म्हणतात की, 'माझी सारी प्रेमगीतें मला माझ्या पत्नीवरील प्रेमामुळेंच लिहितां आली. मी जर प्रीतीचा आस्वाद घेतला नसता तर तिच्या अभावीं प्रीतीची एकही ओळ मला खरडता आली नसती.' १३, १४, १७, २४, २८, २९ व ३९ या सर्व कविता भास्कररावांनी आपल्या पत्नीच्या सहवासातील प्रेमळ प्रसंगाना अनुलक्षून लिहिलेल्या आहेत.

१६ आग्लाईनें दिपून गेलेले स्वजन पाहून कवीनें हे विषादपूर्ण उद्गार काढले आहेत.

१९ 'वदन मदनकेलिभुवन' असें तांबे यांनी प्रथम लिहिले होतें.

२१ चक्रवाल—क्षितिज ७३ व्या कवितेत ११ वी ओळ पहा.

२२ काष्ठ मी रहा उगा : "माझें घर श्मशानाप्रमाणें उदासवाणें असून मी तेथें जाळण्यासाठी आणलेल्या निर्जीव लाकडाप्रमाणें आहें" तांबे याचे पत्रातील स्पष्टीकरण.

२४ केशवसुताप्रमाणें तांबे यानीही सुनीतें लिहिली. विचाराच्या आविष्करणास शार्दूलविक्रीडित त्याना योग्य वाटलें व त्याच वृत्तात त्यांनी आपली सुनीतें लिहिली

२५ तांबे याचा मुलगा कमलाकर हा लहानपणीच निवर्तला. पंचमीयात्रेतिल युवती = नागपंचमीच्या दिवशी देवदर्शनाला जाणाऱ्या महिला.

२६ या सर्व कवितेंत दामयमकें साधली आहेत.

२७ यातील ६ वें कडवें पूर्वी नव्हतें. तें अगदी अलीकडे लिहून घालण्यांत आलें उत्कर्षबिंदु तर ७ व्या कडव्याचे शेवटी आला आहे असें वाटतें.

२८ शेवटच्या दोन ओळी—तुझ्या हृदयाचें चित्र हातामध्यें घेऊन उभा असलेला प्रेमराजा तुझ्या डोळ्यात दिसतो. त्या डोळ्यांना पाहून माझ्या हृदयांत काय होतें तें कसें सागूं !

२९ पीता मी अपुलेंचि रक्त–मी मला दोषी लेखताच शेवटची ओळ––अश्रु आले असतां तुझे डोळे जास्तच सुंदर दिसतात.

३० " या कवितेची मध्यवर्ती कल्पना Scott कृत O Brignall Banks are wild & fair या कवितेवरून तर सुचली नसेल ! "– डॉ. माधवराव पटवर्धन.

३१ ही कविता भास्कररावाचे मित्र नारायणराव दुबे याचा तान्हा मुलगा वारला त्यावेळी देवासहून लिहून त्यांस इंदोर येथें पाठविली होती.

( ७ ) मग मुकाच मुकाच न पाहवे–शब्दहीन पाळणा पाहून हुंदका फुटतो.

( ३० ) धरि असें पाहिजे

३२ ही कविता शारदा नाटक पाहून सुचली.

( ७ ) मेघांवर दिसणारें इंद्रधनुष्य होऊं या  एकमेक = एकमेकांबरोबर.

३३ प्रीतीचा वास राजमंदिरापेक्षां गरिबांच्या झोंपडींत असतो हें संस्थानी वातावरणात वावरलेल्या माणसास तेव्हांच पटतें.

३४ १९०३ साली वकिलीचें काम घेतल्यावर भास्कररावाना न्युमोनिआ झाला. नंतर ते प्रकृति सुधारण्यासाठी पचमढीस गेले. तेथील सृष्टिशोभा पाहून ही कविता लिहिली आहे.

३५ भुलति दुष्टभावा–वाईट स्वभाव विसरून जातात. डुकाऱ्या करिती–डरकाळ्या फोडतात  बइ–मुलीचें नांव. अभक्ष्य–झाडाचा पाला वगैरे. पुष्कळ गरिबांच्या नशिबी असली तारातूट दुष्काळांत येते. सुखात दुःखाची आठवण झाल्याशिवाय राहात नाही.

३६ एका विधुराचे मुलाच्या लग्नप्रसंगीचे उद्गार. वरमाय–वधूपक्षाकडील लोकांनी वरमायीची गाणी म्हणावयाची असतात त्यांतील एकादें गाणें. निधनगीती–हा Dirge शब्दासाठी प्रतिशब्द बनवलेला दिसतो. पण आपल्याकडे निधनाचे वेळी अशी गीत म्हणण्याची पद्धत नाही. अवसेचे पुतळे–( १ ) अंधाराचे पुंजके, ढीग. ( २ ) आश्विन व. ३० ला घरापुढें यमाचा शेणाचा पुतळा करतात.

३७ तांबे यांच्या सबंध काव्यसंग्रहांत एवढीच कविता निर्यमक आहे. ओपुनी–अर्पुनी.

३८ सळ येणें = गुडी पाडणें = भुवया व डोळे यांचा विचार करतांना संकोच दिसणें. माळव्यांतील मराठीत हे भाषासंप्रदाय रूढ आहेत. हराम–अन्यायी, खोटा.

३९ वारू–हें तांबे यांच्या पत्नीचें माहेरचें नाव. पार्वती हें सासरचे नांव. या सुनीताप्रमाणे २४, २८ २९, ४९, ५१, ५२, ५५, ६२, ६३, ७२ व ७३ ही सर्व सुनीतें तांबे यांस त्यांचे पत्नीचे सहवासांतच सुचली आहेत.

४० ही कविता कविमित्र नारायणराव दुबे याना उद्देशून आहे.

४१ पण नीट पहा गे आत आपल्या हृदया–तूं आपल्या हृदया आंत नीट पहा. माझें हृदय तुला त्यांत मिळून गेलेलें आढळेल. पाणी दुधात मिसळलें तर तुम्हां बायकांना दूध नासावेंसें वाटेल का ? आणि ही गोष्ट आम्ही पुरुषांनी का तुम्हां स्त्रियाना शिकवायची ?

४२ व ४३ या कविता बंगाली कवयित्री तोरु दत्त हिच्या बहिणीला उद्देशून लिहिलेल्या Though childhoods' days be past and gone या आणि Still Barred thy doors या दोन कवितांची रूपांतरें आहेत.

४४ उकाळा–उकळी.

४५ आंग्लकवि गोल्डस्मिथच्या Vicar of Wakefield मधील Hermit कवितेप्रमाणें यांतील मध्यवर्ति कल्पना आहे. ती वाचल्याचें भास्कररावाना आठवत नव्हतें.

४६ " तोरु दत्तच्या बटु काव्यांतील उताऱ्याचें हें भाषांतर आहे. मूळ Had they touched the heart ? असें आहे. "

—प्रो. भवानीशंकर पंडित

४९ पुण्य करून हस्तगत केलेला स्वर्ग पापाच्या नुसत्या कल्पनेनें हातचा जातो, अशा तऱ्हेची प्रेमाची उदात्त कल्पना बाळगिणाऱ्या मलाही तुमचे डोळे लाल दिसताहेत तेव्हां काल कुठें होतात असें विचारतेस. किती रागीट व मत्सरी आहेस बरें तूं !

५० जयदेव कवीच्या रचनेची आठवण या कवितेनें होते व्यतिरेक अलंकाराची सुंदर उदाहरणें या कवितेंत आहेत.

५१ हच तें सुनीत, की जें वाचून केशवसुतानी "भास्करराव हे जिवंत वाणीचे निसर्गकवि आहेत" असे सानंदोद्गार रहाळकरांजवळ काढले.

५३ ब्राउनिंगच्या संवादयुक्त नाट्यगीताप्रमाणें रचना करण्याचा भास्कररावांचा हा प्रथम प्रयत्न वाटतो. लपविलेल्या प्रेमाचे धागेदोरे दासीनें आपल्या खुसखुशीत विनोदानें उकलून दाखवले असल्यानें नाट्यगीत लांबले असून कंटाळवाणें होत नाही.

५४ मुलांची सृष्टिशोभा पहाण्याची व नाचण्याबागडण्याची हौस यात आणली आहे.

५५ क्षिप्राचंबळा संगम हा मध्य हिंदुस्थानात जावरा संस्थानात छिपवरा येथें आहे.

५६ हें शिशुगीत वाऱ्यास अनुलक्षून आहे. यात भयानक रस असून तें मुलाना आवडतें.

५७ या कवितेंतील **कडवीं समचरण नाहींत**. ५० व्या कडव्यांतील मंडळाची कल्पना आंग्लवाङ्मयातील संकेतानुसार आहे. रात्री पऱ्या फेर धरून नाचतात व त्यानें अशी वर्तुळें पडतात हा तो संकेत.

५८ अजाण अर्भकाचा आईसाठीं हट्ट. ही कविता भास्कररावाच्या पहिल्या मुलाच्या हट्टावरून त्यास सुचली. मुलाची आई हळदीकुंकवासाठी गेली असता मुलगा उठला व त्यानें हट्ट घेतला.

५९ आठव्या कवितेवरील टीप पहा. असला विनोद घरोघरी चालतो.

६१ १९०८ मध्यें कवीचा पहिला मुलगा निवर्तल्यावर ही कविता लिहिली आहे.

६२ गतकालाबद्दल मानवी मन नेहमी असेंच आसासून पहात असतें. मागील कविताही पहा.

६३ गुदरखेडा येथें हें एक दृश्य पाहून ही कविता सुचली. उणें **अधीक याऊपरी–स्वरूपभंगदोष**.

६४ "एका गृहस्थाचें मन एका स्त्रीवर बसले. पण तिनें त्याला झिडकारलें. त्यावरून तो विदेशी निघून गेला. पन्नास वर्षांनंतर परत येतो तों तिचीच नात गांवच्या वेशीशी दत्त उभी." ही गोष्ट भास्कररावांना एका युरोपिअन अधि-

काम्बानें अनुभवाची म्हणून सांगितली. ब्राऊनिंगचे अभ्यासामुळें या एकोक्तीला चांगला अवकाश मिळाला. 'आठवें' च्या ठिकाणी 'आठवे' असें रूप हवें.

६५ ह्या नाट्यगीताचे बोल एका विधवेच्या भावाचे आहेत. प्राणविहंग नाहीसा होताच तिच्यावर प्रेम करणारा तरुण अदृश्य होतो. सामाजिक कल्पना-बंधांमुळें तिच्यावर प्रेम करणारा तरुण जवळपास असूनही हें फूल कोमेजन जातें.

६६ पोटासाठी नोकरी करीत असताना लोकमान्य देशभक्ताची निंदा तोंड-पुजेपणानें केली त्याबद्दलचा अनुताप यात व्यक्त होतो आहे.

६७–७१ या कवितावरून कवीची सान्ताकडून अनंताकडे दृष्टि वळली आहे असें वाटतें.

७१ ही कविता ६५ व्या कवितेला प्रस्तावना म्हणून १० वर्षांनी लिहिली गेली

७३ आत्मयज्ञ करणाऱ्या विधवेबद्दल सहानुभूति बाळगणारा तरुण गिरि-गव्हरवासी होतो, त्याच्या मनांत कोणते प्रश्न, विचार व गूढें त्यास त्रस्त करीत होती तें या कवितेंत थोडक्यांत मांडलें आहे. सिनेमातरीं—चित्रपटात. हा शब्द-प्रयोग इष्ट खास नाही.

७४ मागील प्रश्नाची उत्तरें त्याची त्यालाच सुचतात व ती मित्रासाठी तरुण-मुखाने कवीनें वदविली आहेत. ६५ व्या कवितेतील विधवेचें मरण पुनर्विवाहप्रतिबंधक दुष्ट रूढीचा परिणाम. त्यावेळी जो 'दीनाचा कनवाळु' नाहीसा झाला तोच गिरि-मुखातर्गत नष्ट सखा. त्याचा शोध मृत विधवेच्या भावास—ज्यास आपल्या बहिणीची मानसिक स्थिति आकलतां आली नाही त्या दगडास—लागला. त्या नष्ट पुरुषाचा एक मित्र आपले मित्राबद्दल नेहमी चौकशी करीत असे. त्यास त्या विधवेचा भाऊ एक प्रसंग पाहून गिरिमुखापाशीं घेऊन गेला आहे व ७३ व्या कवितेंतील प्रश्नांची उत्तरें चौकशी करणाऱ्या मित्राला ऐकावयास मिळत आहेत.

७५ तत्त्वज्ञान थोर खरें पण प्रणयही कमी थोर नाही.

७६ पाळ आपुली खिरे पळें = आपल्यांतील मर्यादा अगर बंध क्षणात नाहीसा होतो. आकृतीचा बाध गळे = आकृतीच्या आकाराचें बंधन नाहीसें होतें. म्हणजे आपण एकरूप होतों.

७८ या कवितेंत दोन प्रणयी जीवांचा काव्यमय एकजीवीपणा व्यक्त केला आहे.

७९ संसार लाकडी यंत्राप्रमाणें वास्तविक निर्जीव पण त्यातच आपल्या तारांचें प्रेमरणन करून मदनानें अपूर्व जीवनसंगीत निर्माण केलें आहे.

८० प्रणयी जीवाच्या मीलनक्षणाची महती सुचविली आहे.

८१ लोकमान्य टिळक कालवश झाले हें ऐकून हें शोकगीत लिहिलें.

८२ टेनिसनच्या Enoch Arden मधील पुढील ओळी पहाः–

As a village girl
Who sets her pitcher underneath the spring,
Musing on him that used to fill it for her,
Hears and not hears, and lets it overflow.

८३ सामाजिक कृत्रिम दडपणाखाली सांपडलेलें विधवेचें मन येथें वर्णिलें आहे.

८४ प्रणयहतास आपलें मन लपवणें सोपें नाही.

८५ कवीची सर्व स्त्रीजातीबद्दलची अत्यंत उदार कल्पना यांत चित्रित होत आहे. 'उदात्तं वस्तुनः संपत्' सर्व कविता उदात्त अलंकाराचें उत्तम उदाहरण आहे.

८७ एक गोड दृश्य.

८८ आपली परमात्म्याच्या प्राप्तिविषयीची तळमळ किती दुबळी आहे व त्याच्याच प्रसादावांचून त्याची प्राप्ति कशी होणें नाही हें या कवितेंत सूचित केलें आहे.

८९ ही साउली म्हणजेच अज्ञान; ही कविता बुद्धिप्रधान असून त्यात भास्कररावाचें धार्मिक मत दिसून येतें.

९० पारखी–हा शब्द प्रो. मायदेवांसाठी वापरला आहे.

९१ सत्यसाक्षात्काराचा हा प्रथम किरण आहे. नैराश्य, खिन्नता, भीति ही ज्याची त्याची स्वतःची निर्मिति. विश्वाच्या सत्य स्वरूपांत त्यांस अवकाश नाही. (राजकवि तांबे–१५१ पानावरील १-११-२० चें पत्र पहा.)

९२ एके दिवशी पहाटेस उषेचे सुवर्णमय रंग पाहून परमात्म्यानें आपलेकडे अमृताचा घट भरून धाडला आहे असें कवीला वाटलें. अशी सृष्टीची सहजसुंदर वैभवें आपण कितीतरी पाहतों, पण ती तत्काल विसरतोंही.

९४ स्वरोत्कट माधुर्य तर आहेच पण स्वरांनी प्रकट न झालेलें माधुर्य अंवतीभंवती कितीतरी भरले आहे. तें मूक असेल. तें शब्द, रस, रूप, वगैरेंनी प्रकट होतें. पण पुष्कळ वेळा मनुष्य हें विसरतो व त्याच्या इंद्रियांस शमविणाऱ्या पदार्थांतले तेवढें माधुर्य तो मान्य करतो. परंतु अशानें तो केवढ्या माधुर्य-कुंभाला अंतरतो.

९५ परमात्माच वाटाड्या होऊन जीवात्म्याचा विकास करीत नाहीं काय ?

९६ आपल्या कृतींनी सुखी होणाऱ्या रसिक मित्रांस कृतज्ञतेनें कवि म्हणतो.

९७ गोंधळाचें घर म्हणजे सृष्टिसौंदर्याला व कलारहस्याला पारखें होऊन नाण्याच्या नादात नाचणाऱ्यांचें जग. —माधवराव पटवर्धन.

९८ असल्या कवितेस विराणी म्हणजे विरहिणींचे उद्गार म्हणतात अशा तऱ्हेचे संतकवींचे कितीतरी अभंग आहेत.

९९ कवीची सुखमय जीवनाची मीमांसा.

१०० सान्त आणि अनन्त म्हणजे प्रकृति आणि पुरुष होत. या तात्त्विक कवितेंत भास्कररावांची तत्त्वज्ञानविषयक मतें आली आहेत. त्या मतावरील विश्वासाच्या दृढतेमुळें भावनेला कल्पनेनें आपल्या भव्य उदात्त दृष्टीचा लाभ दिला आहे.

१०२ जगातील विषमता एकदाची नाहीशी व्हावी म्हणून कवि रुद्रास बोलावित आहे.

१०३ जगावर प्रीति करण्याजोगीच परिस्थिति आहे, असें कवीचा आशावाद स्पष्ट ध्वनित करीत आहे.

१०४ कवीला त्याच्या अनुभवात असे कितीतरी प्रसंग आले की, त्यामुळें असे उद्गार कृतज्ञतेनें काढणें त्याला अपरिहार्य वाटलें.

१०५ महाप्रस्थान म्हणजे जीवाचें जग सोडून निघणें. यावर कवीच्या एकदर नऊ कविता आहेत. त्यांचा अनुक्रम पुढीलप्रमाणें घ्यावा. ( १०५,९३, १०७, १०८, १०६, १०९, ११०, १११ व ११२ ) वरील सर्व कवितांबद्दल वि. स. खांडेकर यांनीं पुढील मार्मिक "उद्गार" काढले आहेत.–

" जीवनसागराला काळओहटी लागली असतांना त्याच्या आत ओढणाऱ्या लाटावर डौलानें नृत्य करणारी ही कलानौका पाहून मन चकित झाल्यावांचून राहात नाहीं. "

(१०५) कवीचें मन शारीरिक अस्वास्थ्यानें दुर्बल झालें असतां घाबरून जातें. त्यावेळची त्याची गागरलेली स्थिति यांत प्रतिबिंबित झाली आहे. कवि आपले जीवास डोळ्यास अमंगल पाणी न आणतां धीर धरण्यास सुचवीत आहे. (९३) यांत मृत्यूची हाक कवीच्या कानी आदळते व साहजिकपणें तो घाबरतो. (१०७) या कवितेंत कवि देवदूतांस आपली येण्याची तयारी असल्याचें सांगतो. निकड कोणाला लावावयाची ? जो तयार नसेल त्याला ना ? मी तर तयारच आहें असें कवि सांगतो. (१०८) या कवितेंत कवि मनाला सांगत आहे की, जगाचें अडेल या दृष्टीने तूं मरणास तयार नसावें या तुझ्या म्हणण्यात कांहींच अर्थ नाही. जगाचें अडणार नाहीं. इतकेंच नव्हे तर जगाला तुझी पर्वाही नाहीं. अशा बेपर्वा जगाचा मोह धरायचा कशाला ? तेव्हां हरिदूतास संमुख होणेंच योग्य असें कवि मनास सुचवीत आहे. (१०६) मरण म्हणजे जीवाचें त्याच्याशी युद्धच. युद्ध करावयाचें तर वीरवृत्तीनें लढण्यांत हांशील; तेंच कवि सुचवितो. ( १०९ ) जग सोडतांना जगानें केलेल्या उपकारांविषयी कवीचें हृदय कृतज्ञतेनें भरून जात आहे. (११०) कवीचे मनोधैर्य इतकें अढळ राहतें की, मरण हें जीवनास आवश्यक आहे हेंही कटु सत्य ते सागूं लागते. (१११) शांतपणानें कवि जग सोडीत आहे. (११२) मरण म्हणजे गाडी बदलणेंच नव्हे का ?

११३ शहाजहान बादशहानें आपल्या अमूर्त प्रेमाचें मूर्त प्रतीक म्हणून सुंदर ताजमहाल बांधविला, पण उपयुक्ततावाद्याना त्याचें काय होय ? ते त्याला एखाद्या बोरीबंदरहून, अगर सेसिल हॉटेलाहून अथवा प्रयोगशालेहूनही कमी लेखतील. कवितेंत उपयुक्ततावाद्यावर ताशेरा आहे

११४ तुझ्यामुळेंच विषवृक्षाला अमृतफल आलें.

११५ विरहस्थिति सृष्टीसही नापसंत आहे, असें दिसतें

११६ परमात्मा जर घरी चालून आला तर तो कोणत्या थाटांत येईल व आला तर स्वागत तरी कसें करायचें ?

११७ मीलनाची आतुरता गीतात व्यक्त झाली आहे.

११८ या कावितेंत त्रिभुवनजननीचें विश्वव्यापी प्रेम, कवीची कृतज्ञता व जननींस परितोष होतो आहे किंवा नाही हें पहाण्याची बालवृत्ति उत्तम रीतीनें व्यक्त झाली आहे.

११९ ध्येय आणि परिस्थिति या दोहोंनी ओढल्या जाणाऱ्या जीवाची ओढाताण यात दृष्टोत्पत्तीस येते

१२० किती वेडे आपण, की बाह्य स्वरूपावरून अंतरंगाची कल्पना ठाम करतों.

१२१ या अद्भुतरम्य प्रेमगीतांत रजपूत वातावरण व्यक्त होत आहे. वधूस नेताना रजपूत लोक घोडी वापरतात.

१२२ त्याच वातावरणाचे पूरक चित्र.

१२३ आपले तारुण्यातील दिवस विसरलेल्या वडील माणसाकडून रोग एक व निदान भलतेच असे पुष्कळदा होतें, त्याचा हा नमुना आहे.

१२४ मूर्तापेक्षा अमूर्तांत मन जास्त रंगू शकतें. प्रेमबद्ध जीवास तर हेच तरंग मानवतात.

१२६ द्वद्वामुळे या सुखाच्या बागेंत दुःखाचें तण सपाटून माजलेले दिसतें सौंदर्याच्या उपासनेसही किती मर्यादा आहेत. तेव्हा ही माया ईश्वरी अनुग्रहानेंच दूर झाली तर होईल. त्यासाठी कवि प्रार्थना करीत आहे. खिळति = दृढ बसतात.

१२९ राजपुतान्यात खेडेगावात असली गाणी म्हणतात व फेर धरून नाचतात.

१३०-१३१ परमात्म्याशी मीलनोत्सुक अशा आत्म्यास प्रश्न व त्याचें उत्तर.

१३२ नीरस-शुष्क

१३३ पूर्ण प्रेमातच जीवनाचें सार आहे हें सुचविलें आहे.

१३४ ' मोहनी ' = महात्मा गांधीजीमध्यें.

१३९ एका निर्भय विरक्तास पाहून ही कविता सुचली आहे.

१४० भावी भारताच्या उज्ज्वल स्वरूपाआड कोणी येऊं नये म्हणून हा इषारा आहे.

१४१ स्वार्थत्यागी महात्म्याची प्रतिज्ञा अशीच असेल नाही का !

१४२ कर्मानुसार फल.

१४३ कवीचें पत्नीबद्दलचें निःसीम प्रेम.

१४४ ललत राग ऐकतांना एकदा तांबे यांच्या डोळ्यांपुढें जी काल्पनिक मूर्ति उभी झाली तिचें हें वर्णन आहे.

१४५ आपल्याच रागत्या मुलावरून भास्कररावांना ही कविता सुचली.

१४७ 'आनंदकर्ते' वासुदेवराव आपटे याचा मुलगा 'आनंद' हा वारला हें ऐकून ही कविता लिहिली आहे.

१४८–१४९ ही दोन्ही विधवांबद्दलची कवनें आहेत. एक हाल होत असून जीव न देता मुलासाठी आत्मघातापासून परावृत्त होते. दुसरी विचार, भक्ति व निश्चय यानी पुन्हां विवाहसूत्रानें बद्ध होते.

१५० ईश्वर हा थोर कलावंत. त्याच्यापुढें मानवाला आपल्या उच्च कलेचा अभिमान बाळगतां येईल काय ?

१५१ १९२० च्या असहकारितेच्या वेळी अशीच आशा कितीतरी जणाच्या मनात पालवली होती.

१५२ भास्कररावांच्या प्रेमगीतांतील अत्युत्तम असें हें भावगीत आहे

१५४ 'व्यर्थी अधिकचि अर्थ वसे । तो त्यास दिसे । ज्या म्हणति पिसे' तृणाच्या पात्यामागची ही सत्ता कितीजणांच्या प्रत्ययास येते ?

१५५ कवितेचा पाल्हाळ कंटाळवाणा वाटतो.

१५६ हें गीतसुद्धां बांधेसूद नाही.

१५७, १५८, १५९, १६०, १६१ भास्कररावाचा ईश्वरावरचा विश्वास व त्याची भक्ति ही गीतें व्यक्त करतात.

१६२ भगवंत हा खरा कलावंत व खरा कवि होय त्याच्याच अनुग्रहाची आकांक्षा यांत व्यक्त केली आहे.

१६३ तक्रार अगदी खरी आहे. तशीच विनोदीही आहे म्हणून तिरस्कार उत्पन्न करीत नाही.

१६४ वाल्मीकि व बाण या दोन कवीबद्दल भास्कररावांना विशेष प्रेम व आदर वाटे. Birth of the Muse आणि महाश्वेतेचें निवासस्थान असे दोन निबंध या दोन कवीच्या गौरवार्थ त्यांनी लिहिले होते. दुर्दैवानें दोन्ही गहाळ झाले आहेत.

१६५ धान्यराशि–धान्याचे ढीग; अनुस्वार अर्थातच चुकून पडला आहे. साम्राज्यवाद्याचें लढणें, कळवळा, शांतीच्या गप्पा, न्यायाचा आव, विश्वबंधुता, निरिच्छता व धार्मिकता सर्व खोटी !

१६७ जगातील वैषम्याचें मंडन कसें करावयाचें हें कवीला तरी समजत नाही

१६८ रविराजाच्याही नजरेस पडूं नये म्हणून मी जे जें लपवितें त्याचा तूं चारचौघांत निःसंकोच उच्चार करतोस. हें कसें बरें तूं करतोस ?

१७० अरुणोपम, विमलदृश्य व प्रस्फुटयौवन तरुणीला उद्देशून

१७१ झांशीच्या राणीचें स्मारक ग्वाल्हेरचे किल्ल्याखालीं बांधलें आहे. त्यावर खोदण्यासाठीं प्रस्तुत कविता रचली.

१७२ आपल्या प्रतिभेचा दीप आतां म्लान होतो आहे असें कवीसच वाटता वाटतां कितीतरी प्रकाश त्यानें पाजळला आहे.

१७३ परमेश्वरी रूपेला ही हाक मारली असावी असें वाटतें

१७४ स्त्रिया अबला नसून प्रबला आहेत

१७६ सुनेरी ( हि )–सोनेरी

१७७ ग्वाल्हेरच्या राजकुमारीचे विवाहप्रसंगी ही कविता लिहिली होती.

१८० लुसलुसलें–टवटवीत, तजेलदार. दिवाणें–वेडें. मंजरी–मोहर, तुरा.

१८१ सरेंच्या ऐवजी सरे असें पाहिजे.

१८२ तिसऱ्या ओळीचे आरंभी अवतरणचिन्ह चुकून पडलें आहे. इतका अवखळ शृंगार तांबे यांच्या कवितेंत अन्यत्र नाही. बेला–बेलिया, मोगऱ्याचा एक प्रकार, चमेली.

१८३ हे कान्त, या अफाट संसारात अरक्षित अशी मला एकटीला टाकून दिलीत व या बुरसटलेल्या विचारांच्या लोकाचाही जर तुझ्याविरुद्ध अपवाद उठला तर तूं मला जन्माची मुकशील अशी वरती धमकी देता. अशा भीषण परिस्थितीत माझी कशी धडगत लागणार कुणाला ठाउक ?

१८५ कवणपाशी–कुणाच्या पाशांत सापडून. जोग–संन्यास

१८७ खंत–हुरहूर. प्याले–पेले

१८९ बाळपणी शब्द दिला असला तरी प्रौढपणी विपरीत प्रसगाने अन्य ठिकाणी संसार करीत असलेली ही स्त्री बाळपणच्या संवगड्यास गतेतिहास विसरण्यास विनवीत आहे. का रे उकरीसी कूस–वैगुण्य अगर लबाडी चव्हाट्यावर कशाला आणतोस ?

१९० "उगवला आज फिरुनि का दारि" असें छापावयास पांचव्या व सहाव्या कडव्यांत अनुतप्त पतीचे उद्गार आहेत.

१९१ निसुरडा–चुकलामाकला. निर्लज्ज अर्थ घेतला तर खालच्या ओळीकडे तो वृद्धाला वाईट कल्पून लावला पाहिजे. पण ही ओढाताणच. रात्र जाभया देते = अजून रात्र संपली नाही. पुष्करिणी–कमळें असलेलें तळें.

१९२ निहारी–पाही. वाऱ्यावरील वरात–ताळमेळ नसलेली गोष्ट.

१९३ आपल्या चिमण्या मैनाराणीसारखाच, तिचा पुढें होणारा जिवलग चिमणा राघू आज कोठेंतरी वाढत असेल याबद्दल एका मातेचें मनोराज्य.

१९४ सहाव्या, सातव्या व आठव्या कडव्यांत व्यतिरेक अलंकाराची मौज आहे

१९५ आलापु–आलापो. सवनभूमि–यज्ञभूमि

१९७ यातील **ध्रुवपद नीट नाहीं व यमकेंही चांगलीं नाहींत.**

२०१ दुसऱ्या कडव्यांत **वाईट यतिभंग.**

२०३ धरि पाठीवर शरा–तोंड वळवताच वाग्बाण पाठीवर टाकलाच म्हणून समजावें.

२०४ अत्यंत मनोहर गीत.

२०६ वारुणी–मद्य. वारुणीभक्तानी केलेली आपल्या दैवताची स्तुति.

२०७ रोकटोक–अडवणें, प्रतिबंध. सही–खरा. नेक–विश्वासू.

२१० संध्याकाळ होणार का नाही आहे! अधीरता उत्तम ध्वनित केली आहे.

२११ झगरा–निखाऱ्याचा ढीग.

२१४ उडाण–उड्डाण.

२१६ ग्वाल्हेरनरेशाच्या विवाहमंगलप्रसंगी ही कविता लिहिली.

२१७ पिह्लास–**अपप्रयोग**

---